भारताच्या आर्थिकदृष्ट्या अत्यंत मागासभागांमध्ये सुधा मूर्ती यांनी भटकंती केली आहे. त्या पायी फिरल्या आहेत, त्यांनी बसनंही प्रवास केला आहे. या भागात अठराविश्वे दारिद्र्यात राहणाऱ्या माणसांच्या दारात आरोग्याच्या आणि शिक्षणाच्या सुविधा नेऊन पोचवण्यासाठी त्यांनी आटोकाट प्रयत्न केले आहेत. त्यांच्या या कार्यामुळेच समाजाच्या विविध स्तरांतील असामान्य व्यक्तींच्या सहवासात त्या आल्या. मग ते मुंबईतून उठून जाऊन भूकंपग्रस्त गुजरातमध्ये स्थायिक होणारं भिकाऱ्याचं कुटुंब असो, हुंड्यासाठी बळी गेलेल्या एका तरुणीची माता असो... नाही तर मोठ्या रकमेचा चेक देणगी म्हणून पाठवणारा अनामिक दाता असो... या सर्वांमुळे, त्यांच्या हृदयाला स्पर्श करून जाणाऱ्या कहाण्यांमुळे आणि त्यांच्या मुलखावेगळ्या जीवनविषयक तत्त्वज्ञानामुळे सुधा मूर्तींचं जीवन समृद्ध होऊन गेलं आहे.

एक प्राध्यापिका आणि एक समाजसेविका या दोन्ही नात्यांनी त्यांना जे काही विलक्षण अनुभव आले ते त्यांनी आपल्यापुढे मांडले आहेत. विनोदाची झालर असलेल्या त्यांच्या घरगुती, मनमोकळ्या लेखनशैलीतून निर्माण झालेलं हे पुस्तक सुधा मूर्ती यांचं कार्य आणि त्यांचं जीवनविषयक तत्त्वज्ञान यांचं व्यापक दर्शन घडवणारं आहे.



मेहता पब्लिशिंग हाऊस

वाइज अँड अदरवाइज ■ सुधा मूर्ती मेहता पब्लिशिंग हाऊस



# वाइज अँड अदरवाइज

सुधा मूर्ती



अनुवाद : लीना सोहोनी

# वाइज अँड अदरवाइज

## जीवनाला सलाम!

मूळ लेखिका

**सुधा मूर्ती**

अनुवाद

**लीना सोहोनी**



**मेहता पब्लिशिंग हाउस**



**Wise & Otherwise**

Infosys Foundation
Infosys Towers,
N0- 27, 3rd phase,
Bannerghaatta Road,
Banglore - 76.

■ **वाइज अँड अदरवाइज**
अनुवाद
लीना सोहोनी
बिल्डींग नं. २, जी -१,
धनश्री पॅराडाइज, ताराबाई पार्क,
कोल्हापूर.



■ प्रकाशक
सुनील अनिल मेहता,
मेहता पब्लिशिंग हाऊस,
१९४१, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०. ✆ ०२०-२४४७६९२४
E-mail : info@mehtapublishinghouse.com
Website :
www. mehtapublishinghouse.com

■ अक्षरजुळणी
पितृछाया मुद्रणालय,
९०९, रविवार पेठ,
पुणे ४११ ००२.

■ मुद्रक
लताली प्रिंटर्स
आनंदाश्रम, अप्पा बळवंत चौक,
पुणे ४११ ००२.

■ प्रकाशनकाल
सप्टेंबर, २००३
जानेवारी, २००४
जुलै, २००४
जानेवारी, २००५
मे, २००५
नोव्हेंबर, २००५
मे, २००६
डिसेंबर, २००६
पुनर्मुद्रण : ऑगस्ट, २००७

■ मुखपृष्ठ
मिहीर आपटे

■ किंमत
एकशे पन्नास रुपये

■ ISBN - 81 - 7766 - 411-5

अंगात सदरा नसलेल्या
ज्या माझ्या देशबांधवांनी मला
शिकवलं...
की माझा देश काय आहे...
त्यांना अर्पण

सौ. सुधा मूर्ती यांचा जन्म १९५० साली कर्नाटकातील हवेरी जिल्ह्यातील शिग्गाव येथे झाला. त्यांनी कॉम्प्युटर सायन्स या विषयातील एम्. टेक्. ही पदवी प्राप्त केली असून त्या सध्या इन्फोसिस फौंडेशनच्या अध्यक्षा आहेत. आत्तापर्यंत त्यांच्या सात कादंबऱ्या प्रकाशित झाल्या असून त्यातील 'डॉलर सोसे' ही कादंबरी मालिकेच्या स्वरूपात दूरदर्शनवर प्रसारित झाली आहे. याशिवाय त्यांनी चार तंत्रज्ञानविषयक पुस्तके आणि तीन प्रवासवर्णने लिहिली असून, त्यांनी ही सर्व साहित्यनिर्मिती कन्नड भाषेत केलेली आहे. त्या विवाहित असून त्यांना दोन मुले आहेत. सौ. सुधा मूर्ती यांचे वास्तव्य बंगलोर येथे असते.

# कार्य हाच संदेश

मानवी स्वभावाचे तीन गुणधर्म म्हणजे सत्त्व, रजस आणि तमस, असं सांगणाऱ्या भारतीय परंपरेचे आपण वारसदार आहोत. हीच आध्यात्मिक संकल्पना इतरही संस्कृतींमध्ये असतेच, फक्त भारतीयांनी ती फार सुंदर रीतीने व्यक्त केली आहे. ईश्वराने निर्माण केलेल्या सर्व प्राणीमात्रांमध्ये केवळ मानवप्राण्यालाच सुष्ट आणि दुष्ट यांच्यातील भेद ओळखण्याची शक्ती प्राप्त झालेली आहे आणि तो या दोहोंतील जो काही पर्याय निवडतो, त्यानुसार त्याचं फळ त्याला मिळत असतं.

सात्त्विक कार्य करायचं असा ठाम उद्देश मनाशी बाळगून पाऊल टाकणारे फार थोडे. त्याचप्रमाणे मुद्दाम तमसगुणाने युक्त असं आयुष्य जगणारेही अगदी थोडेच. काहींच्या आयुष्याची सुरुवात जरी रजस आणि तमस अशा गुणांनी झाली तरी पुढे आत्मिक उन्नती साधून ते सत्त्वगुणाच्या जवळ जाऊन पोचतात. ज्याचं जे कर्म असेल, त्यानुसार हे सगळं घटनाचक्र घडत असतं. जमशेदजी टाटा यांच्या जीवनाचा विचार केला, तर त्यांचं संपूर्ण जीवन आणि कार्य फक्त सात्त्विक दृष्टिकोनातून पार पडलेलं दिसतं— आपल्या देशासाठी उद्योगाचा पाया उभारणं, शैक्षणिक संस्था आणि अभ्यासकेंद्रांची स्थापना आणि ज्या काळात ही संकल्पना अस्तित्वातही नव्हती अशा काळात धर्मादाय संस्थांची साखळी उभी करणं. तर दुसऱ्या बाजूला आल्फ्रेड नोबेल या शास्त्रज्ञाने आपली सर्व बुद्धिमत्ता पणाला लावून डायनामाईटचा शोध लावला. धूरसुद्धा न सोडणारी, निरुपद्रवी भासणारी भुकटी, पण साऱ्या विश्वाचा संहार करण्याची ताकद तिच्यात असते. पण पुढे आपण लावलेल्या महान शोधाचा मानवी आयुष्यावर किती भयंकर परिणाम होऊ शकतो याची जाणीव झाल्यामुळे की काय, पण याच आल्फ्रेड नोबेलने आपली सर्व संपत्ती सात्त्विक मार्गासाठी खर्ची लावली. महान कार्याचा गुणगौरव करण्यासाठी त्याने 'नोबेल पुरस्कार' हा आंतरराष्ट्रीय पातळीवरील पुरस्कार सुरू केला.

सुधा मूर्ती यादेखील एका सर्वसामान्य गृहिणीचं जीवन जगण्यासाठी जन्माला आलेल्या नाहीत. त्या जन्मल्या आहेत त्याच मुळी एका शिक्षकाचं रक्त धमन्यांमध्ये घेऊन. शिक्षणकार्य हे एक असं काम आहे, की ज्यातून माणसाला जग घडवता येतं, ही गोष्ट त्या फार लवकर शिकल्या. पण अनेक शिक्षकांच्या घोळक्यातील एक होऊनही त्या राहिल्या नाहीत. काही अनामिक शक्तींनी त्यांना एका अज्ञात विश्वात खेचून नेलं. एक तर त्यांनी

पती निवडला तोही असा, की ज्याच्या अंगात समाजसत्तावादी विचारसरणीचं रक्त उसळत होतं आणि दुसरं म्हणजे भांडवलशाहीने त्यांच्या दारात भरभरून माप रिते केले तेव्हा एक शिक्षक आणि एक समाजवादी यांचे विचार एकत्र होऊन त्यांनी त्याचा वापर मानवतेच्या सेवेसाठी, जनतेच्या कल्याणासाठी करण्याचा निर्धार केला. एक शिक्षिका, पत्नी, माता आणि सर्वसामान्य गृहिणी असलेल्या सुधा मूर्ती स्वत:च एक संस्था बनून गेल्या.

त्यांनी उंच इमले बांधले नाहीत. त्यांच्या कार्याची जाहिरात कोठेही दिसून येणार नाही. त्यांची उपस्थिती जगाला ओरडून सांगण्यासाठी पुतळे आणि कमानी उभारण्याची गरज पडत नाही. आदिवासी राहात असलेल्या जंगलात त्या जातात, गरिबीने गांजलेल्या झोपड्यांमध्ये शिरतात, रोगराईने गिळंकृत करू पाहणाऱ्या वस्त्यांमधे जातात. कोण पात्र आहे, कोण गरजू आहे हे त्या स्वत: शोधून काढतात. जिथे ज्या गोष्टींची वानवा आहे तिथे त्या गोष्टी त्या पुरवतात. वैफल्य, निराशा, अडचणी, लाल फितीचा कारभार यांमुळे त्या कधी डगमगून जात नाहीत, तर आपलं काम तितक्याच जोमानं चालू ठेवतात. त्यांना हे सर्व कार्य करत असताना अनेकदा मानवी मनाच्या लालसेचे, पिपासू वृत्तीचे दर्शनही घडते. पण त्यामुळे त्यांच्या कामात खंड पडत नाही. त्यांचं हे काम हेच त्यांचं जीवनध्येय आहे. एखाद्या कर्मयोग्याच्या भावनेने, त्याच पद्धतीने त्यांचं हे काम चालू असतं.

या पुस्तकातून त्यांचं काम आणि ते करण्यामागची त्यांची भूमिका याचं अत्यंत सुस्पष्ट असं चित्र उभं राहतं. कन्नड भाषेत श्रेष्ठ दर्जाचं लेखन सातत्यानं करत असणाऱ्या या लेखिकेने 'द न्यू संडे एक्सप्रेस' या इंग्रजी वृत्तपत्रातून प्रथमच स्तंभलेखन केलं. पंधरा दिवसांनी प्रसिद्ध होणाऱ्या या मालिकेतून त्यांनी स्वत:चे वैयक्तिक अनुभव मांडले. आपण केलेल्या प्रवासाविषयी लिहिलं आणि त्यांना भेटलेल्या असामान्य मनाच्या सामान्य माणसांविषयी सांगितलं. त्यांच्या स्तंभलेखनामधील प्रांजळपणा आणि ताजेपणा लोकांना स्पर्शून गेला व त्यांचं लेखन लोकप्रिय झालं. एक गोष्ट उघड होती- त्या लेखणीतून लिहीत नव्हत्या तर हृदयातून लिहीत होत्या. सुरवातीपासूनच एक गोष्ट स्पष्ट होती, ती म्हणजे छोट्या छोट्या घटनांमधून, गोष्टींमधून, कहाण्यांमधून मानवी मनात डोकावण्याचं, मानवी स्वभावाचं दर्शन घडवण्याचा त्यांचा हा प्रयत्न होता, त्यांची ही सुंदर लेखन पद्धती होती, त्यासाठी वृत्तपत्राच्या स्तंभलेखनापेक्षा जास्त सुरस अशा माध्यमाची गरज होती. ईस्ट-वेस्ट बुक्सच्या प्रकाशकांनी ते माध्यम त्यांना दिलं आणि



त्यामुळे वाचकांच्या संपत्तीत या सुंदर पुस्तकाची भर पडली.

पण या सर्व कथा केवळ वाचनाचा आनंद लुटण्यापुरत्याच मर्यादित राहू नयेत... नाही तर ती फार दुर्दैवी गोष्ट ठरेल. त्या लेखनातून जर काहीच संदेश घेता येणार नसेल तर मग सुधा मूर्तींच्या या लेखनामागचा हेतूच साध्य होणार नाही. इन्फोसिसला मिळालेल्या यशाकडे त्यांनी 'समाजातील पददलितांची सेवा करण्याची सुवर्णसंधी' या दृष्टिकोनातून पाहिलं. आपल्यासारख्या इतर ज्या ज्या व्यक्तींच्या हातात अशी संधी आहे, क्षमता आहे, त्यांनीही अशा प्रकारचं समाजसेवेचं व्रत हाती घेतलं पाहिजे, अशी एक संकल्पना त्यांनी यातून मांडली आहे. पाश्चात्त्य देशांमधे ही कल्पना तशी नवीन नाही. एका बाजूला मोठमोठ्या उद्योगसमूहांनी समाजोपयोगी उपक्रम हाती घेतलेले असतात तर त्याच वेळी त्यांनी दुसऱ्या बाजूला बौद्धिक निर्मितीचेही कार्य अंगिकारलेले दिसते. पण आपल्या देशात मात्र हा प्रयोग नवाच आहे. पाश्चात्त्य देशांतील फोर्ड, रॉकफेलर, नूफील्ड अशा कंपन्यांच्या कार्याची बरोबरी करू शकेल अशी एकही कंपनी भारतात नाही. या कंपन्यांमधील मॅक आर्थर फौंडेशनतर्फे 'जीनियस ॲवॉर्ड्स्' दिली जातात. त्यांच्याविषयी फारसं कोणालाही माहीत नसतं कारण त्याची प्रसिद्धी केली जात नाही. परंतु काहीही गाजावाजा न करता, शांतपणे समाजातील मोठमोठ्या बुद्धिमान माणसांना निवडून त्यांचा गौरव केला जातो. उदाहरणार्थ, ए. के. रामानुजन या बुद्धिमंतांनी जे काही कार्य अंगिकारलेलं असेल, त्या कार्याचा आर्थिक भार उचलण्यात येतो. त्याचमुळे कोणत्याही राष्ट्राची जी खरी संपत्ती म्हणजे तेथील प्रतिभा, तिचा विकास होऊ शकतो. ज्या वेळी भारतात अशी अनेक फौंडेशन्सची स्थापना होऊन त्यांच्याद्वारे गोरगरिबांना मदत करणे, समाजातील सुप्त प्रतिभा ओळखणे, बुद्धिमंतांच्या विकासाला चालना देणे आणि समाजोपयोगी उपक्रम हाती घेणे या गोष्टी घडून येतील तेव्हाच सुधा मूर्तींच्या या लेखनामागचा उद्देश सफल होईल.

**टी. जे. एस्. जॉर्ज**

संपादकीय सल्लागार
द न्यू इंडियन एक्सप्रेस

# ऋणनिर्देश

*इंग्लिश भाषेतील माझे पुस्तक 'वाईज अँड अदरवाइज' आता मराठीमध्ये येत आहे याचा मला अतिशय आनंद होत आहे.*

*माझ्या कामाच्या निमित्ताने मी खेड्यापाड्यांमधून भरपूर हिंडले, खूप पाहिले. तोपर्यंत खरं तर माझा देश मला नीट उमगलेलाच नव्हता. मी अनेक राज्यांमध्ये अगदी अंतर्भागापर्यंत प्रवास केला आहे, आणि जवळपास हजारांहून अधिक खेड्यांना भेटी दिल्या आहेत.*

*माझ्या कार्यामध्ये मला आलेले हे खरेखुरे अनुभव आहेत.*

*मानवी मन फार गुंतागुंतीचं असतं. काही लोकांना पैशाची नाही तर कीर्तीची हाव सुटते. तर एकीकडे काही अशिक्षित गणल्या जाणाऱ्या व्यक्तींमध्ये असामान्य परिपक्वता आढळून येते.*

*या पुस्तकातील सर्वच गोष्टी प्रत्यक्ष घडलेल्या अनुभवांवर आधारित आहेत. काही नावे मी मुद्दामच बदलली आहेत तर काही ठिकाणी त्यात माझं थोडंसं भाष्य केलं आहे. काही ठिकाणी, साध्या सरळ लोकांनी... ज्यांना आयुष्यातील फारशा संधीही उपलब्ध नव्हत्या... अशा लोकांनी मला खूप काही शिकवलं. तेच माझे गुरू बनले.*

*'द न्यू इंडियन एक्सप्रेस'चे संपादकीय सल्लागार श्री. टी. जे. एस. जॉर्ज यांची मी ऋणी आहे. मला वृत्तपत्रात स्तंभलेखन करण्यासाठी आत्मविश्वास वाटला, तो केवळ त्यांच्यामुळे. या पुस्तकाची प्रस्तावनाही त्यांनीच लिहिली आहे. त्याचबरोबर 'द वीक'चे श्री गोपालकृष्णन्, 'द हिंदुस्तान टाईम्स'चे वीर संघवी आणि 'द हिंदू'च्या श्रीमती निर्मला लक्ष्मण यांचीही मी अत्यंत आभारी आहे. त्यांनी आपल्या वृत्तपत्रांमधून आणि नियतकालिकांमधून वेळोवेळी प्रसिद्ध झालेले माझे लेख पुस्तकरूपाने प्रकाशित करण्याची परवानगी मला दिली.*

*'वाईज अँड अदरवाईज' या माझ्या पुस्तकाच्या मराठी अनुवादाची दुसरी आवृत्ती तीन महिन्यांच्या आतच प्रसिद्ध होत आहे याचा मला अतिशय आनंद होत आहे. मराठी वाचकाने माझ्या पुस्तकाला दिलेली ही पसंतीची पावतीच आहे. हे पुस्तक तेरा भारतीय भाषांमध्ये अनुवादित झाले असून त्या भाषांमध्येही असेच लोकप्रिय ठरले आहे. या पुस्तकाच्या मराठी अनुवादक श्रीमती लीना सोहोनी आणि प्रकाशक मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे यांचे मी मनःपूर्वक आभार मानते. यांच्या साह्याखेरीज मराठी साहित्यक्षेत्रामध्ये प्रवेश मिळवणे कठीण झाले असते.*

*आणि अखेर, तुम्ही वाचक... माझ्या लेखी तुमचं स्थान फार मोलाचं आहे. तुम्हीच माझं प्रेरणास्थान आहात. तुमच्याशिवाय एक लेखिका म्हणून मला अस्तित्वच नाही.*

**सुधा मूर्ती**



# अनुक्रम

१

# सचोटी हृदयातून येते

तीन वर्षांपूर्वीची गोष्ट. जून महिन्यातील एक प्रसन्न सकाळ होती. मी नेहमीसारखी कन्नड वर्तमानपत्र वाचत बसले होते. त्याच दिवशी एस्. एस्. सी.चा निकाल जाहीर झाला होता. आतल्या पानांवर उत्तीर्ण झालेल्यांची यादी छापली होती, तर वरच्या पानावर गुणवत्ता यादीत आलेल्या विद्यार्थ्यांचे फोटो झळकत होते. जवळ जवळ आख्खं पानच त्यांनी व्यापलं होतं.

गुणवत्ता यादीत आलेल्या विद्यार्थ्यांबद्दल मला नेहमीच अपार कौतुक वाटत आलेलं आहे. गुणवत्ता यादीत नाव येणं हे केवळ माणसाच्या बुद्धिमत्तेचंच निदर्शक आहे असं नाही, तर विद्यार्थ्यानं हे यश मिळवण्यामागे त्याची किती अपार मेहनत आहे, किती दृढनिश्चय आणि प्रयत्नशीलता आहे, हेही दिसून येतं. मी स्वत: एका प्राध्यापकांच्या घरात वाढलेली आहे. माझी ही पार्श्वभूमी आणि माझा स्वत:चा अध्यापन क्षेत्रातला अनुभव, या दोहोंमुळे माझी ही मनोभूमिका झालेली आहे.

त्या दिवशी वर्तमानपत्रात आलेल्या त्या सगळ्या फोटोंमधून एका मुलाच्या फोटोनं माझं लक्ष वेधून घेतलं. माझी नजर त्यावरून हटेना. तो तसा अशक्त, नाजूक दिसत होता. पण त्याच्या डोळ्यांत जी काही चमक होती, ती मंत्रमुग्ध करणारी होती. त्या मुलाविषयी आणखी जाणून घ्यायची इच्छा मला झाली. त्याचं नाव होतं हनुमंतप्पा. त्याचा गुणवत्ता यादीत आठवा क्रमांक आला होता. त्याच्याविषयी एवढंच काय ते मला कळलं.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे दुसऱ्याच दिवशी परत एकदा त्याचा फोटो झळकला. या खेपेला त्याची मुलाखतही छापलेली होती. मी उत्सुकतेने ती वाचली. तो एका हमालाचा मुलगा होता. तो एका खेड्यात राहात होता. त्याच्या वडिलांची मिळकत दिवसाला फक्त चाळीस रुपये होती, त्यामुळेच त्याला पुढे शिकणं शक्य नव्हतं, असं त्यानं मुलाखतीत म्हटलं होतं. हनुमंतप्पा पाच मुलांमधला सर्वात मोठा. घरात

मिळवते फक्त वडील. ते लोक आदिवासी जमातीचे होते.

या इतक्या हुशार मुलाविषयी हे ऐकून मला वाईट वाटलं. आपल्यातील बरेच जण आपापल्या मुलांना खाजगी शिकवण्यांना, नाही तर क्लासला पाठवतो. त्यांना संदर्भ ग्रंथ, गाईडस् वगैरे आणून देतो. त्यांना चांगल्यात चांगल्या सुविधा पुरवण्यासाठी झटतो. खर्चाचा जरासुद्धा विचार करत नाही. पण रामपुरा गावात राहणाऱ्या हनुमंतप्पाची गोष्टच वेगळी होती. माणसाला लागणाऱ्या काही जीवनावश्यक गोष्टीदेखील त्याच्या वाट्याला आल्या नव्हत्या आणि तरीही त्यानं एवढं उज्ज्वल यश मिळवलं होतं. हातात वर्तमानपत्र तसंच धरून मी त्याचाच विचार करत बसले होते, तेवढ्यात माझी नजर शेजाऱ्यांच्या अंगणातील आंब्याच्या झाडावर पडली. ते झाड ताजंतवानं दिसत होतं. नुकती उमललेली पालवी... त्यावर चमकणारे दवाचे थेंब... झाडावर लटकणाऱ्या कैऱ्या. लवकरच त्या पिकणार होत्या. झाडापलीकडे थोड्याशा अंतरावर एका कुंडीत एक लहानसं रोपटं होतं. माझ्या मनात आलं, गेले कितीतरी दिवस हे एवढंच आहे... जरासुद्धा वाढलेलं नाही.

ती सकाळची शांत वेळ होती. हवा गार आणि स्वच्छ होती. माझे विचार जणू मोकाट सुटले होते. एवढ्यात घरात प्रेशर कुकरची शिट्टी मोठ्यांदा वाजली आणि त्या शांततेचा भंग झाला. मी भानावर आले. अर्धा तास लोटला होता.

वर्तमानपत्रातील त्या मुलाखतीत हनुमंतप्पाचा पत्ता दिलेला होता. आता मात्र जास्त वेळ न दवडता मी लगोलग एक पोस्टकार्ड घेऊन त्याला एक पत्र लिहून टाकलं. मी दोनच ओळी लिहिल्या होत्या. 'माझी तुला भेटायची इच्छा आहे. तू बंगलोरला येऊ शकशील का ?' एवढ्यात माझे वडील सकाळचा फेरफटका मारून घरी परतले. ते अत्यंत व्यवहारी विचारसरणीचे आहेत. त्यांनी माझं ते पत्र वाचलं आणि ते म्हणाले, 'इतक्या लांब यायचं तर भाडेखर्चाचे पैसे तरी कुठून आणणार तो ? तो इथे यावा असं तुला वाटतंय ना, मग तू भाड्याचे पैसे त्याला पाठवून दे. शिवाय जरा बरे कपडे विकत घेण्यासाठी आणखीही थोडी रक्कम पाठव.'

मग मी पत्रात अशी पुष्टी जोडली : 'मी तुला, भाडेखर्च तसेच कपडे विकत घ्यायला पैसे पाठवीन.' त्यानंतर चारच दिवसांनी त्याचं पत्र आलं. दोनच ओळींचं. पहिल्या ओळीत त्यानं माझ्या पत्राबद्दल आभार मानले होते व दुसऱ्या ओळीत बंगलोरला येऊन मला भेटण्याची इच्छा व्यक्त केली होती.

मी तातडीनं त्याला पैसे पाठवले व माझ्या ऑफिसचा तपशीलवार पत्ताही कळवला. अखेर तो आमच्या ऑफिसात येऊन ठेपला. तो एखाद्या बावरलेल्या,



वाट चुकलेल्या वासरासारखा दिसत होता. कदाचित ही त्याची बंगलोरला येण्याची पहिलीच खेप असावी. तो अत्यंत नम्र होता. त्याने स्वच्छ शर्ट-पँट घातली होती. केसांचा नीट विंचरून व्यवस्थित भांग पाडलेला होता. डोळ्यांत ती चमक आताही होतीच.

मी लगेच मुद्याचंच बोलले. 'तू मिळवलेल्या शैक्षणिक यशामुळे आम्हांला फार आनंद झाला आहे. तुला पुढे काही शिकायची इच्छा आहे का ? तुझ्या शिक्षणाचा खर्च आम्ही करायला तयार आहोत. तू तुला पाहिजे तो अभ्यासक्रम निवड. अगदी कुठलाही.'

तो गप्पच राहिला.

माझे एक वरिष्ठ सहकारी शेजारी उभे होते. ते हसून मला म्हणाले : 'बिटस् आणि बाईटच्या (संगणकाच्या) वेगानं नको जाऊ अशी. तू जे काही सुचवते आहेस, ते त्याच्या नीट पचनी पडू दे आणि त्यावर विचार करून आज संध्याकाळपर्यंत त्यानं आपल्याला सांगितलं तरी चालेल.'

अखेर हनुमंतप्पा जेव्हा घरी जायला निघाला तेव्हा त्यानं हळू आवाजात पण ठामपणे सांगितलं : 'मॅडम, बेल्लारीच्या टीचर्स ट्रेनिंग कॉलेजात जाऊन पुढील अभ्यासक्रम करायचा माझा विचार आहे. आमच्या गावाच्या सर्वांत जवळचं कॉलेज तेच आहे.'

मी ते लगेच मान्य केलं पण त्याच्या मनात खरोखर याहून वेगळा दुसरा कुठला अभ्यासक्रम आहे का ते पाहण्यासाठी त्याच्याशी आणखी थोडा वेळ बोलले. त्याने अगदी दुसरा कोणताही अभ्यासक्रम निवडला तरी त्याची फी भरायला आम्ही तयार आहोत, ही गोष्ट त्याला पुरेशी स्पष्ट करून सांगितली. पण त्याचा निर्धार पक्का होता. आपल्याला पुढे काय करायचं आहे, हे त्याचं ठरलेलं होतं.

'मग मी तुला दर महिन्याला किती पैसे पाठवू ? त्या कॉलेजला वसतिगृहाची सुविधा आहे का ?' मी विचारलं.

त्यावर सर्व काही माहिती काढून तपशीलवार कळवतो, असं त्यानं सांगितलं.

दोन दिवसांनंतर परत एकदा आपल्या वळणदार हस्ताक्षरात त्यानं कळवलं, त्याला महिन्याला साधारणपणे तीनशे रुपये लागणार होते. तेथे एक खोली भाड्याने घेऊन आपल्या आणखी एका मित्राच्या सोबतीनं राहण्याचा त्याचा बेत होता. एकूण खर्च कमी यावा म्हणून ते दोघे घरीच स्वयंपाक करणार होते.

मी लगेच सहा महिन्यांच्या हिशेबाने अठराशे रुपये त्याला पाठवून दिले.

माझा ड्राफ्ट पोचताच त्याने ताबडतोब पत्राने त्याची पोच दिली आणि आभारही मानले.

असेच दिवस गेले. एक दिवस अचानक आठवण झाली, हनुमंतप्पाला पुढच्या सहा महिन्यांचे पैसे पाठवायचे होते. मी पुन्हा एकदा त्याला अठराशे रुपयांचा ड्राफ्ट पाठवून दिला.

त्याचीही पोच देणारे पत्र उलट टपाली आले. आश्चर्याची गोष्ट अशी की पत्रासोबत त्याने पाकिटातून काही पैसेही पाठवले होते. 'मॅडम,' त्याने लिहिले होते, 'तुम्ही पुढच्या सहा महिन्यांचे पैसे मला पाठवून दिले, हा तुमचा चांगुलपणा. पण गेले दोन महिने मी बेल्लारीत नव्हतो. आधी महिनाभर आमच्या कॉलेजला सुट्टी होती आणि नंतरचा महिनाभर संप होता. तेव्हा हे दोनही महिने मी घरीच होतो. या काळात माझा खर्च तीनशे रुपयांहून कितीतरी कमी झाला. त्यामुळे मी माझ्या खर्चातून वाचलेले तीनशे रुपये तुम्हाला परत पाठवत आहे. त्याचा कृपया स्वीकार करावा.'

मी थक्क झाले. इतकी गरिबी आणि तरीही एवढा प्रामाणिकपणा !

मी हनुमंतप्पाला खर्चासाठी जे पैसे पाठवत होते त्याचा हिशोब त्याने मला द्यावा, अशी अपेक्षा माझी मुळीच नव्हती, आणि हे त्यालाही माहीत होतं आणि तरीही त्याने उरलेली रक्कम परत पाठवून दिली. विश्वास बसणार नाही. पण हे खरं आहे.

एक गोष्ट मात्र मी अनुभवातून शिकले आहे. सचोटी, प्रामाणिकपणा ही काही कुण्या एका विशिष्ट वर्गाची मक्तेदारी नव्हे, त्याचा शिक्षणाशी किंवा श्रीमंतीशीही संबंध नाही. ती कोणत्याही विद्यापीठात शिकवली जात नाही. अनेक माणसांच्या ठायी ती हृदयातूनच फुलून आलेली असते.

या साध्यासुध्या खेडवळ मुलाच्या प्रामाणिकपणावर कशी आणि काय प्रतिक्रिया द्यावी तेच मला समजेना. ईश्वराने या हनुमंतप्पावर आणि त्याच्या कुटुंबीयांवर आपलं कृपाछत्र नेहमी ठेवावं अशी मी मनोमन प्रार्थना केली.

ooo



२

# कसा हा मनुष्यस्वभाव !

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळी मी चीफ सिस्टिम ॲनलिस्ट म्हणून काम करत होते. कामानिमित्त, प्रोजेक्टसाठी तेव्हा खूप फिरावं लागे. कधी जवळपासच्या एखाद्या शहरात नाही तर एखाद्या लहानशा खेड्यात जावं लागे. अनेकदा तर या कामासाठी मला सुट्टीच्या दिवशीसुद्धा प्रवास करावा लागे.

असाच एक शुक्रवार होता. या वेळी मोठा वीकएंड मिळणार म्हणून मी खुष होते. येत्या सोमवारी कसल्याशा सणानिमित्त सुट्टी होती. या तीन दिवसांच्या सुट्टीचा फायदा घेऊन आम्ही बहिणींनी शिग्गावला आमच्या आजोळच्या घरी एकत्र भेटायचं ठरवलं होतं.

हा शुक्रवार कधी एकदा संपतो असं मला झालं होतं. रविवारी पौर्णिमा होती. मुद्दाम चांदण्यात स्नेहभोजनाचा कार्यक्रम आखलेला होता. उत्तर कर्नाटकमधल्या लोकांना या चांदण्यातल्या भोजनाचं फार कौतुक. आम्हांला सर्वांनाच काम संपवून निघण्याची घाई झाली होती, एवढ्यात कोणाचीतरी हाक आली. 'जरा माझ्या ऑफिसात येता का ?'

माझ्या पोटात मोठा गोळा आला. ते आमचे साहेब होते. (माझ्या माहेरच्या नावाने त्यांनी हाक मारली होती.) त्यांच्या आवाजावरून काम तसं महत्त्वाचं असणार, हे उघड्च होतं. मी खरं तर निघालेच होते पण मग वाटेत त्यांच्या ऑफिसपाशी थांबले.

'तुम्हाला असा त्रास द्यायला बरं वाटत नाही. पण तुमची आता तातडीने गरज आहे,' असं म्हणून त्यांनी माझ्या हातात एक पत्र ठेवलं. येत्या दोन दिवसांच्या आत एका विशिष्ट प्रोजेक्टच्या स्थळी जाऊन मी भेट दिली पाहिजे, असं त्यात नमूद केलं होतं.

'काही हरकत नाही, सर. मी जाऊन काय ते बघते,' मी म्हणाले. दिवसभर,

आठवडाभर अविरत काम करत राहण्याची मला सवयच होती, त्यामुळे गावी जाण्याचा बेत रद्द करावा लागला, तरी त्याचं विशेष काही वाटलं नाही मला. नाही तरी कोणत्याही सणाउत्सवापेक्षा, संमेलनापेक्षा माझ्या कामातच मला जास्त आनंद मिळायचा.

दुसऱ्याच दिवशी मी त्या प्रोजेक्टच्या गावाला जायला निघाले. मी तेथे जाऊन पोचले तेव्हा मध्यान्ह झाली होती, पण त्या गावात मात्र दिवस नुकताच सुरू झाल्यासारखं भासत होतं. गाव तसं लहानच होतं. दुकानं नुकती उघडत होती, लोक कामाला निघाले होते.

मी बसस्टँडवर उतरले आणि गावाच्या दिशेने चालत निघाले. इतक्यात एक पोरसवदा तरुण धावतपळत माझ्यापाशी आला आणि म्हणाला : 'सॉरी मॅडम, मला यायला उशीर झाला. मी तुम्हाला आणायला बसस्टँडवर येणार होतो.' आमच्या क्लाएंटचा तो प्रतिनिधी होता. तो मला त्यांच्या ऑफिसात नेण्यासाठी आला होता.

तेथून चालत काही मिनिटांतच आम्ही त्यांच्या ऑफिसात पोचलो. ऑफिस तसं लहानच होतं. ते काही अत्याधुनिक वगैरे नव्हतं. जुन्या, दुरुस्त केलेल्या फर्निचरने ते सजवलेलं होतं. मात्र टापटिपीत ठेवलेलं होत. सगळे जण माझीच वाट पाहत होते. मला बरं वाटलं, मी बसले. त्यांनी मला प्यायला गार ताक आणलं. ते पिऊन एकदम ताजंतवानं वाटलं.

कामाला सुरुवात करण्यापूर्वी माझी एका नीटनेटक्या तरुणाशी ओळख करून देण्यात आली. मला त्याच्याबरोबर काम करायचं होतं. तो चांगला तरतरीत होता. आत्मविश्वासाने बोलत होता. हुशार वाटला. त्याचं कामही चांगल्या दर्जाचं होतं. ते पाहून नाही म्हटलं तरी मला जरा आश्चर्यच वाटलं. त्याच्या काम करण्यातून त्याची व्यावसायिकता जाणवत होती. मला लोकांनी त्याच्याविषयी असंही सांगितलं, की त्याचं वाचन भरपूर होतं, किंबहुना त्यांच्या गावात त्याच्याइतकं वाचन कोणाचंही नव्हतं.

त्यानं कामाची कागदपत्रं पण अगदी शिस्तशीर, नीटनेटकेपणे ठेवलेली होती. त्यामुळेच आमचं काम फारच लवकर आटपलं. मी जायला निघाले. जाण्याआधी आवर्जून त्याचं कौतुक केलं. त्यावर तो लाजला. मग त्याने मला चहासाठी घरी येण्याचा खूप आग्रह केला. त्याचं घर जवळच होतं.

त्याचं घरही फार नीटनेटकं ठेवलेलं होतं. चहा पिता पिता आमच्या गप्पा सुरू झाल्या. आता गप्पा जरा वैयक्तिक पातळीवर आल्या होत्या. त्याने त्याच्या



आईवडिलांविषयी सांगितलं. त्याच्या याआधीच्या नोकरीविषयी सांगितलं. मग त्याने पत्नीची आणि दोन वर्षांच्या मुलाची ओळख करून दिली. आपल्या पत्नीचं पाककौशल्य, तिचं गाणं, तिनं शाळेत असताना प्राप्त केलेलं यश, या सर्वांविषयी तो कौतुकाने बोलत होता. मग त्याने आपल्या मुलाला हाक मारली. तोही लगेच आला, आणि हाताची घडी घालून माझ्या बाजूला उभा राहिला. जणू काही त्याला तसं उभं राहायला शिकवलं असावं, असा. मग त्याच्या वडिलांनी त्याला कविता म्हणून दाखवायला सांगितली. त्यानेही आपल्या बोबड्या आवाजात लगेच कविता म्हणून दाखवली.

मीही मान हलवून त्याचं कौतुक केलं. पण आपल्या मुलाचं फक्त एवढंसं कौतुक झालं, ही गोष्ट त्या वडिलांना काही फारशी रुचली नसावी. तिथे समोरच मुळाक्षरांचा जुना तक्ता टांगलेला होता. मग वडिलांनी आपल्या मुलाला त्यातील सर्व मुळाक्षरे ओळखायला लावली. खरं तर या अशा गोष्टी करायला मुलांना मुळात आवडत नाहीत, पण पालक नेहमीच आपल्या मुलांवर बळजबरी करतात. बिचारी मुलं !

आमच्या यजमानांनी आपल्या घरात चालवलेला तो प्रकार आणखी अर्धा तास तसाच चालू होता. शेवटी ते मूलही कंटाळलं, अस्वस्थ झालं. चिडलं. त्याच्या आईच्या ते लक्षात आलं आणि ती त्याला स्वयंपाकघरात घेऊन गेली. बहुधा त्याला चॉकलेट नाही तर बिस्किटाचा खाऊ बक्षीस म्हणून मिळाला असावा.

आपल्या मुलाची काहीतरी तारीफ ऐकण्याची त्या वडिलांची माझ्याकडून अपेक्षा असल्याचं माझ्या लक्षात आलं. मग मी म्हटलं, 'तुमचा मुलगा त्याच्या वयाच्या मानाने फारच हुशार आहे हं !'

'असणारच ! मी लहानपणापासूनच त्याला तशा पद्धतीनं वाढवलं आहे ना !' तो माणूस अभिमानानं म्हणाला. आपल्या या दोन वर्षांच्या बाळाला याने जन्मल्यापासूनच शिकवायला सुरुवात केली होती की काय, असं मला वाटलं.

'अच्छा ! म्हणजे मूल केवळ शिकवल्यामुळे इतकं हुशार होऊ शकतं ?' मी विचारलं.

'नाही, नाही तसं नाही. आनुवंशिकतेचाही त्यात भाग असतोच. माझा मुलगा माझ्यावर पडलाय.' त्या माणसाचा चेहरा अभिमानाने नुसता फुलून आला होता. आता मला त्याच्याकडून आणखी ऐकायची इच्छा झाली. शिवाय माझी बस सुटायला अजून तासभर अवकाश होता.

'तुम्ही कॉलेजात असताना फार हुशार विद्यार्थी असणार !' मी उगीचच

खोदून चौकशी केली.

'हो, तर. मी शाळेत आणि कॉलेजात असताना नेहमीच पहिला क्रमांक पटकावायचो,' त्याने उत्तर दिलं. तो स्वत:वर चांगलाच प्रसन्न दिसत होता.

'तुम्ही कुठल्या कॉलेजातून पदवी घेतली ?' मला बरीच उत्सुकता वाटू लागली होती.

'मी बी व्ही बी इंजिनीअरिंग कॉलेजात होतो, हुबळीला.'

आता मी चमकले. हुबळी, ते इंजिनीअरिंग कॉलेज, सगळंच माझ्या परिचयाचं होतं. 'कुठल्या वर्षी ?' मी विचारलं.

'१९७२ साली मी पहिल्या क्रमांकानं इंजिनीअरिंगची परीक्षा उत्तीर्ण झालो.'

'मग... तुम्हाला सुवर्णपदक मिळालंच असेल, नाही ?' मी मुद्दाम विचारलं.

'हो ना... त्या वर्षीचं सुवर्णपदक मलाच मिळालं होतं,' तो स्वत:वर खूश होऊन म्हणाला.

आता मात्र तो काय प्रकारचा माणूस आहे. हे माझ्या चांगलंच लक्षात आलं. ते पाहून मात्र मला वाईट वाटलं.

'मला जरा तुमचं सुवर्णपदक बघायला मिळेल का ?' मी विचारलं.

अचानक माझ्या त्या प्रश्नानंतर खोलीतील वातावरण बदललं. 'का बरं ? तुमचा माझ्यावर विश्वास नाही ?' आता त्याच्या आवाजात अनिश्चितता डोकवत होती.

'तसं नाही. तुम्ही १९७२ साली जे सुवर्णपदक मिळवलंत ते मला पाहायचंय.' मी परत म्हणाले.

'ते फार बहुमोल आहे माझ्या दृष्टीने... म्हणून ते मी बँकेच्या लॉकरमधे ठेवलंय,' तो म्हणाला.

'कोणती बँक ?' मी पण त्याचा पाठपुरावा केला.

'हा सगळा तपशील मी तुम्हाला का म्हणून द्यावा ?' त्याने चिडून विचारलं.

आता सगळं काही स्पष्ट झालं होतं. मला वाटतं, त्यालासुद्धा काय समजायचं ते समजलं असावं. त्याची अगत्यशीलता संपुष्टात आली होती. माझ्याही बसची वेळ झाली होती. मलाही निघायला हवं होतं.

दाराकडे जाता जाता मी त्याला म्हटलं, 'तुमच्या बँकेचे किंवा तुमच्या सुवर्णपदकाचे कोणतेही तपशील मला नकोत. माझा त्याच्याशी काही संबंधही नाही. फक्त ते सुवर्णपदक तुम्हाला मिळालं असणं शक्य नाही, याची मात्र मला खात्री आहे.'



'तुम्ही इतकं खात्रीशीर रीत्या असं कसं काय म्हणू शकता ?' आता तो चांगलाच संतापला होता.

'कारण...' मी त्याला म्हणाले. ते बोलतानासुद्धा मला दु:ख होत होतं, '१९७२ सालचं सुवर्णपदक मला मिळालं होतं, आणि दर वर्षी फक्त एकच सुवर्ण-पदक देण्यात येतं.'

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकून तो आश्चर्याने थक्क झाला आणि माझ्याकडे एकटक पाहातच राहिला, काही न उमगल्यासारखा. मी त्याच्याकडे पाहिलं आणि त्याला हळूच विचारलं, 'तुम्ही इतके बुद्धिमान आहात. तुमच्या कामात वाकबगार आहात. तुम्हाला खोटं बोलायची काय गरज आहे ? त्यानं काय साध्य होणार आहे ?' एवढं बोलून मी वळले आणि पाठीमागे दार बंद झाल्याचा आवाज झाला. हे एवढंच उत्तर मला मिळालं.

ooo

३

# सह्याद्रीच्या कुशीत विनयशीलता भेटते तेव्हा....

मला प्रवासाची खूप आवड आहे. मग ते एखादं छोटंसं खेडं असो, नाही तर दुष्काळग्रस्त भाग असो, ओसाड डोंगरमाथा असो, घनदाट जंगल असो किंवा इजिप्त नाही तर चीनमधील एखादं स्मारक. मला वेगवेगळ्या ठिकाणी भटकंती करायला फार आवडतं.

अशीच एकदा मी सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांमधे, कर्नाटकामधील एका घनदाट जंगलाच्या प्रदेशात गेले होते. दिवसभर पावसाची रिपरिप चालू होती. पावसाळी दिवसांत दाट जंगलातून वाट काढत जाणं तसं कठीण काम. शिवाय वाटेत जळवा चिकटण्याची भीती. पण तरीसुद्धा पावसाळी दिवसांतील निसर्गसौंदर्याचा खराखुरा अनुभव घ्यायचा असला, तर या स्थळाला भेट द्यायलाच हवी.

जंगलातील झाडाझुडपांचा, फुलांचा मत्त सुगंध, विविध प्रकारच्या पक्षांची शीळ, वाऱ्याची हळुवार साद... कोणत्याही गावात किंवा शहरात या आनंदाचा अनुभव येणं शक्य नाही.

मी तेथील घनदाट जंगलात, पार खोलवर असलेल्या आदिवासी वस्तीतील शाळेला भेट द्यायला आले होते. मी ज्या धर्मादाय विश्वस्त संस्थेसाठी करते, त्यांना या शाळेला काही मदत देण्याची इच्छा होती. येथील आदिवासींना 'ठंडा' असं म्हणतात. हे फार आनंदी वृत्तीचे असतात. त्यांचा जो म्होरक्या असतो, त्याला 'ठंडाप्पा' असं म्हणतात. तो त्या आदिवासी टोळीतील सर्वात जुना, सर्वात वरिष्ठ माणूस असतो. जणू तो त्यांचा देवच असतो, म्हणा ना. सर्व जण त्याच्या ऋणात बद्ध असतात. आपल्या बालपणी शिकलेल्या रूढी आणि परंपरांचे पालन करतात.

मी गावात पोचले तेव्हा जोरात पाऊस पडत होता. तो कोसळणारा पाऊस, त्यात झोडपून निघणारी पानं आणि रानटी फुलांचा उग्र गंध... या सर्वांचा परिणाम म्हणून मला आपण एखाद्या परग्रहावर आलो आहोत, असं वाटत होतं. पण तरीही मला तिथे परकेपणा वाटत नव्हता. खूप लांब पल्ला चालल्यानंतर अखेर मी त्या गावच्या शाळेत पोचले. वाटेत भेटलेले गावकरी माझ्याकडे टक लावून बघत होते... आणि तरीही मला परकेपणा वाटला नाही.



त्या शाळेत जाऊन पोचणं, हेच एक मोठं धाडसाचं काम होतं. एक स्त्री डोक्यावर हारीने तीन घागरी एकावर एक ठेवून लयबद्ध चालत निघाली होती. मी तिला थांबवून विचारलं, 'शाळेला जायचा रस्ता कोणता ?' तिने आश्चर्यचकित झाल्यासारखा आवाज काढला, माझ्याकडे टक लावून पाहिलं आणि निघून गेली. बहुधा तिला शहरातून आलेल्या नवख्या व्यक्तीशी बोलायचं नसावं. नाही तर कदाचित तिला माझी भाषा समजली नसेल.

मग मला एक म्हातारा भेटला. तो वेताची टोपली विणत बसला होता. तो तोंडाने कसलेसे गाणे- लोकगीत गुणगुणत होता. मी त्याच्यापाशी वाकले आणि मोठ्या व स्पष्ट आवाजात विचारलं, 'शाळा कुठे आहे ?' त्याच्या चेहऱ्यावर उत्सुकता स्पष्ट उमटली होती. त्याला बहुधा मला बरंच काही विचारायचं असावं. पण त्यानं काहीच विचारलं नाही. तो आपल्या स्वत:च्या भाषेत काहीतरी पुटपुटला आणि त्याने शाळेच्या दिशेने हात केला.

शाळा म्हणजे एक जुने गवताने शाकारलेले घरच होते. त्या आदिवासींनी स्वत:च बांधल्यासारखे वाटत होते. ती प्राथमिक शाळा होती. काही मुले बाहेरच्या बाजूला खेळताना दिसत होती. पलीकडे एक शेडवजा काहीतरी उभारलेले होते. त्याखाली बसून काही मुले गवताच्या काड्या आणि पाने घेऊन काही वस्तू बनवत होती.

मी आत शिरले. आत एक खोली होती. खोलीत दोन खुर्च्या, दोन टेबले आणि एक फळा होता. शेजारी पाण्याने भरलेला माठ होता. खोलीत दिवे किंवा पंखे नव्हते. भिंतीला एक झडप असल्यासारखे भोक होते. ती खिडकी होती. खोलीत हवा, खेळती राखण्यासाठी एवढीच काय ती व्यवस्था होती.

ते ऑफिस असल्यासारखं दिसत होतं, पण त्याच्या आत कुणीच नव्हतं. कोणी शिक्षक, किंवा कर्मचारी नव्हते. मी आजूबाजूला कोणी दिसतंय का, ते पाहात होते, इतक्यात एक म्हातारा माणूस माझ्यापाशी चालत आला. मला काय पाहिजे, वगैरे चौकशी त्याने केली. मी माझी स्वत:ची ओळख करून दिली. आम्ही या शाळेसाठी काही मदत वगैरे देऊ शकतो का, ते पाहण्यासाठी मी आले असल्याचं त्याला सांगितलं. त्यावर त्याची प्रतिक्रिया मात्र फारशी उत्सावर्धक नव्हती. मला वाटलं, आपण जरा बेताबेताने, गोडीगुलाबीने याची चौकशी केली

तर हा मोकळेपणे बोलेल. म्हणून मग मी त्याची खुशाली वगैरे विचारायला, त्याच्या स्वत:विषयी चौकशी करायला सुरुवात केली.

तो त्या शाळेचा शिपाई आणि वॉचमन होता. तो तिथेच राहात असे. कधीतरी तो आलेल्या प्रवाशांना प्रेक्षणीय स्थळे दाखवणारा गाईड म्हणूनही काम करायचा. तो त्या शाळेचा किंवा सरकारचा पगारी नोकर नव्हता. त्याचा नातू त्या शाळेत मोफत शिकत होता व त्याबद्दल तो म्हातारा पडेल ते काम करत असे. 'तुम्ही इथे किती वर्षं राहात आहात ?' 'बरीच वर्षे' तो म्हणाला. तो शाळेच्या आवारातच एका छोट्याशा झोपडीत राही.

आता जरा त्याचा माझ्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन सुधारलेला दिसला. मग मी हळूच परत एकदा शाळेच्या कारभाराचा विषय काढला. ही शाळा राज्य सरकार चालवत असल्याचं त्यानं सांगितलं. शाळेत एकूण दोन शिक्षक होते आणि जवळपासच्या गावातून पन्नास विद्यार्थी शिकायला येत होते. शाळेत गणवेशाची सक्ती नव्हती. शाळेत एवढे विद्यार्थी शिकायला येतात हे ऐकून मला बरं वाटलं. किती झालं तरी त्या मुलांचे पालक स्वत: अशिक्षित शिवाय किती दारिद्र्यात जगत होते ! पण तरीही आपल्या मुलांना शिकवण्याची त्यांची तयारी होती.

'ही शाळा चालवायला तुम्हाला कोणत्या कोणत्या अडचणी येतात ?'

त्यावर त्या म्हाताऱ्याने विशेष काही सांगितले नाही. तो मला जवळच्या झोपडीत घेऊन गेला आणि एका खूपच वयोवृद्ध माणसाशी माझी ओळख करून दिली. तोच त्यांचा ठंडाप्पा होता, तो नव्वद वर्षांहूनही अधिक वयाचा असावा. मला पाहून त्याला आनंद झाला.

मी त्याला परत तेच विचारलं, 'ही शाळा चालवायला तुम्हाला कोणत्या कोणत्या अडचणी येतात ?'

'पावसाळ्याच्या दिवसांत शाळेपर्यंत यायचं कसं हा एक प्रश्नच असतो,' तो म्हणाला. 'शिवाय पावसाळ्यात शाळेला घालायचे कपडे वाळत नाहीत. ही तर नेहमीचीच अडचण.' मी आजपर्यंत अनेक लोकांना भेटले, अनेकांशी बोलले. ही अडचण मी अनेकदा ऐकली आहे.

एकंदरीत तेथील लोकांविषयी, त्यांच्या जीवनाविषयी बऱ्यापैकी माहिती काढून घेऊन मी परतले. परतण्याआधी त्या लोकांनी केलेल्या सहकार्याबद्दल त्यांचे आवर्जून आभार मानले. आता परत यायचं ते या मुलांसाठी छत्र्या आणि कपडे घेऊन यायचं, असं मी मनाशी ठरवलं.

मी तेथे परत गेले तेव्हा हिवाळा होता. पाऊस संपला होता. आता सगळंच



दृश्य पालटलं होता. आता ते सारं जणू नंदनवनासारखं भासत होतं. आता चिखल नव्हता की बेडकांचं कर्कश ओरडणं नव्हतं. पक्षी कूजन करत होते. आभाळ स्वच्छ होतं. लाल फुले सर्वत्र फुलली होती. परत एकदा मी त्याच ठंडाप्पाला जाऊन भेटले. त्यानं मला लगेच ओळखलं आणि तो हसला. त्याच्या डोळ्यांतही मनापासून स्वागत होते.

'मी इथल्या मुलांसाठी काही वस्तू आणल्या आहेत. त्या कृपया ठेवून घ्या. गेल्या वेळी मी इथे आले, तेव्हा त्यांच्यासाठी काय आणायचं, तेच मला माहीत नव्हतं.' असं म्हणून मी एक भली मोठी पिशवी त्याच्या हातात ठेवली.

ठंडाप्पा थोडा घुटमळला. त्याला कदाचित अवघड वाटत असावं, असं मला वाटलं. मी म्हणाले, 'तुम्ही माझ्याकडे काहीच मागितलेलं नाही. मी आपण होऊन या वस्तू आणल्या आहेत. पावसाळ्यात मुलांना या गोष्टींचा उपयोग होईल. मुलांच्या मापाप्रमाणे यातून त्यांच्यासाठी कपडे शिवून घ्या.'

त्यावर तो एक अक्षरही न बोलता उठून त्याच्या झोपडीकडे चालत गेला.

'तुम्हांला काय शिकायचंय ?' मी जवळ उभ्या असलेल्या मुलांना विचारलं.

पण कुणीच काही बोललं नाही. खूप मनधरणी केल्यावर काही लहान मुलं जरा जवळ आली. पण अजूनही ती खूप बुजत होती, बोलायला तयार नव्हती. मी परत परत त्यांना बोलतं करण्याचा प्रयत्न केल्यावर त्यांच्यातला एकजण म्हणाला, 'आम्ही कॉम्प्युटरविषयी ऐकलंय. पण आम्ही तो कसा असतो, ते काही अजून पाहिलं नाही. फक्त टी. व्ही.वरच पाहिलंय. तुमच्याकडे कॉम्प्युटरसंबंधी कन्नडमधे लिहिलेलं एखादं पुस्तक आहे ?'

मी एका शिक्षकाची मुलगी, त्यात स्वत:ही शिक्षक त्यामुळे त्या मुलांचं बोलणं ऐकताच मला अक्षरश: हर्षवायू झाला. त्यांच्या कल्पना इतक्या ताज्या, टवटवीत होत्या, की मला आश्चर्यच वाटलं. या इतक्या मागास भागात राहूनसुद्धा किती आधुनिक विचार होते त्यांचे !

'मी बंगलोरला गेल्यावर असं एखादं पुस्तक मिळतं का, ते नक्की पाहीन,' मी त्यांना सांगितलं. 'आणि असं पुस्तक जर का नाहीच मिळालं, तर मीच तुमच्यासाठी पुस्तक लिहीन.' ते ऐकून ती मुले खुष झाली. मलाही आनंद झाला. एवढ्यात ठंडाप्पा आपल्या झोपडीतून परत आला. त्याच्या हातात लाल रंगाच्या कसल्याशा सरबताने भरलेली बाटली होती.

'अम्मा,' असं म्हणून त्याने ती बाटली माझ्या हातात ठेवली. 'तुम्ही घरी काय पिता, तुम्हाला काय आवडतं, ते काही आम्हांला माहीत नाही. आम्ही या

जंगल भागात उन्हाळ्याच्या दिवसांत हे एक खास पेय तयार करतो. ते किमान दोन पावसाळे तरी टिकतं. उन्हाळ्यात इथे लाल रंगाची रानटी फळं येतात. त्या फळांचा रस काढून तो आम्ही साठवून ठेवतो. त्या रसात आणखी काहीही घालत नाही. हा रस तब्येतीला फार चांगला असतो. पेलाभर पाण्यात जरासा रस टाकून ढवळून प्यायचा.'

मला फारच अवघडल्यासारखं झालं. या इतक्या गरीब लोकांकडून मी भेट कशी स्वीकारू ? त्यांना स्वत:लाच खायला पोटभर अन्न नव्हतं. शिवाय मी स्वत: इथे देण्यासाठी आले होते, दानधर्मासाठी... घेण्यासाठी नव्हे. मी जरासा विचार केला आणि नम्रपणे त्याला नकार दिला.

त्यावर ठंडाप्पा गंभीरपणे म्हणाला, 'तसं असेल, तर अम्मा, आम्ही पण तुमची भेट स्वीकारू शकत नाही. आमचे पूर्वज पिढ्या न् पिढ्या या रानात राहिले. त्यांनी त्यांच्या पद्धती आम्हांला शिकवल्या. तुमची आम्हांला काहीतरी देण्याची इच्छा आहे ना... आम्ही ते घेऊ. पण त्याचबरोबर आम्ही जे देऊ, ते तुम्हीसुद्धा घ्यायला पाहिजे. तुम्ही आमची भेट जर स्वीकारणार नसाल, तर आम्हीसुद्धा तुम्ही आणलेल्या या गोष्टी घेऊ शकत नाही.'

मला ते ऐकून धक्का बसला. अवघडल्यासारखं झालं आणि लाज वाटली. आजवर असा अनुभव कधीच आलेला नव्हता, त्यामुळे हे असं ऐकावं लागेल याची मनाशी तयारी नव्हती. साधारणपणे एखादी धर्मादाय संस्था काही मदत देऊ शकते, तेव्हा लोक कृतज्ञता व्यक्त करतात, अशी नेहमीची पद्धत. कधी कधी तर तक्रारी- सुद्धा ऐकायला मिळतात. एखाद्या व्यक्तीला किंवा संस्थेला काही अडचणी असतात.. त्यांतील एखादी अडचण दूर करण्याचा आम्ही प्रयत्न करतो. पण कित्येकदा आम्ही जी काही मदत केली असेल त्याविषयी कृतज्ञता व्यक्त करणं तर राहोच... पण जे करायचं राहिलं असेल त्याविषयी तक्रारसुद्धा ऐकायला मिळते. कधीतरी तर असंही घडलेलं आहे, की ज्यांना मदत केली, त्यांनी इतकी कमी रक्कम दिल्याबद्दलसुद्धा कुरकुर केलेली आहे. असं जे काही घडलेलं आहे, ते मी फारसं कधीही मनाला लावून घेतलेलं नाही. मी देण्यात समाधान मानलेलं आहे... त्यावर लोकांच्या प्रतिक्रिया काय आहेत, याचा विचार मी कधी केला नाही.

या इथे, सह्याद्रीच्या जंगलात हा म्हातारा आदिवासी, शाळा न शिकलेला हा माणूस... जीवनाचं हे एवढं मोठं तत्त्वज्ञान स्वत: प्रत्यक्ष जगत होता. जेव्हा तुम्ही घेऊ शकाल तेव्हाच द्या... काहीतरी दिल्याशिवाय घेऊ नका.

संस्कृती आपल्या सर्वात सुंदर स्वरूपात इथे बघायला मिळाली. ही संस्कृती



व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये शिकवत नाहीत. मी हसून त्याची ती भेट आनंदाने स्वीकारली. त्यावर त्याचे डोळे चमकले आणि तो हसून म्हणाला, 'घेण्यातसुद्धा मोठेपणा असतो.' त्याचे ते शब्द ऐकून माझ्या मनातला त्याच्याविषयीचा आदरभाव द्विगुणित झाला.

OOO

# ४

# शोकविरहित मरण

बंगलोरसारख्या मोठ्या शहरात, रोजच्या धकाधकीच्या जीवनात आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांशी पुरती ओळखसुद्धा होत नाही. आपण सर्व जण आपापल्या कामात इतके व्यस्त असतो, की बरेचदा विचार करायलाही वेळ नसतो.

असंच एकदा आमच्या शेजाऱ्यांच्या घरात कोणीतरी वारल्याचं माझ्या कानावर आलं. माझी काही त्यांच्याशी नीटशी ओळख नव्हती, पण तरीही मी त्यांच्या सांत्वनासाठी जावं, असं माझ्या आईचं मत होतं. काही झालं तरी ही जनरीत आहे, असं तिचं म्हणणं.

मी ते मान्य केलं खरं, पण बरेच दिवस मला त्यांच्याकडे जायला जमलं नाही. वेळच नाही झाला. दिवस सगळा धावपळीत जायचा आणि अशा कामासाठी रात्री जाणं बरं दिसत नाही. त्यामुळे माझं त्यांच्याकडे सांत्वनासाठी जाणं बरंच लांबलं. पण तरीसुद्धा त्यांच्याकडे जाण्याची गोष्ट माझ्या मनातून काही गेली नव्हती. आपण कसंही करून आपल्या शेजाऱ्यांकडे जाण्यासाठी वेळ काढायचाच, असं मी ठरवलं होतं.

असे दहा दिवस लोटले. आता आज मात्र काहीही झालं तरी आपण शेजाऱ्यांना भेटायला जायचंच, असा एका रविवारी मी मनाशी निश्चय केला. त्यांच्या घरच्या फक्त पुरुषाशीच काय ती माझी ओळख होती, व तीसुद्धा अगदी जेमतेम.

मी फाटक ओलांडून त्यांच्या घराजवळ पोचले, तर आतून एका कन्नड चित्रपटातील गाण्याच्या ओळी ऐकू आल्या. बाहेरच्या बागेत मुलं लपाछपी खेळत होती. बागेत काही मोठी माणसं गप्पागोष्टी करत आरामात बसली होती. ती बहुधा खेड्यातून आली असावीत.

क्षणभर मला वाटलं, आपण चुकीच्या घरात आलो आहोत की काय !



अशा चुका कधीतरी क्वचित घडतात. (काही दिवसांपूर्वी मी माझ्या एका विद्यार्थिनीच्या लग्नाला गेले होते. जयनगरला, अशोक स्तंभाजवळ सागर मंगल कार्यालयाचे हॉल्स आहेत, तिथे. त्या ठिकाणी ओळीने चार हॉल्स आहेत. माझ्या विद्यार्थिनीचं लग्न नक्की कुठल्या हॉलमध्ये आहे, तेच मी विसरले, तिचं नाव होतं उषा. एका फुलांनी सजवलेल्या कमानीवर वधूवरांची नावं लिहिलेली होती. त्यांपैकी दोन ठिकाणी वधूचे नाव उषाच होते. माझ्या विद्यार्थिनीच्या होणाऱ्या पतीचं नावही मला आठवत नव्हतं. काय करावं तेच मला सुचेना. मग मी तशीच तिथे कोणी ओळखीचा चेहरा दिसतो का याची वाट बघत खोळंबून उभी राहिले.)

आता इथे माझ्या शेजाऱ्यांच्या घरातील गाणे, संगीत व एकंदर आनंदी वातावरण इतके अनपेक्षित होते की आपण परत फिरावं आणि घरी जाऊन आईकडून नीट पत्ता घेऊन मगच परत यावं, असं मला वाटलं. इतक्यात त्या घरचे कुटुंबप्रमुख बाहेर आले व त्यांनी मला पाहिलं.

मला पाहून ते आश्चर्याने मोठ्यांदा म्हणाले, 'काय आश्चर्य ! आत या ना. मला वाटतं, आज पहिल्यांदाच तुम्ही आमच्याकडे येताय ना ?'

आता आत जाण्यावाचून दुसरा काही पर्यायच नव्हता. ते आपल्या पत्नीला बोलावण्यासाठी आत गेले. त्यांचं ते मोठं थोरलं घर, त्यातील सामानाची मांडणी इत्यादी गोष्टींकडे नकळत माझं लक्ष गेलं. बैठकीची खोली बरीच मोठी होती. एका कोपऱ्यात टी. व्ही. आणि व्ही. सी. आर. होता. व्हीडिओवर 'कहो ना प्यार है' चित्रपट चालू होता. समोर मोठी चटई अंथरून बरीच मुले बसली होती. काही मुले सोफ्यांवरही होती. सर्व जण चित्रपट पाहण्यात गुंग होते. आम्हांला बसायला कुठेच जागा नव्हती. मग त्या घरमालकाने काही मुलांना जमिनीवर बसायला लावलं, आणि थोडी जागा केली.

टी. व्ही.च्या पडद्यावर देखण्या हृतिक रोशनचे नृत्य चालू होते. आजूबाजूच्या मुलांनी पायांनी ताल धरला होता.

इतक्यात एक नोकर ट्रेमधे चहा आणि खाण्याचे पदार्थ घेऊन आला. आता काय करावं ? माझ्यापुढे प्रश्न पडला. मी तर इथे वेगळ्याच कारणासाठी आले होते. अशा वेळी इथे फराळाचा समाचार घेणं बरं दिसेल का ?

एकीकडे मनातून वाटत होतं, आता आपण इथे काही खाणं योग्य नव्हे. पण त्याच वेळी असाही विचार मनात चमकून गेला, की आपण नाही म्हटलं, तर तो उद्धटपणा तर ठरणार नाही ? मग मी पटेल अशी एक सबब सांगितली. 'माझी अजून आंघोळ व्हायची आहे, त्याआधी मी काही खात नाही.' मी म्हणाले.

पण त्यानेही माझ्यापुढील खरी समस्या काही सुटली नव्हती. त्या घरातील वातावरण एखाद्या सणासुदीला असावे तसे होते. कुठेही दु:खाचा किंवा शोकाचा लवलेशही दिसत नव्हता. मग मी सांत्वन कसं, कोणत्या शब्दांत करू ? सुरुवात कशी करू ? त्या घरात जणू काही कोणाच्या साखरपुड्याच्या किंवा वाढदिवसाच्या निमित्ताने सगळी मंडळी एकत्र जमली आहेत, असं वाटत होतं आणि इथे मी सांत्वनासाठी आले होते.

एवढ्यात त्या घरची गृहिणी बाहेर आली आणि आपल्या पतीच्या शेजारी सोफ्यावर बसली. मग त्यांनीच संभाषणाला सुरुवात केली. 'तुमचं काम पाहून आम्हांला खूप आनंद वाटतो. आमच्याकडे रोज बोलण्यात तुमचाच विषय असतो. आम्हांला तुमचा अभिमान वाटतो.'

मी बुचकळ्यात पडले. या लोकांना रोज माझ्याविषयी बोलायची काय गरज आहे ? मी स्वत: रोज कुणाविषयीही बोलत नाही. अगदी माझ्या पतीविषयीसुद्धा नाही. मग हे कशाविषयी बोलत असतील बरं ? माझ्या लेखनाविषयी ? की माझ्या समाजकार्याविषयी ?

मी शांत बसून आहे, हे त्यांच्या लक्षात आले. पण तरीही ते दोघे भरभरून बोलतच होते.

'तुमचे यजमान कसे आहेत ? ते खरोखरच फार मोठे आहेत.'

या घरी मी समाचारासाठी आलेली असताना संभाषणात माझ्या पतीचं नाव निघावं याचा मला धक्का बसला.

त्या दोघां पतीपत्नींना खूप बोलायचं होतं. ती स्त्री म्हणाली, 'मी एक दिवस तुम्हाला पाहिलं. तुम्ही फार सुंदर साडी नेसला होता. मला वाटतं, पटोला साडी होती. पटोला होती, की ओरिसा ? कारण दोन्ही साड्यांचे पॅटर्न साधारण सारखेच असतात.'

ती कोणत्या साडीविषयी बोलत होती ते काही माझ्या लक्षात येईना. 'कदाचित ओरिसा असेल,' मी आपली बोलायचं म्हणून बोलले.

तिचा चेहरा खुलला. ती विजयी मुद्रेनं म्हणाली, 'बघा माझंच म्हणणं खरं होतं. मी सुमनला म्हटलंच होतं. त्या ओरिसात खूप कार्य करतात, तेव्हा त्यांनी तिकडेच घेतली असेल ती साडी. काय सुंदर रंगसंगती होती त्या साडीची.'

आता त्या नवऱ्यानं तोंड उघडलं. 'तुमची कंपनी फारच जोरात आहे. डॉटकॉमच्या लाटेत न सापडलेल्या अगदी मोजक्या कंपन्यांपैकी एक आहे. आय. टी. कंपन्यांचा गेल्या सहा महिन्यांतला ट्रेंड नीट बारकाईने पाहा, असं मी माझ्या



काही मित्रांना म्हणालोच होतो.'

खरं तर या सगळ्याशी माझा काहीच संबंध नव्हता. या विषयावर माझे पती काहीतरी भाष्य करू शकलेही असते, पण ते आता उपस्थित नव्हते.

आता पत्नी बोलायला पुढे झाली. 'तुमच्या कॉलेजात प्रवेशासाठी काय करावं लागतं ? दहावीत जर पंच्याऐंशी टक्के मार्क असले, तर प्रवेश मिळेल ?'

'हं, पण एस्. एस्. सी. नाही हं, आय. सी. एस्. ई मधे' तिच्या नवऱ्याने खुलासा केला. एस्. एस्. सी. आणि आय. सी. एस. ई. ही दोन वेगळी बोर्ड आहेत, असं त्याने स्पष्ट केलं.

'मला माहीत नाही. प्रवेशाबाबतच्या गोष्टी जी कमिटी हाताळते, त्यात मी नाहीये.' मी सांगितलं.

अशा गप्पा चालूच राहिल्या. त्या संपायलाच तयार नाहीत.

थोड्या वेळाने मी विचारात पडले, नक्की कोण बरं वारलं असावं ? मला आठवत होतं, त्याप्रमाणे त्या माणसाची आई वारली होती. ती माझ्या आईची मैत्रीण होती. पण तो विषय काढणार तरी कसा, असा माझ्यापुढे प्रश्न पडला. कदाचित त्याच्या बायकोची आई वारलेली असली तर ? मला बोलताना सावधगिरी बाळगली पाहिजे.

मी गप्प बसले आहे, हे त्यांच्या नक्कीच लक्षात आलं होतं. पण तरीही काही करून मला संभाषणात ओढायचंच, असा त्यांनी चंग बांधला होता. त्या सर्व प्रकाराने मला फारच अवघडल्यासारखं झालं. आज बहुतेक आपल्याला समाचाराचे चार शब्द बोलण्याची संधीच मिळणार नाही, असं दिसतंय - माझ्या मनात आलं. पण निघण्याआधी एक शेवटचाच प्रयत्न मी करायचं ठरवलं.

आम्ही बोलत बोलत बाहेरच्या फाटकापाशी पोचल्यावर मी चाचरत विषय काढला.

'तुमच्या आई आजारी होत्या, असं ऐकलं...'

नवऱ्याने बोलायला तोंड उघडायच्या आतच बायको म्हणाली, 'हो. माझ्या सासूबाई बरेच दिवस आजारी होत्या. पण आमच्यात खूप प्रॉब्लेम्स होते. त्या इतक्या जुनाट विचारांच्या होत्या, आणि तडजोड करायला तयारच नसायच्या. हे पुरुष जातात ऑफिसला निघून आणि आम्हां बायकांना घरी काय काय अडचणींना तोंड द्यावं लागतं, ते यांना कधी समजतच नाही.'

यानंतर तिने आपल्या सासूविषयी पुष्कळ गाऱ्हाणी सांगितली आणि सर्व वेळ तो नवरा अपराधी चेहऱ्याने उभा होता.

'तिनं खूप सोसलं...' अखेर तो मधे पडून म्हणाला.

'खरं तर, आम्हीच खूप सोसलं.' ती बाई रागाने म्हणाली. 'गेले काही दिवस त्या पक्षाघाताने अंथरुणाला खिळून होत्या. बंगलोरसारख्या शहरात अशा लोकांना सांभाळायचं, म्हणजे नोकर लागतात आणि आजकालच्या दिवसांत नोकर मिळणं किती कठीण झालंय, किती पैसे मोजावे लागतात ते तुम्हाला माहीत आहे. मी तर त्यांचं सगळं करून करून इतकी कंटाळून गेले होते. बरं झालं, गेल्या ते.' त्या स्त्रीचा आवाज मला कर्णकटू वाटला.

'मृत्यूने आम्हां सर्वांनाच सोडवलं. माझ्या आईचीसुद्धा यातनांमधून सुटका झाली,' तो नवरा म्हणाला.

मी परतले ती दु:खी होऊन, अस्वस्थ होऊन.

आमचं आयुष्य इतकं धकाधकीचं व्हावं, की मृत व्यक्तीचा आपल्याला कितपत उपयोग होता त्या प्रमाणात त्या व्यक्तीच्या मरणाने आपल्याला होणाऱ्या दु:खाची तीव्रतासुद्धा कमी-अधिक व्हावी ?

ooo



५

# जेव्हा ताळेबंद जुळला नाही...

माझे वडील डॉक्टर होते आणि ते स्त्रीरोग व प्रसतूतीशास्त्र शिकवणारे विख्यात प्रोफेसर होते. ते वर्गात कधीच मोठमोठी, कंटाळवाणी व्याख्याने देत नसत. उलट येताजाता विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष घडलेल्या घटना, किस्से यांचे दाखले देऊन आपल्या लेक्चरमधे रंग भरण्याचा प्रयत्न करत. स्वाभाविकच त्यांच्या तासाला विद्यार्थ्यांची नेहमी गर्दी असायची.

एकदा मी त्यांना विचारलं, 'तुम्ही मेडिकलच्या वर्गात एवढ्या गोष्टी कशासाठी सांगता ?'

'पंचतंत्र का लिहिण्यात आलं, तुला माहीत नाही ?' त्यांनी उत्तरादाखल मलाच प्रश्न केला.

'पण पंचतंत्राचं उदाहरण इथे तितकंसं बरोबर नाही.' मी म्हणाले. 'ते शाळेत जाणाऱ्या लहान मुलांसाठी आहे, मेडिकलच्या विद्यार्थ्यांसाठी नव्हे.'

माझ्या वडिलांना काही ते पटलं नाही. 'मी गोष्टी सांगितल्या की माझ्या विद्यार्थ्यांना विषय समजण्यास सोपे पडते. दुसरं असं की एखादं व्याख्यान कितीही रसपूर्ण असलं तरीसुद्धा कोणत्याही विद्यार्थ्याचं लक्ष पंचेचाळीस मिनिटांहून जास्त काळ खिळवून ठेवता येणं शक्य नसतं. त्यामुळेच मी जर मधूनमधून अशा गोष्टींची पेरणी केली, तर मी त्यांचं लक्ष चांगलं तास-दोन ताससुद्धा विचलित न होता खिळवून ठेवू शकतो.'

त्यांनी सांगितलेली एक गोष्ट इथे देत आहे. माझ्या वडिलांच्या सांगण्यानुसार ही हकीकत इंग्लंडमधे घडलेली आहे.

वैद्यकीय परिभाषेत ऑपरेशन थिएटरला 'ओटी' असं म्हणण्याची पद्धत आहे. कोणत्याही हॉस्पिटलमधे 'ओटी-नर्स' ही एक अत्यंत जबाबदार व्यक्ती असते व ती बरीच वरिष्ठ पदावर असते. सर्व डॉक्टर्स व सर्जन्स तिच्याशी सन्मानाने

वागतात. ओटी-नर्सचं पद सामान्यतः बऱ्याच अनुभवी व वयस्कर नर्सेसनाच देण्यात येतं.

एकदा एक अतिशय ख्यातनाम व अनुभवी सर्जन एका पेशंटचं ऑपरेशन करत होते. नेमकी त्या दिवशी नेहमीची ओटी नर्स रजेवर होती. तिच्या जागी त्या दिवशीपुरती एक बावीस वर्षांची तरुण नर्स काम करत होती. ती नुकतीच नर्सिंगची परीक्षा उत्तीर्ण झाली होती, पण चांगली चुणचुणीत होती व कामात हुशार होती.

कोणतंही ऑपरेशन सुरू करण्याआधी थिएटर नर्स ट्रेमधील (रक्त पुसण्यासाठी तयार केलेले) बोळे मोजून ठेवत असते. त्याला मॉप असं म्हणतात. मॉप म्हणजे स्टरलायझरमधे शुद्ध केलेले कापडी घड्यांचे बोळे. ऑपरेशन संपल्यानंतर वापरलेले आणि न वापरलेले बोळे परत एकदा मोजण्यात येतात. ऑपरेशन सुरू करण्यापूर्वीची बोळ्यांची संख्या आणि ही संख्या एकच असावी लागते. चुकून ऑपरेशनच्या वेळी रोग्याच्या शरिरात एखादा बोळा विसरण्याची चूक घडू नये, म्हणून ही खबरदारी घेणं अत्यावश्यक असतं.

आत्ताही ऑपरेशन व्यवस्थित पार पडलं. आता सर्जन टाके घालून रुग्णाची जखम शिवून टाकणार होते, त्याआधी त्यांनी सवयीने विचारले, 'सिस्टर, बोळे मोजलेत ना ? ताळेबंद जुळला ना ? मग आता मला टाके घालायला सुई द्या बरं.'

त्यावर त्या तरुण नर्सने बोळे मोजून पाहिले आणि म्हणाली, 'सॉरी डॉक्टर, पण एका बोळ्याचा फरक पडतोय.'

त्या सर्जनने रुग्णाच्या पोटात बोळा शोधण्यास सुरुवात केली, पण बोळा सापडेना. 'सिस्टर, इथे तर बोळा सापडत नाहीये,' ते त्या नर्सला म्हणाले. आता त्या नर्सने इकडेतिकडे, ऑपरेशन थिएटरमधे सर्वत्र तो बोळा धुंडाळण्यास सुरुवात केली, पण तो सापडण्याचे नाव नाही.

ती चांगलीच काळजीत पडली. जर बोळ्यांच्या संख्येचा ताळेबंद जुळला नाही तर सर्जन त्या रुग्णाचं पोट शिवून तरी कसं टाकणार ?

ते सर्जनसुद्धा काळजीत पडले. जर बोळा सापडत नसेल, तर त्याचा अर्थ त्या नर्सची ऑपरेशनपूर्वी बोळे मोजताना चूक झाली असणार, असं त्यांचं म्हणणं होतं. पण आपण बोळे मोजताना कोणतीही चूक केलेली नाही अशी त्या नर्सला पक्की खात्रीच होती व ती वारंवार तसं सांगत होती.

आता ते सर्जन फार अस्वस्थ झाले. ते म्हणाले, 'जाऊ द्या. आता जास्त वेळ घालवू नका. मला (जखम शिवण्यासाठी) सुई आणि कॅटगट द्या बरं.'

पण त्या नर्सला ते पटेना. ती सौम्यपणे पण ठाम स्वरात म्हणाली, 'नाही



सर. तो हरवलेला बोळा जोपर्यंत सापडत नाही, तोपर्यंत मला सुई आणि कॅटगट देता येणार नाही.'

त्या सर्जनने आपला संताप कसाबसा आवरला व रोग्याच्या पोटात त्या बोळ्याचा परत एकदा कसून शोध घेतला. अखेर ते जरा जोरात म्हणाले, 'मी येथील वरिष्ठ अधिकारी आहे. माझीही काही जबाबदारी आहे. तुम्ही मला जखम शिवण्याची सुई आणि कॅटगट द्यावा, असा मी तुम्हाला हुकूम देत आहे.'

आता काय करावं, असा प्रश्न त्या नर्सला पडला. पण तरीही आपल्या मताशी ठाम राहिली.

आता ते सर्जन फार संतापले, 'तुम्ही जर माझं म्हणणं ऐकलं नाही, तर हे ऑपरेशन झाल्यावर मी तुम्हाला डिसमिस् करीन.' ते म्हणाले.

आता ती नर्स काळजीत पडली. ती तिच्या घरी सर्वांत मोठी होती व एकटीच मिळवती होती. आज जर तिची नोकरी गेली असती तर फार कठीण परिस्थिती ओढवली असती, पण तरीही तिने आपल्या तत्त्वाशी तडजोड केली नाही. तिच्या मते जे योग्य होते, त्याच्याशी ती प्रामाणिक होती. ती परत म्हणाली, 'सॉरी सर, पण सुई आणि कॅटगट देणं शक्य नाही.'

आता फारच कठीण प्रसंग. या अननुभवी नर्सने आपले म्हणणे धुडकावून लावावे हे त्या सर्जनना सहन झाले नाही. ते इतके क्रोधित झाले, की त्यांना काय करावे, ते कळेना. त्यांनी वैतागून, अस्वस्थ होऊन खाली जमिनीकडे नजर वळवली आणि बघतात तर काय... तो रक्तलांच्छित कापडी बोळा रणांगणावर जखमी झालेल्या सैनिकासारखा जमिनीवर पडलेला होता.

त्यांचा जीव भांड्यात पडला. समस्या सुटली होती. 'हे पाहा.. तो बोळा इथेच आहे.' ते उद्गारले. 'ताळेबंद जुळला एकदाचा. आता मला द्या बरं ती...' त्यांच्या तोंडून सुई हा शब्द बाहेर पडायच्या आत त्यांच्या हातात सुई आणि कॅटगट आले होते.

सर्व काही व्यवस्थित पार पडल्यावर त्या सर्जननं त्या तरुण नर्सला जवळ बोलावलं व तिचं कौतुक केलं. ते म्हणाले, 'आय ॲम सॉरी. मी तुमच्यावर उगीच दबाव आणला. पण काय हो.. मी जेव्हा तुम्हाला डिसमिस् करण्याची धमकी दिली तेव्हा तुम्ही मनातून घाबरलात का ? आणि मी जेव्हा म्हटलं, जे काही घडेल त्याची जबाबदारी माझी, तेव्हा तुमचा माझ्यावर विश्वास नाही बसला माझ्यावर ? हा एवढा दबाव तुमच्यावर असूनही तुम्ही क्षणभरही विचलित नाही झालात ?'

त्यावर ती जरा चाचरत म्हणाली, 'सर, आम्हांला आमच्या शिक्षकांनी असं

शिकवलं होतं, की बोळ्यांच्या संख्येचा ताळेबंद जर जुळत नसेल, तर कोणत्याही परिस्थितीत सर्जनच्या हातात जखम शिवण्याची सुई आणि कॅटगट द्यायचा नाही. कोणतेही अनुभवी शिक्षक आपल्याला काहीतरी सांगतात तेव्हा त्या पाठीमागे तसंच काहीतरी सबळ कारण असतं. मी फक्त माझ्या शिक्षकांच्या शिकवणीचं पालन केलं.'

त्यावर त्या सर्जनना अत्यानंद झाला व विस्मयही वाटला.

ही गोष्ट सांगितल्यावर माझे वडील म्हणत, 'लक्षात ठेवा, प्रत्येक रुग्ण हा अनमोल असतो. तेव्हा काळजी घ्या. त्या रुग्णाचा मृत्यू झाला तर डॉक्टरच्या दृष्टीने हॉस्पिटलात घडलेला आणखी एक मृत्यू एवढाच त्या गोष्टीचा अर्थ असतो. पण त्याच्या कुटुंबीयांच्या दृष्टीने मात्र ती एक न भरून काढता येणारी पोकळी असते. कुटुंबातील प्रत्येक घटकाला स्वतंत्र अस्तित्व असते.'

त्यांचं म्हणणं किती खरं होतं.

ooo



६

# म्हाताऱ्याकडून मिळालेला ज्ञानाचा वसा

ओरिसा हे राज्य सुंदर घनदाट जंगलांसाठी आणि चिलका सरोवरासाठी प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणे तेथील मंदिरेसुद्धा प्रसिद्ध आहेत. प्राचीन भारतीय वास्तुशिल्पांचा अप्रतिम नमुना म्हणजे पुरीचे जगन्नाथ मंदिर आणि कोणार्कचे सूर्यमंदिर.

माझा एका तत्त्वावर दृढ विश्वास आहे. ते तत्त्व म्हणजे आमची कंपनी कोणत्याही प्रदेशात एक डेव्हलपमेंट सेंटर उघडते, तेव्हा त्याचबरोबर आमच्या इन्फोसिस फौंडेशनचे कार्यसुद्धा त्या भागात तात्काळ सुरू झाले पाहिजे. याच कारणाने आमच्या फौंडेशनचे कार्य ओरिसामध्ये सुरू झाले. ओरिसा राज्यात प्रचंड गरिबी आहे व त्या भागात सुमारे १३,५०० बिनसरकारी (एन. जी. ओ) संस्था गरिबांतील गरीबाची मदत करण्यासाठी कार्यरत आहेत.

ओरिसा राज्यात बरेच आदिवासी आहेत. सर्व आदिवासी वस्त्या घनदाट जंगलातील दुर्गम भागात आहेत. त्यांच्या स्त्रिया गडद रंगांच्या साड्या परिधान करतात - पोपटी, गडद पिवळ्या, गडद लाल आणि काळ्याभोर केसांचा अंबाडा घालून त्यात फुले माळतात. ओरिसाच्या जंगलातून प्रवास करत असताना या स्त्रिया दृष्टीस पडणं हा एक सुखद अनुभव असतो.

एकदा मी कलाहंडीला निघाले होते. ते गावही म्हणता येणार नाही, शहरही म्हणता येणार नाही, तिथली खास प्रसिद्ध म्हणता येईल अशी एकही गोष्ट सांगता येणार नाही. माजुर भुंज किंवा कोरापुटप्रमाणेच हीपण एक आदिवासी वस्ती आहे.

असं म्हणतात, की स्वातंत्र्यपूर्ण काळात या कलाहंडीवर एक राजा राज्य करत होता. हा राजाच आपला प्रतिपाळ करणारा, तारणहार आहे असा तेथील आदिवासींचा विश्वास होता व त्या राजाला दैवी शक्ती प्राप्त आहे, अशीही त्यांची समजूत होती. हे आदिवासी इतके निष्पाप आहेत, की राजेशाही संपुष्टात आली असल्याची त्यांना कल्पनाही नाही. अजूनही एखादं मूल अनाथ झालं तर ते त्याला

नेऊन कलेक्टरच्या दारात ठेवून येतात. त्यांच्या दृष्टिकोनातून राजा हा त्यांचा सर्वश्रेष्ठ त्राता असतो.

कलाहंडीचे जिल्ह्याचे ठिकाण म्हणजे भवानी पट्टनम. ते इतर जिल्ह्याच्या ठिकाणांपेक्षा निराळं आहे. ते एक छोटंसं गाव आहे. मी आजपर्यंत जी काही जिल्ह्याची ठिकाणं पाहिली, त्यांपेक्षा ते अगदीच वेगळं आहे, उदाहरणार्थ माझं जन्मगाव, म्हणजे धारवाड. खरं तर हे भवानी पट्टनम इतकं झोपाळलेलं गाव आहे, हे पाहून मला फार आश्चर्य वाटलं.

त्या गावातील अनाथ मुलांसाठी, अविरतपणे काम करत असलेल्या एका एन्. जी. ओ. ला भेटायला मी ते गेले होते. त्याच्या डोक्यावरील प्रत्येक पांढरा केस त्याच्या आयुष्यभराच्या नि:स्वार्थ त्यागाची कहाणी सांगत होता. या अनाथ मुलांची सेवा करताना स्वत:च्या मनात कोणतीही प्रतारणा येऊ नये यामुळे त्याने स्वत: विवाहसुद्धा केला नव्हता.

भुवनेश्वरपासून केसिना या भवानी पट्टनमच्या जवळच्या रेल्वे स्टेशनपर्यंतच्या प्रवासात मी या आदिवासींचं निरीक्षण करत होते. ते आपली ट्रेन येण्याची वाट पाहात अत्यंत शांतपणे प्लॅटफॉर्मवर थांबत. ते अननस, रानटी केळी, बटाटे अशा विविध वस्तू बांधून घेऊन निघालेले असत.

माझ्याबरोबर एक दुभाष्या होता. कोणत्याही भागातील तळागळातील लोकांमध्ये जाऊन काम करायचं, तर त्या भागातील लोकांची भाषा येणं अत्यंत महत्त्वाचं असतं. या आदिवासींविषयी माझ्या मनात हजारो प्रश्न उमटले होते - संस्कृतीविषयी त्यांच्या काय कल्पना होत्या, त्यांची जीवनपद्धती कशी होती इत्यादी. हे आदिवासी नेहमी घोळक्यानेच राहतात, असं मला सांगण्यात आलं होतं. आपण 'सुसंस्कृत' लोक रूढी-परंपरांचा आणि रीतिरिवाजांचा जसा बाऊ करतो, तसा हे लोक करत नाहीत. त्याचं वागणं सरळ, साधं असतं. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे खाजगी मालमत्तेची संकल्पना त्यांच्यात जवळ जवळ आढळतच नाही. या लोकांची जवळून ओळख करून घेण्याची मला तीव्र इच्छा होती. त्या लोकांना कोणत्यातरी मार्गाने काहीतरी मदत करावी व त्याचबरोबर त्यांच्या वैयक्तिक आयुष्यात ढवळाढवळ करू नये, त्यांची स्वत:ची ओळख हरवली जाऊ नये हा माझा उद्देश होता.

या लोकांची गाठ घेण्यासाठी मला किमान दोन मैल पायी चालावं लागेल असं मला माझ्या दुभाष्यानं सांगितलं. त्यांच्या छोट्या घरांपर्यंत पोचायला गाडीचा रस्ताच नव्हता. मी तयार झाले.

बराच वेळ चालल्यावर अखेर एक गाव लागलं. मला एक स्त्री भेटली. मला



तिच्या वयाचा काही अंदाज करता येईना. तिच्या तोंडची बोली भाषा जरा वेगळीच होती, त्यामुळे आमच्या दुभाष्याला तिचं बोलणं मला समजावून सांगण्यास जरा कष्टच पडत होते. ती स्त्री काळीसावळी, काळ्याभोर केसांची होती. ती सहज सत्तर वर्षांची असेल, पण तिच्या डोक्याचा एकही केस पांढरा नव्हता. तिने केसांना रंग वगैरे लावलेला असण्याचा प्रश्नच नव्हता. मग तिचं गुपित तरी काय असावं ? त्या दुभाष्यालाही काही सांगता येईना. पण हे गुपित तिचं एकटीचंच नव्हे तर त्या वस्तीतील प्रत्येकच माणसाचं होतं, कारण त्यांच्यापैकी कुणाचाही एकसुद्धा केस पांढरा नव्हता.

त्यानंतर मला एक म्हातारा माणूस भेटला. मी म्हातारा म्हणते आहे खरी... पण त्याचंसुद्धा वय नक्की किती असावं, ते सांगणं फार कठीण होतं. आमच्या संभाषणात त्याने ज्या काही घडलेल्या घटनांचे संदर्भ दिले, त्यावरून पाहता त्याचं वय सहज एकशेचार वर्षांचं असावं.

या म्हाताऱ्याशी माझं संभाषण चांगलं रंगतदार झालं. मी त्याला विचारलं, 'आपल्या देशावर कुणाचं राज्य आहे ?'

त्याच्या दृष्टीने 'देश' याचा अर्थ कलाहंडी एवढाच होता, हे उघडच होतं. त्याने माझ्याकडे निरखून पाहिलं व माझ्या अज्ञानाला जरासा हसला. 'तुम्हाला माहीत नाही ? आपल्या देशावर 'कंपनी सरकार'चं राज्य आहे.' त्याच्या म्हणण्याचा अर्थ होता 'ईस्ट इंडिया कंपनी.' भारताला स्वातंत्र्य मिळालं आहे, याची त्या म्हाताऱ्याला कल्पना नव्हती.

मग मी त्याला काही रुपयांच्या नोटा दाखवल्या व त्यांच्यावरील अशोकचक्र दाखवलं.

पण त्यांचा त्याच्यावर काहीच प्रभाव पडला नाही. 'हा तर नुसता कागदाचा तुकडा आहे. त्याच्याकडे पाहून थोडंच कळणार आहे, आपल्यावर कुणाचं राज्य आहे ते ? आपल्यावर गोरीवाली राणीचं राज्य आहे.'

इंग्लंडची ती 'गोरीवाली राणी' आता परत गेली आहे व तिचं आपल्यावर राज्य नाही हे मी त्याला पटवून देण्याचा कितीतरी प्रयत्न केला, पण त्याला काही ते पटेना.

आदिवासी जमातीमधे वस्तूंच्या देवाणघेवाणीची पद्धत अस्तित्वात असते व ती खूप महत्त्वाची असते, याची मला पूर्ण कल्पना होती. त्यामुळे मी मुद्दामच त्याला प्रश्न केला. 'हे पाहा, या लहानशा कागदाच्या तुकड्यातून तुम्हाला सरपण, खूप खूप साड्या, मिठाची गोणी, आगपेट्या... अगदी जमिनीचा तुकडासुद्धा

विकत घेता येऊ शकतो, याची तुम्हाला कल्पना आहे का ?'

त्यावर त्याने दया आल्यासारख्या थाटात माझ्याकडे पाहिले आणि म्हणाला, 'या कागदाच्या तुकड्यासाठी तुम्ही लोक आपापसांत भांडता, वाडवडिलांनी ठेवलेल्या जमिनी सोडून दुसरीकडे जाता, आपलं हे जंगल सोडून शहरात जाता. त्या कागदाच्या तुकड्याशिवाय आम्ही इथे इतकी वर्षे जगलोच ना ? आमचे वाडवडीलसुद्धा जगले. आम्ही देवाची लेकरे. या कागदाशिवाय इथे पिढ्यान्‌पिढ्या सुखाने राहात आहोत. ही देवभूमी आहे. ही जमीन कोणाच्याच मालकीची नाही. इथली कोणतीही नदी आम्ही बनवलेली नाही. कोणताही पर्वत आम्ही बनवलेला नाही. वारा आमची आज्ञा पाळत नाही. पाऊस कोसळण्याआधी आमची परवानगी विचारत नाही. या तर देवाच्या देणग्या. या भूमीची खरेदी-विक्री आम्ही कोण करणार ? मला हेच तुमचं समजत नाही. जर इथलं काहीच तुमच्या मालकीचं नाही, तर मग हे देवाणघेवाणीचे व्यवहार तुम्ही कशाच्या जोरावर करता ? तुमच्या या लहानशा कागदाच्या तुकड्यामुळे आमच्या आयुष्यात फार मोठी उलथापालथ घडेल.'

त्याला कोणत्या शब्दांत उत्तर द्यावं, ते काही मला समजेना. त्या क्षणापूर्वीपर्यंत माझी अशीच समजूत होती की, माझं ज्ञान त्याच्याहून जास्त आहे.

चलनवाढ आणि घट, राजकीय पक्ष या सगळ्या गोष्टी आपण जाणतो. बिल गेट्स कोण आणि बिल क्लिंटन कोण हे आपल्याला नीट माहिती आहे. इथे या माणसाला या सगळ्या कशाचीही माहिती नव्हती. पण त्याहीपेक्षा सखोल आणि चिरंतन असं सत्य तो जाणत होता. भूमी, पर्वतराजी आणि वाऱ्यावर कोणाची मालकी नसते हे त्याला माहीत होतं.

मग जास्त सुसंस्कृत कोण ? कलाहंडीच्या जंगलातील विद्वान म्हातारा की इंटरनेटच्या जगात वावरणारे आम्ही ?

ooo



## ७

# भारत - वर्स्ट ऑफ बोथ वर्ल्डस्

सोमवार म्हणजे आठवड्याचा पहिलाच दिवस आणि आमच्या ऑफिसातील कमालीच्या धावपळीचा दिवस. आलेली सगळी ई-मेल्स आणि कागदपत्रे निकालात काढायची, मीटिंग्ज घ्यायच्या. अपॉईंटमेंटस् लिहून आमच्या डायऱ्या भरून जातात. दोन अपॉईंटमेंटस्च्या मधल्या वेळात नेमके काही उपटसुंभ भेटायला येतात. सोमवारची सकाळ म्हणजे सेक्रेटरी लोकांची खरी गडबड उडून जाते. त्यांचे अक्षरश: घामटे निघते.

पण परत पुढचा रविवार उजाडण्यासाठी हा सोमवार तर आधी पार पाडावाच लागतो. असाच एक सोमवार माझ्या अजून स्मरणात आहे. मी माझे ई-मेल्स वाचून त्यांना उत्तरे पाठवण्याच्या गडबडीत होते, इतक्यात माझ्या सेक्रेटरीने निरोप सांगितला, दोन व्यक्ती आधी वेळ न ठरवताच भेटायला आल्या होत्या.

मग मी सेक्रेटरीला विचारलं, 'त्यांनी अपॉईंटमेंट घेतली नाही म्हणतेस, आणि मग तरी कसं काय तू त्यांना मला भेटायला पाठवते आहेस ? एवढं महत्त्वाचं काय आहे ?'

माझ्या ऑफिसातील कर्मचारी उगीच भलत्यासलत्या कोणालाही नीट चौकशी केल्याशिवाय माझ्याकडे कधी पाठवत नाहीत.

माझी सेक्रेटरी हलक्या स्वरात म्हणाली, 'मॅडम एक माणूस खूप म्हातारा आणि अशक्त आहे आणि दुसरा मध्यमवयीन आहे. त्यांचं म्हणणं असं, की त्याचं काम फार महत्त्वाचं आहे आणि ते बराच वेळ तुमची भेट घेण्यासाठी थांबले आहेत.'

म्हातारी माणसं अनेकदा असहाय असतात, त्यामुळे मी त्यांना भेटायला बोलावलं.

ते दोघे आत येऊन माझ्या समोर बसले. त्यांतील म्हातारा माणूस सत्तरी

उलटून गेल्यासारखा वाटत होता. तो अशक्त, थकलेला आणि चिंताग्रस्त दिसत होता. त्याच्याजवळ एक जुनाट, फाटकी धोपटी होती. त्याची अवस्था फार दयनीय होती. त्याच्याबरोबर तो मध्यमवयीन माणूससुद्धा चिंतित दिसत होता.

मी तात्काळ विषयाला हात घातला. 'बोला, काय काम आहे ?'

त्यावर तो म्हातारा नुसता मूकपणे त्या दुसऱ्या माणसाकडे पाहात राहिला.

तो दुसरा माणूस म्हणाला, 'मॅडम, हा म्हातारा एका बसस्टॉपपाशी बसून होता. त्याला कुणीच नाहीये. त्याला आधाराची गरज आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी की त्याच्याकडे काही पैसेसुद्धा नाहीत.'

त्या मध्यमवयीन माणसाचा आणखीही बरंच काही स्पष्टीकरण देण्याचा विचार चालला होता. असे बरेच लोक मला भेटतात. सरळ मुद्द्याचं बोलण्याऐवजी उगीच इकडचं तिकडचं बोलत राहतात. त्यांना जे काही हवं असतं ते सरळ सरळ कधीच सांगत नाहीत. मला या अशा गोष्टींची आता खूप सवय झाली आहे म्हणून अनेकदा मी थोडं तुटक वाटलं तरी चालेल, पण त्यांना मधेच थांबवून त्यांचा मुद्दा मांडायला सांगते.

'मग मी काय करावं अशी तुमची अपेक्षा आहे ?'मी सरळच विचारलं.

'मी तुमच्या कार्याविषयी पुष्कळ वाचलंय. तुम्ही या म्हाताऱ्या माणसाला मदत करावी असं मला वाटतं.' •

'तुम्हाला कोणी नातलग आहे का ?' मी त्या म्हाताऱ्याला विचारलं.

त्याचे डोळे पाण्याने भरून आले. तो हळू आवाजात म्हणाला, 'नाही. मला कुणीच नाही.'

'तुमचे कुटुंबीय... त्यांचं काय ?'

'नाही. मला कुणीही नाही.'

'तुम्ही याआधी कुठे काम करत होता ?'

मी त्याला आणखीही बरेच प्रश्न विचारले व त्याने त्यांची समाधानकरक उत्तरे दिली.

मला त्या माताऱ्या माणसाविषयी फार वाईट वाटलं. त्याच्याजवळ पैसा नव्हता, मदतीचा हात पुढे करणारं कोणीही नव्हतं. फार दुर्दैवी कहाणी होती. एका वृद्धाश्रमाची मला चांगली माहिती होती. आमचे व त्यांचे अनेकदा संबंध येत असत. मी त्यांना लगेच फोन केला व एका म्हाताऱ्या माणसाला काही काळासाठी तेथे पाठवत असल्याचं सांगितलं. त्याची काही दुसरी व्यवस्था होईपर्यंत तो मध्यमवयीन माणूस म्हणाला, 'काळजी करू नका. मी स्वत: यांना तिकडे नेऊन सोडीन आणि



मग तिथूनच मी माझ्या ऑफिसला जाईन.'

त्यानंतर ते दोघे निघून गेले. थोड्याच वेळात मी माझ्या कामात बुडून गेले. भेटायला येणारी माणसे, बिलं व पावत्या, अंदाजपत्रके असं बरंच काम होतं.

मी त्या म्हाताऱ्या माणसाविषयी विसरले मात्र नव्हते. मधूनच कधीतरी मी त्या वृद्धाश्रमात फोन करून त्याची चौकशी करत असे. त्याचं तिथे व्यवस्थित चाललं होत. अर्थात त्याच्याविषयी आणखी काही विचार करत बसायला मला वेळ नव्हता. मी दरमहा त्या वृद्धाश्रमाला न चुकता पैसे मात्र पाठवत होते.

एक दिवसत्या वृद्धाश्रमाच्या संचालकांचा मला फोन आला. तो म्हातारा माणूस फार आजारी होता, त्याची प्रकृती चिंताजनक होती आणि त्यांनी त्याला हॉस्पिटलात दाखल केलं होतं. त्यांनी मला संध्याकाळी भेटायला बोलावलं होतं.

मी संध्याकाळी हॉस्पिटलात त्या म्हाताऱ्या माणसाला भेटायला गेले. तो खरोखर फारच अत्यवस्थ होता. त्याची प्रकृती इतकी गंभीर होती, की डॉक्टरांच्या मते त्यांचे काही आता फार दिवस उरले नव्हते.

या अशा अवस्थेत तो कुणालातरी भेटण्याची इच्छा व्यक्त करील, असं मला वाटलं. स्वत:ची मुलं नसली म्हणून काय झालं, पुतण्या नाहीतर भाचा बहीण, भाऊ निदान एखादा मित्र ? त्याच्या प्रकृतीविषयी आता कुणाला कळवायचं ?

मी त्याला विचारलं, 'तुम्हाला कुणाला भेटायची इच्छा आहे का ? तुम्ही म्हणाल त्याला आम्ही बोलावून घेऊ. तुमच्याकडे कोणाचा फोन नंबर आहे का ?'

त्याने थरथरत्या हाताने मला एक नंबर लिहून दिला आम्ही त्या नंबरावर फोन केला आणि तो म्हातारा माणूस फार गंभीररीत्या आजारी असल्याचं त्या फोनवरील माणसाला सांगितलं. काही वेळानंतर कोणीतरी माणूस त्याला भेटायला आला. त्याच्या चेहऱ्यावर चिंता स्पष्ट दिसत होती. तो येताक्षणीच तडक त्या म्हाताऱ्या माणसाला भेटायला गेला.

मी या दुसऱ्या माणसाला नक्कीच कुठेतरी पाहिलं होतं. मी स्मरणशक्तीला खूण ताण देण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. त्या म्हाताऱ्या माणसाला भेटायला आलेला माणूस आपल्याला ओळखीचा का वाटतोय, ते काही केल्या लक्षात येईना. कदाचित मला प्रवासात भेटलेल्या एखाद्या माणसासारखा तो दिसत असावा.

थोड्याच वेळात डॉक्टर बाहेर आले. त्यांच्याकडून कळलं, त्या म्हाताऱ्या माणसाचा अंत झाला होता. मला फार वाईट वाटलं. माझी त्याच्याशी काही ओळख नव्हती, त्याच्याशी काही संबंध नव्हता. पण तरीही मला फार वाईट वाटलं.

थोड्याच वेळात त्या म्हाताऱ्या माणसाला भेटायला आलेला माणूस बाहेर आला. त्याच्या डोळ्यांत अश्रू होते. तो न बोलता तेथील बाकावर बसला. ती जागा फार सुनसान होती. मनावर उगीचच दडपण येत होतं. आश्रमाचे संचालक, तो माणूस आणि मी त्या वेटिंग रूममधे बराच वेळ बसून होतो. सगळे उपचार पूर्ण होण्यास खूप वेळ लागणार होता.

त्या अपरिचिताने विचारलं, 'त्यांच्याजवळची बॅग कुठे आहे ?'

'कुठली बॅग ?'

'ते अनाथाश्रमात येताना एक जुनी बॅग घेऊन आले होते.' तो म्हणाला.

मी चमकले. त्या म्हाताऱ्या माणसाकडे एक बॅग होती हे या अपरिचिताला कसं माहीत ?

मी प्यूनला आश्रमात पाठवून ती बॅग मागवून घेतली. ती बॅग दिसताच तो अपरिचित ती उघडण्यासाठी पुढे सरसावला, पण मी त्याला तसं करू दिलं नाही.

'तुम्ही तुमची स्वतःची ओळख आधी पटवा, त्याशिवाय तुम्हाला ती बॅग उघडता येणार नाही. तुम्ही त्यांचे कोण ? या बॅगेविषयी तुम्हाला कशी काय माहिती ?'

मी असे प्रश्न विचारताच तो फार अस्वस्थ झाला. एका स्त्रीने आपल्याला असे प्रश्न विचारलेले कदाचित त्याला आवडले नसावेत. भारतात जर एखाद्या स्त्रीने पुरुषाला अडचणीत आणणारे प्रश्न विचारले तर ते त्याला आवडत नाही. पुरुषांनी काहीही केलं तरी त्याबद्दल त्यांना जाब न विचारणाऱ्या स्त्रियाच त्यांना आवडतात. नशिबाने हे चित्र आता हळूहळू पालटत चाललं आहे.

'त्यांना या वृद्धाश्रमात मीच सोडून गेलो होतो,' तो माणूस म्हणाला.

'तुम्ही कोण आहात ?' आता माझी उत्सुकता वाढली होती.

'मी त्यांचा मुलगा.'

मला ते ऐकून किती धक्का बसला असेल याची कल्पना कोणालाही सहज करता येईल. आता मला नीट आठवलं. एका सोमवारी सकाळी हाच माणूस त्या म्हाताऱ्या माणसाला घेऊन माझ्या ऑफिसात आला होता व हे गृहस्थ आपल्याला बसस्टॉपवर भेटल्याची थाप त्याने मारली होती.

मी फार संतापले. 'तुम्ही त्या वेळी माझ्याशी खोटं का बोललात ?' मी रागानं विचारलं.

त्याच्याकडे सांगण्यासाठी कहाणी तयार होतीच. 'काय सांगू, माझ्या घरी खूप अडचणी आहेत,' तो म्हणाला. 'माझ्या पत्नीला माझे वडील आवडत नसत. तिनं मला सरळच सागितलं - एक मी तरी नाही तर तुमचे वडील तरी... तुम्ही आमच्यापैकी एकाला निवडा. त्या वेळीच मी तुमच्या या फौंडेशनबद्दल वाचलं. मला वाटलं, काही पैसे खर्च न करताच आमचा प्रश्न सुटून जाईल.' त्यानं नंतर असंही कबूल केलं, की त्याचं राहतं घर त्याच्या पत्नीच्या मालकीचं होतं, त्यामुळे त्याच्यापुढे दुसरा काही पर्यायच नव्हता.

हे ऐकून मला राग आला, चीड आली की मी नुसती अस्वस्थ झाले, तेच मला समजेना. 'वा ! तुमचा प्रश्न सोडवण्याची काय ही पद्धत !' मी म्हणाले. 'आम्ही अनाथांना मदत करतो हे खरं आहे, पण स्वतःची मुलंबाळं असलेल्या अनाथांना नव्हे.'

यथावकाश ती बॅग उघडण्यात आली. त्यात जुन्या कपड्यांचे तीन जोड होते, काही औषधं होती आणि एक बँकेचे पासबुकही होते. मी ते पासबुक उघडलं आणि अक्षरशः हतबुद्ध झाले. त्या म्हाताऱ्या माणसाच्या बचत खात्यात एक लाखांहून जास्त रक्कम जमा होती. त्या खात्यावर वारसाच्या नामनिर्देशनाची सोय होती व त्या वृद्ध माणसाने वारस म्हणून आपल्या मुलाचे नाव लिहिलेले होते. ज्या मुलाने त्याला घरातून आणून वृद्धाश्रमात टाकून दिले होते, त्याच मुलाचे. आपल्या वडिलांना वृद्धाश्रमात ठेवून घेण्यात यावे म्हणून याच मुलाने खुशाल त्यांना निराधार, असहाय म्हणून घोषित केले होते. आणि आता तोच मुलगा आपल्या वडिलांच्या पैशावर हक्क सांगायला आला होता.

आणि त्या वृद्ध माणसाचं तरी काय ? आपल्या मुलाने आपला सांभाळ केला नाही, आपण निराश्रित, निराधार आहोत असं त्याने आपल्याकडून खोटं वदवून घेतलं, आणि तरीही आपल्यानंतर आपला पैसा त्या मुलाला मिळावा अशी त्या म्हाताऱ्याची इच्छा होती. ज्या वृद्धाश्रमाने आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत आपल्याला सहारा दिला, त्या आश्रमाला ती रक्कम देणगी म्हणून द्यावी, असं त्याच्या मनातसुद्धा आलं नाही !

पाश्चात्त्य देशांमधे जेव्हा वृद्ध लोकांना आश्रमात किंवा हॉस्पिटलमधे मृत्यू येतो तेव्हा त्यांनी आपली संपत्ती मृत्यूनंतर ज्या वृद्धाश्रमाला नाही तर हॉस्पिटलला दान करावी असं मृत्युपत्रात आधीच नमूद केलेलं असतं. आपल्याप्रमाणे इतर वृद्धांना त्यातून मदत मिळावी या भावनेतून ते केलेलं असतं. ते आपली संपत्ती आपल्या मुलांच्या नावे नाही सोडून जात आणि मुलंही तशी अपेक्षा ठेवत नाहीत. पण आपल्या भारतात पौर्वात्य व पाश्चात्त्य जगांमधील जेवढं म्हणून काय वाईट आहे, तेवढंच नेमकं आपण घेतलं आहे. इथे मुलं वृद्धापकाळात आपल्या आईवडिलांना

टाकून देतात आणि आईवडील जनरीतीप्रमाणे आपली संपत्ती त्याच मुलांच्या नावे ठेवतात.

'केवळ काही हजार रुपयांसाठी तुम्ही आणि तुमच्या वडिलांनी हे सारं ढोंग केलं ? शरम वाटली पाहिजे तुम्हाला !' मी त्याला म्हणाले. 'आणि असं करून तुम्ही फार वाईट उदाहरण घालून ठेवलं आहे. आता यानंतर कधी एखाद्या खरोखरच्या निराधार व्यक्तीने आमच्याकडे मदत मागितली तरीसुद्धा ती द्यायची का नाही याचा आम्हांला विचार करावा लागेल. कदाचित आम्ही त्याला मदत करताना कचरू. तुमच्यासारख्या लोकांची आठवण आम्ही कधीच विसरणार नाही.'

माझे हे शब्द ऐकून त्याने शरमेने मान खाली घातली.

OOO



८

# परिवर्तनशील जगणं

हा काळ आणि हे आयुष्य या दोहोंमध्ये खरोखर क्रांतिकारक रीत्या बदल घडून आले आहेत. पण या बदलांचा परिणाम आपल्याला तितकासा जाणवत नाही, कारण आपण त्याच्या केंद्रबिंदूत आहोत. जुन्या पद्धती बदलल्या, आपले सणवार बदलले, आपले दृष्टिकोन बदलले, आपली तत्त्वे, जीवनमूल्ये आणि संकल्पना बदलल्या.

मी नुकताच दोन सणांमध्ये भाग घेतला आणि अचानक या बदलाची जाणीव काहीशा नाट्यमय रीतीने मला झाली. या दोन्ही खेपेस घडून आलेल्या बदलाची जाणीव मला झाली ती संभाषणाद्वारे झाली. त्यातून त्याला काहीसे व्यक्तिगत स्वरूप आले आणि त्यातून या बदलांविषयीच्या काही मूलभूत गोष्टी अधोरेखित होऊन अधिक स्पष्टपणे जाणवल्या. हे बदल आपल्या आयुष्यात घडलेले आहेत. पहिली घटना होती दिवाळीच्या वेळची. दुसरी एका संगीताच्या उत्सवाच्या वेळची.

दिवाळी हा सण आपल्या देशात फार मोठ्या रीतीने साजरा करण्यात येतो. प्रत्येक जण भेटवस्तू विकत घेत असतो, मिष्टान्ने बनवण्यात येतात, मित्रमंडळींकडे येणं-जाणं होतं, बरेच दिवस ऑफिसांना सुट्टी असते, मुलं फटाके उडवतात.

गेल्या दिवाळीत एक जाहिरात माझ्या वाचनात आली. काही अनाथाश्रमांमध्ये अनाथ मुलांनी बनवलेल्या मिठाईची विक्री होणार होती. या अनाथाश्रमांना प्रोत्साहन देण्याचा आणि मदत करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे आपण हे पदार्थ विकत घेणं, असं माझ्या मनात आलं.

मी मिठाई विकत घेतली आणि माझ्या जवळच्या मैत्रिणीकडे गेले. तीही खूप आनंदात, उत्साहात असेल, असं मला वाटलं. दिवाळीची जोरात तयारी चालू असेल, असं वाटलं. ती गृहिणी होती, एका लहानशा खेड्यातून आलेली. तिच्या

वडिलांचा त्या खेड्यात बराच जमीनजुमला होता.

पण ती आनंदात तर नव्हतीच. मी एवढी दिवाळीच्या सणाचं निमित्त साधून तिच्याकडे गेले होते पण त्या सणाचं तिला काहीच नव्हतं. ते पाहून मला धक्का बसला.

'दिवाळीचा खरा अर्थच हरवून बसलाय,' ती म्हणाली.

मला तिचे शब्द ऐकून खूपच आश्चर्य वाटलं. 'असं का म्हणतेस ?' मी विचारलं.

मग तिनं तिचं गाऱ्हाणं मांडलं. 'मी मला लहानशा खेड्यात लहानाची मोठी झाले. आमचं जेवणखाण आजच्यापेक्षा इतकं वेगळं होतं. प्रत्येक जण रोज डाळ, भात, पोळी-भाजी असं सकस आणि साधं अन्न खायचा. मग त्या कुटुंबाचं उत्पन्न कितीका असेना. जर दिवाळी नाही तर दसऱ्यासारखा सण असेल तरच घरात गोडधोड केलं जाई. त्यामुळेच आम्ही मुलं सणावारांची किती आतुरतेनं वाट पाहात असू.'

ते ऐकून मलाही माझ्या लहानपणची आठवण झाली. माझ्याही आठवणी नेमक्या अशाच होत्या. ती म्हणाली त्याप्रमाणे आम्हीसुद्धा साधा व सकस आहार घेत असू.

'पण आता मात्र..' ती म्हणाली, 'खाण्याच्या सवयी बदलून गेल्या आहेत. त्याचं एक कारण असं की आपल्याला मोजकी दोनच मुलं असतात आणि त्यांना जे काय हवं ते आपण देत असतो. त्यांच्या आवडीनुसार आपण स्वयंपाक करतो. त्यांना जे हवं ते घरी करणं आपल्याला जमलं नाही तर आपण या शहरात कोणत्याही हॉटेलातून चटकन ते मागवून घेतो. त्याचमुळे आपल्यासारखी आजकालच्या मुलांना सणासमारंभाची अपूर्वाई राहिलेली नाही.'

तिचं म्हणणं खरंच होतं. आपल्या खाण्यापिण्याच्या सवयींमध्ये आमूलाग्र बदल घडून आलेला आहे. मध्यमवर्गीयांच्या व उच्चमध्यमवर्गीयांच्या बाबतीत तर ते अतिशय खरं आहे. पण तरीही माझ्या मनात एक प्रश्न उरलाच होता. वर्षभर मिष्टान्न केव्हाही मिळण्याची सोय असते म्हणून का लोकांची दिवाळीच्या सणाची गोडी कमी झाली असेल ?

'तसं नाही,' माझी मैत्रीण उतरली. 'सगळा दृष्टिकोनच बदलला आहे. लोकांना जे कपडे घ्यावेसे वाटताता ते ते केव्हाही विकत घेतात. त्यासाठी ते सणाची वाट पाहात नाहीत. कुटुंबं सर्व भारतभर, कधीकधी तर जगभर विखुरलेली असतात. आपल्या नातेवाईकांना भेटणं इतकं काही सोपं राहिलेलं नाही. माझ्या



कितीतरी मैत्रिणींना आपल्या मूळ गावी जाण्याची इच्छा असते. पण रेल्वेची, विमानाची आणि बसची रिझर्वेशन्स मिळणं इतकं कठीण होऊन बसलंय. त्यापेक्षा कुठेही न जाता घरी बसलेलं बरं, असं होऊन जातं.'

खरंच होतं ते. मी दिवाळीत गावाला जायचं ठरवलं होतं तर त्याची तिकिटं महिनाभर आधी काढून ठेवली होती.

त्यानंतर माझ्या मैत्रिणीनं जो प्रश्न केला त्यानं अगदी मूलभूत विषयालाच तिनं हात घातला. ती म्हणाली, 'आपल्यापैकी किती जणांना दिवाळीचं खरं महत्त्व माहिती आहे ? दिवाळी म्हणजे दिव्यांचा उत्सव असं का म्हणतात ते किती जणांना माहीत आहे ? या सणाविषयी आपल्या धर्मग्रंथांमध्ये काय सांगितलं आहे ? खरं बोलायचं, तर त्याविषयी कोणालाही काहीही देणं-घेणं नाही. आपल्या देशातील प्रत्येक राज्यात या सणाविषयी एक खास कथा सांगितली जाते. या सर्व कथा महाभारतातून आणि कृष्णाच्या कथेतून घेतलेल्या आहेत. पण त्या किती जणांना माहीत असतात ?'

कदाचित तिला घरची आठवण येत असेल, असं मला वाटलं. या परिस्थितीत आपण तिला तिच्या घराच्या चार भिंतींमधून बाहेर नेलं पाहिजे, असं माझ्या मनात आलं.

'चल, आपण रेणूकडे नाहीतर मृदुलाकडे जाऊ,' मी म्हणाले.

या दोघी आमच्या जुन्या आणि जिवलग मैत्रिणी होत्या. नाही तर आजकाल मला माहिती नसलेल्या व्यक्तीसुद्धा माझ्या मैत्रिणी असल्याचा दावा करतात. पण रेणू आणि मृदुला मात्र तशा नव्हत्या, त्यांच्याकडे हिला घेऊन गेलं तर हिचं हे नैराश्य जरा कमी होईल, असा मी विचार केला. पण तिनं जे काही सांगितलं ते ऐकून मला आश्चर्यच वाटलं.

'नको. रेणू अगदी कंटाळून गेली आहे,' माझी मैत्रीण म्हणाली. 'ती एका मोठ्या कंपनीत एच्. आर. डी. हेडचं काम करते आणि या दिवाळीच्या दिवसांत तिला इतक्या माणसांची खातिरदारी करावी लागते, की ती दमून जाते. त्यामुळे ती गोव्याला सुटीसाठी गेली आहे. ती कंपनीच्या गेस्ट हाऊसमधे उतरली आहे, पण मी हे कुणाला सांगू नये, असं तिनं मला बजावलं आहे.'

हे ऐकून मला नवलच वाटलं - दिवाळीच्या वेळी घरातून कुठेतरी निघून जाणं, विश्रांतीसाठी !

माझ्या मैत्रिणीचं बोलणं संपलं नव्हतं. 'आणखी एक डोकेदुखी असतेच. काही नातेवाईक भेटवस्तू घेऊन येतात. मग आपल्यालासुद्धा त्यांच्यासाठी काहीतरी

आणावंच लागतं. तो एक वैतागच होऊन बसलाय. मी गेल्या वर्षी मिळालेल्या भेटवस्तू अजून उघडलेल्याच नाहीत. कदाचित या वर्षी दुसऱ्या कुणालातरी द्यायला उपयोगी पडतील म्हणून. सुकामेव्याच्या बॉक्सेस, कँडल स्टँडस् आणि मिठाईच्या बॉक्सेस... मला तर अगदी कंटाळा आलाय. आपण सगळे म्हातारे होत चाललोय. या कॉलेस्टेरॉलने भरलेल्या, कॅलरीने भरलेल्या गोष्टी आपल्या शरीराला चांगल्या नव्हेत.'

'मग तू त्यांचं काय केलंस ?' मी विचारलं.

'मी त्या एका अनाथाश्रमाला दिल्या. निदान त्या गरीब मुलांना तरी खाण्याचा आनंद मिळू दे.'

तिनं ती मेवामिठाई कोणत्या अनाथाश्रमाला दिली त्याची मला उत्सुकता वाटली. तिनं एका प्रसिद्ध अनाथाश्रमाचं नाव सांगितलं.

दिवाळीला भेट म्हणून दिलेल्या मिठाया आणि मेणबत्त्यांचं नक्की काय होतं, ते आता मला कळलं. त्यावर कोणत्यातरी धर्मादाय संस्थेचं लेबल लावून त्या सरळ बाजारात विकल्या जातात.

निधी जमा करण्याची किती छान पद्धत ही ! याचा अर्थच त्या अनाथाश्रमातील छोट्या छोट्या मुलांना दिवाळीलासुद्धा मेवामिठाई खायला मिळतच नाही.

संगीत महोत्सवाच्या वेळचा माझा अनुभव याहून खूपच वेगळा पण तितकाच बोलका होता. आजकाल बरेच वेळा मला संगीतसभा, तत्त्वज्ञानाची व्याख्याने नाही तर चॅरिटी शोचे उद्घाटन करण्यासाठी बोलावणी येतात. अनेकदा तर असंही होतं, की त्याच्या विषयामधे मला काडीइतकीही गती नसते. पण मी जर निमंत्रण स्वीकारण्यास नकार दिला तर लोकांना वाईट वाटतं किंवा राग येतो. मग मी असं निमंत्रण स्वीकारते पण व्यासपीठावर येऊन भाषण मात्र करणार नाही, अशी अट घालते.

मी नुकतीच अशा एका महोत्सवाला गेले होते. मला तिथे केवळ संगीताचा आस्वाद घ्यायचा होता. मी मुद्दाम उशिरा गेले आणि मागच्या रांगेत जाऊन बसले. कुणी मला ओळखलं नाही म्हणून मला बरंच वाटलं. प्रेक्षागारात निवृत्त अधिकारी, मध्यमवयीन गृहिणी आणि वृद्ध स्त्रिया होत्या. पण संपूर्ण प्रेक्षागृहात तरुण मंडळी कुठेच दिसत नव्हती.

माझ्या पुढच्या रांगेत दोन मध्यमवयीन गृहिणी बसल्या होत्या. त्या माझ्या जवळच बसलेल्या असल्याने त्यांचं संभाषण माझ्या कानावर पडलं.

त्या दोघीही स्त्रिया धर्मावरम साड्या नेसल्या होत्या. पांढऱ्या केसात त्या



मोगऱ्याचे गजरे माळून आल्या होत्या. चांगल्या टवटवीत दिसत होत्या. आजकाल उपवर मुलींना सुयोग्य वर मिळणं किती मुष्कील झालंय, हा त्यांच्या संभाषणाचा विषय होता.

'ही जी सॉफ्टवेअरची लाट आलीय ना, त्यामुळे अठ्ठावीस वर्षांच्या वरचे मुलगे मिळणं आजकाल फार कठीण होत चाललंय,' त्यांच्यातील एक म्हणाली.

दुसऱ्या स्त्रीलाही या विषयात भरपूर रस होता. एकंदरीत संगीतापेक्षा उपवर मुलांचा विषय फार महत्त्वाचा दिसत होता. मला ते पाहून जरा धक्काच बसला.

मग पहिली स्त्री आपल्या बोलण्याचं स्पष्टीकरण देत म्हणाली, 'आज एखादा मुलगा जेव्हा बी. ई. होतो, तेव्हा तो साधारण बावीस वर्षांचा असतो. त्याला लगेच एखाद्या सॉफ्टवेअर कंपनीत नोकरी लागते. साधारण नोकरीत दोन वर्षं झाली की त्याला परदेशी जाण्याची संधी येते. एव्हाना तो पंचविशीचा झालेला असतो. त्याचे वडील जर समजा बँकेत अधिकारी किंवा प्रामाणिक सरकारी नोकर नाही तर प्राध्यापक असले, तर त्यांनी आयुष्यभर कष्ट करून जेवढा पैसा कमावलेला नसेल, तेवढा या मुलानं आत्ताच मिळवलेला असतो. मग आता सांग, त्याने या वयात लगेच लग्न करून आयुष्यात स्थिरस्थावर का होऊ नये ?'

या स्त्रीनं परिस्थितीचं जे काही विश्लेषण केलं होतं, त्यावर जो काही तर्कशुद्ध विचार केला होता, त्याचं मला नवल वाटलं. या स्त्रीनं तर्कशास्त्राचे थोडे धडे घेतले तर ती स्वत: फार चांगली कॉम्प्युटर प्रोग्रॅमर होऊ शकेल.

आपलं संभाषण कोणी गुपचुप ऐकतंय याची त्या स्त्रीला काहीच कल्पना नव्हती. त्यामुळे तिनं स्वत: उपस्थित केलेल्या प्रश्नाचं स्वत:च उत्तर दिलं. 'मग त्याचे आईवडील त्याच्यासाठी एखादी चांगली सॉफ्टवेअर इंजिनीअर मुलगी बघतात. आजकाल म्हणे इंजिनीअरिंग कॉलेजात पन्नास टक्के मुलीच असतात. हल्ली काय इंजिनीअरिंग कॉलेज हे आर्ट्स किंवा कॉमर्स कॉलेजसारखंच झालंय. त्यामुळे सॉफ्टवेअरची मुलगी मिळतेच. हे लग्न त्या दोघांच्याही दृष्टीने चांगलंच फायदेशीर असतं. परदेशात त्या मुलाला एकटं राहावं लागत नाही. घरचं अन्न मिळतं, काळजी घ्यायला आपलं माणूस असतं. शिवाय मुलीच्या दृष्टीनेही परदेशात राहायला मिळणं फायद्याचंच. त्यामुळेच जुन्या काळात लग्न व्हायची ना, तसे अलीकडे पंचविसाव्या वर्षीच मुलगे लग्न करतात.'

या स्त्रीला तिनं केलेल्या विश्लेषणाबद्दल पदकच द्यायला हवं, असं माझ्या मनात आलं. आता त्या दुसऱ्या स्त्रीनं त्यावर आपलं भाष्य केलं. तिचा दृष्टिकोन आणखी वेगळा होता.

'ही सॉफ्टवेअरची लाट काही बाबतींत फार वाईट आहे,' ती म्हणाली. 'त्यामुळे इतरांचं कसं नुकसान होतं, पाहा. आजकालच्या मुलींना इलेक्ट्रिकल इंजिनीअर्स, मेकॅनिकल इंजिनीअर्स किंवा डॉक्टर्सही नको असतात. कारण या मुलांना परदेशी जाण्याची संधी फारशी मिळत नाही. शिवाय त्यांचे पगारही तसे बेताचे असतात. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे, त्यांना घरात काहीच मान नसतो.'

हे शेवटचं वाक्य ऐकून मला चांगलाच धक्का बसला. त्याचं ती काय स्पष्टीकरण देते ते ऐकण्याची मला खूप उत्सुकता वाटू लागली. तिचं पुढचं बोलणं ऐकून माझी निराशा नाही झाली. 'जर तो मुलगा परदेशी असेल, तर तो तीन आठवड्यांसाठी सुट्टी घेऊन घरी येतो. येताना सगळ्यांसाठी किंमती भेटवस्तू घेऊन येतो. सगळ्यांनाच आनंद होतो. पण इंजिनीअरांना किंवा डॉक्टरांना मात्र अशी परदेशी जाण्याची संधी मिळत नाही. दुसरं असं की सून जर सतत सासूच्या जवळ राहिली, तर तिची काहीच किंमत राहात नाही. आजकाल मुलींना कुठे सासूजवळ राहायला आवडतं ? परदेशी जाणं हा यावर उत्तम उपाय आहे. पण लग्न झाल्याझाल्या लगेचच परदेशी जाण्याची संधी मिळाली, तरच ठीक. नंतर मिळून काही उपयोग नाही. '

'नंतर मिळून उपयोग का नाही ?'

'कारण नंतर सासू-सासऱ्यांजवळ राहिलेलंच बरं असतं. मुलं होतात आणि मग त्यांना सांभाळायला सासू-सासरे असतातच. म्हणजे मग काळजीचं काही कारच नाही. नोकराचाकरांवर अवलंबून राहण्याची गरज नाही आणि हे असं आधी परदेशात मग परत भारतात येणं-जाणं वगैरे सॉफ्टवेअरच्या जॉबमधेच शक्य होतं.'

आता मात्र मला गप्प बसवेना. माझ्या डोळ्यांसमोर एक नवीन खिडकी उघडली होती. या स्त्रिया होत्या तरी कोण, ते जाणून घेण्याची उत्सुकता मला वाटू लागली. त्या या संगीत सभेला आल्या होत्या खऱ्या पण सॉफ्टवेअरच्या सामाजिक पैलूविषयी चर्चा करत बसल्या होत्या.

खरं तर दुसऱ्याच्या मधे बोलणं बरं नाही, पण तरी मी त्यांच्या संभाषणात सहभागी झाले. 'एक्सक्यूज मी' मी म्हणाले, 'सॉफ्टवेअरच्या समाजशास्त्राविषयी तुम्हांला इतकी बारकाईनं कशी काय माहिती आहे ?'

त्यांनी चमकून मागे वळून माझ्याकडे पाहिलं. मी विचारलेला प्रश्न त्यांना आवडला नसावा, असं मला वाटलं. त्याबद्दल त्यांना दोष देण्यातही अर्थ नव्हता. काही झालं तरी मी आगंतुकपणे त्यांच्या संभाषणात भाग घेतला होता.

'पण तुम्ही कोण आहात ?' त्यांनी विचारलं.



मी माझ्या स्वत:चा परिचय करून दिला आणि म्हणाले, 'मी गेली दोन दशकं सॉफ्टवेअर इंडस्ट्रीला जवळून ओळखते पण त्याचे हे सामाजिक पैलू मलासुद्धा माहीत नव्हते. खरं तर तुम्हांला हे एवढे बारकावे माहीत आहेत, त्याबद्दल तुमचं मला खरंच कौतुक वाटलं.'

माझं बोलणं ऐकून त्यांची अस्वस्थता जरा कमी झाली असावी, कारण त्यांच्या चेहऱ्यांवर स्मितहास्य उमटलं. त्या दोघी म्हणाल्या, 'आम्ही वधूवर सूचक मंडळ चालवतो.'

ooo

## ९

# तारेचा घोटाळा

मानव आणि पशू यांच्यातील फरक हा मूलत: वैचारिक आदानप्रदानाचा, सुसंवाद करण्याच्या क्षमतेचा फरक आहे. विचारांचं संक्रमण योग्य तऱ्हेनं करण्याची क्षमता ज्याची अधिक त्याच्या आयुष्यात गैरसमजाचे प्रसंग कमी प्रमाणात घडतात. अलीकडच्या काळात सुसंवाद करण्याची क्षमता सुधारण्यासाठी प्रशिक्षण वर्ग निघाले आहेत. ज्यांना घाईने ही कला शिकायची असते, त्यांच्यासाठीसुद्धा क्रॅश कोर्सेस असतात. एक गोष्ट खरी की सुस्पष्ट विचार आणि त्यांचं सरळ, थेट व स्पष्ट संक्रमण या दोन्ही गोष्टी आज जीवनावश्यक बनल्या आहेत.

लता आणि मी... आम्ही बालमैत्रिणी. मोठ्या शहरापेक्षा लहान गावात मैत्री जास्त घट्ट, जास्त जवळची असते. कदाचित लहान गावात लोक परस्परांवर खूप अवलंबून असतात, म्हणूनही असेल किंवा कदाचित लहान गावातील संस्कृती व मोठ्या शहरातील संस्कृती भिन्न असेल. औद्योगिकीकरणाचा मानवामानवातील परस्पर संबंधांवर फार मोठा प्रभाव पडलेला आहे.

आमच्या लहान गावातील वातावरणात लता आणि मी आमच्या घट्ट मैत्रीचा, परस्पर सहवासाचा आनंद घेत लहानाच्या मोठ्या झालो. मी रोज तिच्या घरी जायची. त्यांच्या घरच्या प्रत्येकाशी माझी ओळख होती. लताचंही नेमकं तसंच होतं. ती पण नेहमी आमच्या घरी यायची आणि आमच्या घरच्या सर्वांना ती ओळखायची.

यथावकाश आम्ही दोघी पदवीधर झालो आणि मग आमचे मार्ग वेगळे झाले. एकमेकींचा निरोप घेताना आम्हांला फार दु:ख झालं. मी पुण्याला नोकरी पत्करली आणि गाव सोडलं.

मी माझ्या करियरमध्ये पूर्णपणे गुंतून गेले. मी कधी गावी गेले, तरच लताची आणि माझी भेट होई. त्या काळी टेलिफोन ही श्रीमंतांची चैन होती. ही पंचवीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. तेव्हा गल्लोगल्ली एस्. टी. डी. बूथ नसत. कधीही



काही महत्त्वाची गोष्ट कळवायची असली तर लोक तारेनं संदेश पाठवत.

त्या काळी 'तार' संस्कृती ही एक आगळीवेगळी संस्कृती होती. लहान गावात तर 'तार येणं' हीच एक मोठी बातमी असे. पुष्कळदा 'तार येणं' म्हणजे वाईट बातमी येणं, असाच अर्थ असायचा.

एक दिवस मला तार आली, ती दुष्ट बातमी घेऊनच. तारेत लिहिलं होतं, 'फादर एक्सपायर्ड, स्टार्ट इमिजिएटली - (वडील वारले, तातडीने निघा.)' तार पाठवणाऱ्याचं नाव 'लता' असं दिलं होतं.

मला धक्का बसला. माझे सहकारी फार प्रेमळ होते. कुणीतरी ताबडतोब माझ्या रेल्वेच्या तिकिटाची व्यवस्था केली, तर दुसऱ्या कुणीतरी माझ्या नावे रजेचा अर्ज लिहिला. मी नुसती मूकपणे रडत बसले होते.

माझे वडील हे माझे नुसते वडीलच नाही, तर ते माझे मित्रही होते. आम्ही अनेक गोष्टी बोलायचो. गेल्याच आठवड्यात तर मी त्यांना भेटून आले होते. तेव्हा चांगली छान धडधाकट तब्येत होती त्यांची. त्यांना काही होत असेल, बरं नसेल, असं वाटलंही नव्हतं. काय झालं असेल ? हार्ट ॲटॅक की ॲक्सिडेंट ? आई कशी असेल ? तिला किती कठीण जाईल हे सर्व !

माझा एक सहकारी होता. त्याला अशाच प्रकारची तार दर वर्षी येत असे. 'ग्रॅनी एक्सपायर्ड, स्टार्ट इमिजिएटली (आजी वारली, तातडीने निघा)' केव्हाही तातडीने रजा मिळवण्याचा हा एक उत्तम मार्ग असतो असं त्याचं मत होतं.

'तुझी रजा शिल्लक आहे का पण ?' त्यानं मला विचारले. त्याला वाटलं माझी तारही त्याच्याचसारखी रजा मिळवण्याची युक्ती आहे.

त्याचं बोलणं ऐकून मला फार वाईट वाटलं, रागही आला.

नंतर रेल्वेत बसून गावापर्यंत जाण्याचा प्रवास हा एक दु:खदायक अनुभव होता. माझ्या बालपणात, माझ्या कॉलेज जीवनात माझे वडील हे एक अविभाज्य घटक होते. सुरुवातीला तेच माझे आदर्श होते, पण पुढे मी जशी मोठी झाले, जग पाहिलं, तसे ते माझे मित्र बनले.

आता आपलं बालपण कायमचं हरवलं, अशी जाणीव मला तेव्हा झाली. आपण एकत्र प्रवास करायचा, आवडती पुस्तकं वाचायची, वेगवेगळ्या विषयांवर चर्चा करायची अशी कितीतरी स्वप्नं मी आणि माझ्या वडिलांनी एकत्र बसून रंगवली होती आणि ही सारी स्वप्नं धुळीला मिळाली होती. मला पुढील आयुष्य तर घालवायचंच होतं, पण त्या आयुष्यात माझे वडील असते तर ते आयुष्य कितीतरी आनंदाचं, सुखासमाधानाचं घालवता आलं असतं.

मी गावी पोचले. मला इतकी चुलत भावंडं होती, त्यांपैकी कोणीतरी गाडीच्या वेळी मला आणायला स्टेशनवर आलं असेल, अशी माझी अपेक्षा होती. आश्चर्याची गोष्ट अशी की आमच्या घरचं कुणीसुद्धा मला न्यायला आलं नव्हतं. मला दु:ख झालं. पण सगळेच शोकाकुल अवस्थेत असणार, अशी मी माझ्या मनाची समजूत घातली. शिवाय मी नेमकी याच गाडीनं येणार आहे, हे तरी त्यांना कसं काय कळणार, असाही मी विचार केला.

मग मी रिक्षा पकडली आणि घरी निघाले. घराजवळ पोचल्यावर माझ्या हृदयात धडधड सुरू झाली तोच रस्ता, तेच घर पण आज माझे प्रिय वडील तिथे नव्हते.

मी रिक्षातून उतरले. घर इतकं शांत कसं काय... मला जरा नवल वाटलं. आत फारसे लोक असल्याचंही जाणवत नव्हतं. हे कसं काय ? माझे वडील एक नावाजलेले डॉक्टर आणि प्रोफेसर होते. लोक त्यांच्या अंत्यदर्शनाला कसे काय आले नाहीत ?

मी आत शिरले. घराला रंगसफेती चढवलेली होती. ते आंब्याच्या पानांच्या तोरणांनी व फुलांच्या माळांनी सुशोभित केलेलं होतं, जणू काही एखादा सणसमारंभ असावा, असं. काय करावं ते न सुचून मी एखाद्या खांबासारखी स्तब्ध उभी राहिली.

एवढ्यात माझ्या वडिलांच्या खोलीतून आवाज आला. मी मागे वळून पाहिलं आणि माझा माझ्या डोळ्यांवर विश्वास बसेना. माझे वडील प्रेमळपणे हसत तिथं उभे होते. मी स्वप्नात तर नाही ना ? मला प्रश्न पडला.

मला पाहून माझ्या वडिलांना फारच आनंद झालेला दिसत होता. ते म्हणाले, 'तू काहीही करून साखरपुड्याच्या कार्यक्रमाला येशील, अशी आमची खात्रीच होती. शेवटी तुझी ती लाडकी चुलत बहीण आहे ना !'

'तुम्ही कशाविषयी बोलताय ?'

'साखरपुड्याविषयी. लताचं लग्न ठरलंय. साखरपुडा आजच्या आज संध्याकाळी उरकून घ्यावा अशी मुलाकडच्यांची इच्छा आहे. मुलगा दिल्लीचा आहे. लग्न तर...'

मी त्यांना मधेच थांबवलं. 'ती तार कुणी पाठवली ? तुम्ही ते तसं का लिहिलं ? तुम्ही माझ्याशी खोटं का बोललात ? दुसरं तिसरं कुणी नाही.. तर तुम्ही ! तुम्ही खोटं बोलाल असं मला कधीच वाटलं नव्हतं.'

मी फार रागात होते.

पण मी कशाविषयी बोलते आहे, ते माझ्या वडिलांना काही समजेना. 'तू



कुठल्या तारेविषयी बोलत आहेस ? तू यावीस या हेतूनं आम्ही मुद्दामच तार पाठवली. पाठवावीच लागली !'

'पण ही अशी तार ? का ?' मी फार रागात होते, संतापानं धुमसत होते. अखेर मला मिळालेली ती तार मी त्यांच्या हातात ठेवली. ती पाहून माझे वडील आश्चर्यचकित झाले. ती तार त्यांनी पाठवलेलीच नव्हती.

सगळा गोंधळ. मग कुणी पाठवली असावी ?

अचानक त्यांच्या चेहऱ्यावर स्मितहास्य उमटलं. 'आता लक्षात आला सगळा प्रकार.. तुझी मैत्रीण लता आहे ना... तिचे वडील काल वारले. ते आजारी होते ते तुला माहीत असेलच. तुझा आणि त्यांचा चांगला परिचय होता. त्यामुळेच लतानं तुला ती तार पाठवली असेल. पण मजकुराचा गोंधळ झाला. 'माझे वडील वारले,' असं तिनं तुला कळवायला हवं होतं खरं... पण या तारेत 'माझे' हा शब्द गायब झालेला दिसतोय... केवढा मोठा गोंधळ झाला त्यामुळे !'

ती तार माझी मैत्रीण लता हिनेच पाठवली होती हे तर उघडच होतं आणि त्याच वेळी आमच्या घरी लता नावाच्या माझ्या चुलत बहिणीचा साखरपुडा होता.

माझ्या कुटुंबीयांनी मला जी तार पाठवली होती, त्यात लिहिलं होतं 'लताचं लग्न ठरलं. उद्या साखरपुडा.' आता ही तार ऑफिसात जाऊन पोचली आणि सहकाऱ्यांच्या हातात पडली, की त्यावर त्यांची काय प्रतिक्रिया होईल बरं ? या विचारानं मी अस्वस्थ झाले.

ooo

## १०

# मला भेटलेला अतिशहाणा

काही वर्षांपूर्वी, इन्फोसिस फौंडेशन जेव्हा अजून बाल्यावस्थेत होतं, तेव्हा आम्ही नक्की काय कार्य करतो याची लोकांना नीटशी कल्पना नव्हती. आमची संस्था तळागाळातील लोकांसाठी काम करत असे. त्यासाठी आम्ही खेड्यांत जाऊन तेथील शाळामास्तरांची भेट घेऊन त्यांच्या मदतीने काम करत होतो. एव्हाना इन्फोसिस कंपनीचा व्याप बराच वाढला होता, औद्योगिक क्षेत्रात तिचं चांगलं नाव झालं होतं, पण तरीही फौंडेशन मात्र अजून छोट्याशा दोन खोल्यांमधेच होतं. आजही तीच स्थिती आहे. इन्फोसिस टॉवर्सच्या तिसऱ्या मजल्यावर आमचं ऑफिस दडलेलं आहे. फौंडेशनच्या नावाची पाटी कुठेही नाही. कंपनीचे सेक्युरिटी विभागाचे लोक याबद्दल आम्हांला, फौंडेशनच्या कर्मचारी वर्गाला नेहमी बजावतात. इन्फोसिसशी संबंधित असणाऱ्या प्रत्येक संस्थेची निदान स्वत:ची मोठी, चांगली चमकत्या पितळी अक्षरांतील पाटी तरी असायला हवी ना ?

इन्फोसिस फौंडेशनची स्थापना झाली तीच मुळी खेड्यांतील लोकांच्या, विशेषत: लहान मुलांच्या अडचणी सोडवण्यासाठी, त्यांना मदत करण्यासाठी त्यांचा उज्ज्वल भविष्यकाल घडवण्यासाठी, त्यांना शहरातील मुलांच्या बरोबरीने सुविधा पुरवण्यासाठी. आपल्या देशात ग्रामीण भाग आणि शहरी भाग यांच्यातील दरी किती प्रचंड आहे हे तर सर्वांनाच माहीत आहे. शहरातील मुलांना ज्या सुखसोयी सहजगत्या मिळू शकतात, ज्या गोष्टी करता येतात, त्या ग्रामीण भागात उपलब्ध नसतात. आधुनिक जगात सहजगत्या उपलब्ध असणारी छोटी छोटी करमणुकीची साधनं, टी. व्ही. वर कार्टून शो बघण्याचा आनंद, एखादं आवडतं हिंदी गाणं ऐकण्याची गंमत किंवा एखादं आवडतं पुस्तक आरामात बसून वाचण्यातील आनंद म्हणजे खेड्यातील मुलांच्या दृष्टीने ऐषारामाची परिसीमा. अशा प्रकारे साधनं उपलब्ध नसल्यामुळे खेड्यांतील मुलंमुली आपला वेळ नाहक दवडताना दिसतात.



खेड्यांतील जीवनाचं हे अंग मी फार जवळून पाहिलेलं असल्यामुळेच मी ठरवलं, की इन्फोसिस फौंडेशनपुढील एक उद्दिष्ट म्हणजे प्रत्येक खेड्यात एक तरी लायब्ररी असावी यासाठी उपक्रम राबवणं.

ग्रंथालयांचं लहान मुलांच्या आयुष्यात फार महत्त्व आहे. ते उद्याचे नागरिक असतात. मी स्वत: एका लहान गावातच लहानाची मोठी झाले, त्यामुळे एका विद्यार्थ्याच्या आयुष्यात पुस्तकांचं महत्त्व किती असतं याची मला पुरेपूर कल्पना आहे. माझ्या लहानपणी मला पुस्तकांची कमतरता जाणवायची आणि तेव्हाच मला वाटायचं, की प्रत्येकाला मोफत वाचनालयामधे जाऊन पाहिजे तेवढी पुस्तकं वाचण्याची सोय असली पाहिजे. त्यामुळे जेव्हा माझी इन्फोसिस फौंडेशनची विश्वस्त म्हणून नेमणूक करण्यात आली तेव्हाच मी खेड्यांत मोफत वाचनालये सुरू करण्याचं हे जुनं स्वप्नं प्रत्यक्षात उतरवण्याचं ठरवलं.

वाचनाचे फायदे खूप आहेत. तो केवळ एक उत्तम छंदच आहे असं नाही, तर चांगली तत्त्वे, जीवनमूल्ये स्वत:च्या मनावर बिंबवण्याचा तो एक उत्तम मार्ग आहे. हीच गोष्ट लक्षात घेऊन सर्व ट्रस्टींनी मिळून ठरवलं, या वाचनालयांमधे मुलांची शाळेची पाठ्यपुस्तकं वगैरे ठेवायची नाहीत, त्यापेक्षा त्या त्या ठिकाणच्या प्रादेशिक भाषेतील साहित्य उपलब्ध करून द्यायचं. त्यानंतर या लायब्ऱ्यांसाठी सचित्र, माहितीपूर्ण आणि आकर्षक पुस्तकं आम्ही निवडली. त्या माध्यमातून कर्नाटकात आमच्या फौंडेशनने वाचनाची आवड निर्माण करण्यात थोडंफार यश मिळवलं आहे.

ह्या उपक्रमाचं बीज रोवल्यापासून त्याची चांगली भरभराट होऊन आता त्याचा चांगला मोठा वृक्ष झाला आहे. संपूर्ण राज्यात मिळून चार हजारांच्या वर वाचनालयं सुरू करण्यात आली आहेत. खेडोपाड्यांतील मुलांसमोर या वाचनालयांनी पुस्तकरूपानं एक अनोखं विश्व उलगडलं आहे व त्या मुलांच्या चेहऱ्यावर हास्य उमटवलं आहे.

एक दिवस दुपारच्या उकाड्यात मी माझ्या, ऑफिसच्या खोलीत बसले होते. फौंडेशनला अजून कोणते कोणते अभिनव उपक्रम हाती घेता येतील, हाच विषय डोक्यात होता. एवढ्यात ऑफिसच्या काचेच्या दारापलीकडे एक माणूस उभा असलेला माझ्या दृष्टीस पडला. फरशीवर सर्वत्र खोक्यांचा व रंगीबेरंगी कागदी वेष्टनांचा पसारा पडला होता. त्या सगळ्या पसाऱ्यातून तो दारापलीकडे उभा असलेला माणूस नीट स्पष्ट दिसतही नव्हता.

माझ्या हातातलं काम मी लक्षपूर्वक करत होते. काम तसंच महत्त्वाचं होतं

त्यापुढे आजचा दिवस दुपारचं जेवण आणि त्यानंतरशी छोटीशी डुलकी काढण्याचा नेहमीचा बेत रद्द करून एकदा काम हातावेगळं करूनच थांबायचा माझा विचार होता. एवढ्यात दारावर टकटक केल्याचा आवाज झाला. मी दचकले. एक अनोळखी माणूस दार उघडून आत आला. 'आत येऊ का ?' असं तोंडदेखलं विचारण्याची तसदीसुद्धा त्याने घेतली नाही.

'हेच फौंडेशनचं ऑफिस का ?' त्यानं जरा जोरातच विचारलं.

मी त्याला होकार देऊन बसायला सांगितलं.

'तुम्ही या फौंडेशनच्या कर्मचारी आहात का ?'

मी होकार दिला. तो जरा बुचकळ्यात पडलेला दिसत होता. कदाचित त्याला चांगलं भपकेबाज ऑफिस व एखादी देखणी रिसेप्शनिस्ट वगैरे बघायला मिळेल अशी अपेक्षा असावी आणि इथे मी अगदी साधी सुती साडी नेसून बसले होते. मी कोण आहे ते कळायला काही मार्ग नव्हता.

तो माणूस जेव्हा आला तेव्हा मी काही महत्त्वाची पत्रं घाईघाईने पाठवण्याच्या कामात गर्क होते. एकीकडे एका नव्या उपक्रमाची रूपरेषाही आखत होते. त्यासंबंधीचं पत्र बनवत होते. एका बारीकशा खोलीवजा ऑफिसात, विस्कटलेल्या अवतारात कामाच्या गराड्यात बसलेली बाई.... त्याच्या इन्फोसिस फौंडेशनच्या कल्पनेत नक्कीच बसणारी नव्हती. जास्त वेळ न घालवता त्या माणसानं आपली बॅग उघडली व त्यातून कन्नड भाषेतील दोन पुस्तिका बाहेर काढल्या.

'ही लहान मुलांसाठी फार चांगली पुस्तकं आहेत,' तो म्हणाला. 'मी ही पुस्तकं बनवण्यासाठी आणि प्रकाशित करण्यासाठी गेली अनेक वर्षं झटून प्रमाणाबाहेर कष्ट केले आहेत. संपूर्ण कर्नाटक राज्यात या पुस्तकांना भरपूर मागणी आहे. तुम्ही तुमच्या वाचनालयाच्या उपक्रमासाठी ही पुस्तकं विकत घेऊ शकाल ?'

मी त्याचं बोलणं ऐकत होते. ती पुस्तकं, त्यांचा दर्जा, किंमत आणि सर्वात महत्त्वाचं म्हणजे त्यांतील आशय या सर्वच बाबतींत नीट पारखून घेण्याची माझी इच्छा होती. खेड्यांतील शाळेत जाणाऱ्या मुलांना ती खरोखर आवडतील का, त्यांना त्यात रस वाटेल का, हे पाहणं गरजेचं होतं.

मी गप्प राहिलेली बघून तो वैतागला. तो म्हणाला, 'सुधा मूर्ती आणि नारायण मूर्ती यांच्याशी माझी चांगली ओळख आहे. मिसेस मूर्ती तुमच्या या फौंडेशनच्या विश्वस्त आहेत ना ? त्यांनीच मला इथे बोलावलं आहे. म्हणून मी आलोय, नाही तर मी काही कुणी विक्रेता वगैरे नाही. माझा आणि त्यांचा इतका चांगला परिचय आहे, की त्यांना मदत करावी म्हणून मी आलोय.'



मला मोठी गंमत वाटली. 'मिसेस मूर्तींची आणि तुमची बऱ्याच वर्षांची ओळख आहे का ?' मी विचारले.

त्यावर जराही न कचरता तो म्हणाला, 'मी सुधाला फार वर्षं ओळखतो. ती माझी बालमैत्रीण आहे.'

हे सगळं फारच गंमतीदार चाललं होतं. माझी उत्सुकता वाढत चालली. या माणसाला मी आज आयुष्यात पहिल्यांदाच भेटत होते आणि हा माझा बालमित्र असल्याचा दावा करत होता.

मी मुद्दामच खट्याळपणे म्हटलं, 'पण सुधा तर धारवाडची आहे आणि तुम्ही बंगलोरचे दिसता. तुम्ही तिचे बालमित्र कसे काय ?'

आता तो जरा चपापला. तो म्हणाला, 'आपल्या वरिष्ठांविषयी तुम्ही अरे-तूरे करून बोलता ? हे वागणं बरं नव्हे. ती धारवाडची असली म्हणून काय झालं ? ती अनेकदा बंगलोरला आपल्या मावशीकडे यायची. तिच्या मावशी आमच्या शेजारीच राहतात.'

अरे देवा ! माझा कोणताही नातलग तुंगभद्रा नदी ओलांडून आजवर आलेला नव्हता. मग त्याच्या शेजारी राहणारी ही 'मावशी' नक्की कोण, ते जाणून घेण्याची मला मोठी उत्सुकता लागून राहिली.

तो पुढे म्हणाला, 'सुधा नेहमीच मला आपल्या मोठ्या भावाप्रमाणे वागवते. तिला भाऊ नाही ना. मूर्तींनं जेव्हा इन्फोसिस सुरू करायचं ठरवलं, तेव्हा ती माझाच सल्ला विचारायला आली होती. तिनंच माझ्याकडे या पुस्तकांच्या १०० प्रती विकत मागितल्या आहेत. माझी पात्रता ती जाणून आहे. तिनं ही पुस्तकं ठेवून पैसे घेऊन जा, असं मला सांगितलंय. मला इथून लवकर कन्नड साहित्य सभेला जायचंय. तिथे माझा सत्कार होणार आहे. जेव्हा जरा घाई घरा.'

या माणसावर रागवावं की त्याचा हा खोटेपणा तसाच थोडा वेळ पुढे चालू द्यावा, तेच मला कळेना. मग त्याची भामटेगिरी थोडा वेळ तशीच चालवून घ्यायची, असं मी ठरवलं. 'खरंच, मिसेस मूर्ती स्वभावानं कशा आहेत हो ?' मी जरा खोडकरपणे विचारलं.

आपली मैत्री किती घनिष्ठ आहे हे दाखवण्याची ही आयती चालून आलेली संधी त्याने मुळीच सोडली नाही. 'ओ ! ती फार चांगली, हळुवार मनाची आहे. शिवाय इतकी शांत आहे. ती एम्. ए. करत होती तेव्हा वर्गात तिला कुणी ओळखतही नसे. उगीच फुकट वेळ घालवू नको आणि काहीतरी सामाजिक कार्य कर, असं मीच तिला सांगितलं. तिची आणि मूर्तींची ओळख मीच तर करून दिली

आणि त्यांचं लग्न जुळवलं.'

'म्हणजे त्यांचं ॲरेंज्ड मॅरेज होतं की काय ?'

'अर्थातच. त्या दोघांच्या पत्रिकासुद्धा मीच तर जुळवून आणल्या. म्हणून त्या दोघा पतीपत्नींचं माझ्यावर फार प्रेम आहे. दोघं फार आदरानं वागवतात मला. शेवटी आज सुधा जी काय आहे, ती माझ्यामुळे तर आहे.'

आता हे मात्र अतीच झालं. तो पुरेसा धूर्तही नव्हता. बेफिकीर होता. माझा प्रेमविवाह होता. आम्ही एकमेकांच्या पत्रिका वगैरे बघत बसलो नव्हतो. मी बोलघेवडी होते, शांत कधीच नव्हते. आणि माझ्या पूर्ण शैक्षणिक वर्षांमध्ये, सर्व वर्गात मी एकमेव मुलगी असल्यामुळे सर्व जण मला ओळखत असत. मी एम. टेक. झालेली आहे, एम. ए. नव्हे. सामाजिक कार्य करण्याची कल्पना मूर्तींची आणि माझी होती व आमचं लग्न होण्यापूर्वी आमची नुसती मैत्री होती, तेव्हापासूनच ती आमच्या डोक्यात होती.

त्या माणसाचा खोटेपणा आता मात्र सहन करण्याच्या पलीकडे होता. आता त्याचं पितळ उघडं करण्याची वेळ आली होती. मी कोण हे त्याला आता जर कळलं नसतं, तर अजून आणखी काय काय बरळत राहिला असता, देव जाणे.

'मिस्टर', मी करड्या आवाजात म्हणाले, 'तुमचा खोटारडेपणा थांबवा आता ! नारायण मूर्तींची पत्नी सुधा मूर्ती मीच आहे आणि आज आयुष्यात प्रथमच तुम्हाला भेटत आहे. मूर्तींविषयी आणि माझ्याविषयी हे भलतंसलतं काहीतरी बोलायची तुमची हिंमत कशी झाली ? काही वाटत नाही तुम्हाला ? तुमची पुस्तकं कितीही उत्तम असली तरी ती आता मी कधीच विकत घेणार नाही. पुस्तकांमधून लेखकाचं व्यक्तिमत्त्व आणि त्याचे विचार प्रकट होत असतात. तुम्ही काय प्रकारचे आहात, तुमचं व्यक्तिमत्त्व कसं काय आहे हे मी आता पुरेपूर जाणलं आहे. तुम्ही तुमची पुस्तकं फुकट देऊ केली, तरी मी ती घेणार नाही. एक लक्षात ठेवा, प्रामाणिक माणूसच चांगला लेखक होऊ शकतो.'

त्याला चांगलाच धक्का बसलेला दिसत होता. पण त्यानं तोंड उघडून काही बोलायच्या आतच मी ऑफिसचं दार उघडून बाहेर पडले. आपण या कोणत्या जगात राहतोय अशा घृणेनं व तिरस्कारानं माझं मन भरून गेलं होतं, व एक प्रकारचं नैराश्य मला आलं होतं.

ooo



११

# राखीच्या दिवशीच तुटले बंधन

इन्फोसिस फौंडेशनचं काम करत असताना मला अनेक स्त्रिया भेटतात. त्यांचा स्वत:चा काहीही दोष नसताना त्यांना खूप भोगावं लागत असलेलं दिसतं. त्यांतील बऱ्याच स्त्रिया अशिक्षित असतात. त्यांची पिळवणूक होत असते. या अशा अभागी महिलांना मदत करणं हे आमच्या फौंडेशनच्या अनेक उद्दिष्टांपैकी एक आहे.

वेश्याव्यवसायात पडलेल्या अनेक स्त्रिया निर्दोष असतात. भोळ्या असतात. त्यांच्यातील अनेकींना अगदी तरुण वयात जबरदस्तीने या व्यवसायात ओढण्यात आलेलं असतं व त्यातून सुटका होणं जवळ जवळ अशक्यच असतं. त्यांच्यापैकी अनेक महिला या व्यवसायातून कायमचं बाहेर पडण्याची इच्छा व्यक्त करतात, पण ते कधीही शक्य होत नाही. याच 'व्यवसाया'त त्या अगदी लहान वयापासून गुंतलेल्या असतात, त्यामुळे त्यांना दुसरं कोणतंही काम जमत नाही. त्यासाठी लागणारं कौशल्य त्यांना अवगत नसतं. मग त्यांना नोकरी कोण देणार ? त्यामुळे त्यांना उदरनिर्वाहाचं दुसरं कोणतंच साधन उपलब्ध होऊ शकत नाही. अगदी अपवादात्मक एखाद्या स्त्रीनं काहीतरी धडपड करून या व्यवसायातून स्वत:ची सुटका करून घेतली, तरीसुद्धा समाज काही तिचा स्वीकार करत नाही.

गेली काही वर्षं या अभागी महिलांसाठी काम करण्याचा मला अनुभव आहे. सुरुवातीला त्या माझी भेट घेणं, माझ्याशी मोकळेपणे बोलणं टाळायच्या. पण पुन: पुन्हा मी त्यांना भेटायला जात राहिल्यावर त्या हळूहळू मोकळ्या झाल्या. त्यांच्या कहाण्या काळजाला हात घालणाऱ्या होत्या. त्या ऐकल्यावर काय बोलावं, काय प्रतिक्रिया द्यावी, हेही अनेकदा मला समजायचं नाही. त्यांचं दु:ख, त्यांच्या वेदना पाहून मनाला चटका लागल्यासारखं होई.

अशीच एकदा मी या स्त्रियांच्या भेटीसाठी गेले असताना मला तारा भेटली.

एका देवळात घरवालीचं (देहविक्रयाचं) काम करणारी ती एक मध्यमवयीन स्त्री होती. ताराकडे पाहिल्यावर ती एके काळी किती देखणी असेल, हे लक्षात येत होतं. आतासुद्धा तिच्याकडे पाहिलं की ती निर्भीड वृत्तीची आणि उत्साहाने सळसळणारी आहे हे जाणवत सळसळणारी आहे हे जाणवत होतं.

ताराला लिहिता-वाचता येत नव्हतं. तिला वाटलं, मी शाळा मास्तरीण आहे व तिला लिहा-वाचायला शिकवण्यासाठीच आले आहे. तिला शिकायचं होतं. मलाही ते आवडलं.

'तुम्हाला आणखी कोणी शिक्षिका माहीत असल्या, तर ते मला सांगा. मला खूप शिकायचंय, लिहायला-वाचायला शिकायचंय.' पहिल्या भेटीतच तिनं मोकळेपणे सांगितलं. 'पण मी त्यांना घरी नाही हं बोलावणार. त्या जिथे सांगतील तिथे जाऊन मी त्यांच्याकडून शिकेन.'

तिचा तो उत्साह बघून मलाही नवल वाटलं. मला तिच्याविषयी अधिक जाणून घ्यायची इच्छा झाली. एकदोनदा मी मुद्दाम विषय काढून पाहिला, पण स्वत:विषयी जास्त काही सांगण्याची तिची तयारी दिसेना. ती दु:खी दिसायची.

तो राखीपौर्णिमेचा दिवस होता. उत्तर कर्नाटक आणि महाराष्ट्राच्या सीमा भागातील प्रदेशात याला नारळी पौर्णिमा म्हणतात. पौर्णिमेचा हा दिवस नारळांनी साजरा करायचा. मी त्या सुमाराला आमच्या वाचनालयाच्या उपक्रमाच्या संदर्भात खेडोपाडी हिंडत होते.

मी अचानक परत एकदा ताराला भेटले. त्या दिवशी स्वच्छ ऊन पडलं होतं. तारा बांगड्या विकत घेत होती. मी तिच्याशी बोलायला थांबले.

आता हिला काय म्हणून हाक मारावी, मी संभ्रमात पडले. मग मी तिला अक्का (म्हणजे कन्नड भाषेत मोठी बहीण) म्हणून हाक मारायचं ठरवलं.

तारा देवळाच्या पायऱ्यांवर बसली होती. गर्दी जरा कमी होईल, म्हणून वाट पाहात थांबली होती. मी तिच्याकडे गेले. मला पाहून ती ओळखीचं हसली. ती जरा दु:खी दिसत होती का मलाच वाईट वाटत होतं ? माझं मलाच कळेना.

मग मी परत एकदा, हसून संभाषणाला सुरुवात केली. 'ताराअक्का, नारळी पौर्णिमेची आज केवढी गर्दी आहे ना ? आत शिरायला अजून बराच वेळ थांबावं लागेल.'

अचानक मला तिच्या डोळ्यांत राग तरळलेला दिसला. ती माझ्या अंगावर ओरडून म्हणाली, 'बाई, मला अक्का वगैरे म्हणू नका. मला त्या शब्दाची चीड आहे. ही भावाबहिणीची नाती तुमच्या जगात असतील, आमच्या नाही. तेव्हा परत



मला असलं काही म्हणू नका. तुम्ही मला तारा म्हणा किंवा ताराबाई म्हणा, पण 'तारा-अक्का' म्हणू नका. आमच्या जगात फक्त एकच नातं असतं, पुरुष आणि स्त्रीचं नातं.'

माझ्या डोळ्यांत पाणी आलं. तिच्या शब्दांमधील दाहक सत्य मला कळून चुकलं. माझ्यासोबत एक स्वयंसेवक होता. ताराचं हे बोलणं ऐकून त्याला राग आला. मी नक्की कोण आहे हे तिला सांगायला तो सरसावला. पण मीच त्याला थांबवलं.

'तारा, तुझं मन दुखावलं का मी ? माफ कर हं.' मी म्हणाले, मी 'अक्का' म्हणायचं कारण तुम्ही माझ्याहून मोठ्या आहात, एवढंच. पण तुमचं मन दुखवायचं नव्हतं मला.'

माझ्या शब्दांनी वातावरण एकदम बदलून गेलं. तारा हमसाहमशी रडू लागली. तिच्या आसवांनी तिच्या इरकली साडीचा पदर ओलाचिंब झाला. दुकानातून विकत घेतलेल्या बांगड्या एका हातात पकडून ती दुसऱ्या हाताने डोळे पुसू लागली.

मी तिच्या खांद्यावर हात ठेवला आणि काही न बोलता तशीच थांबले. ते नि:शब्द उभं राहणंच शब्दांपेक्षा कितीतरी बोलकं होतं. थोड्या वेळानं तिचं रडणं थांबलं, पण अजूनही ती खूप दु:खी दिसत होती. मी माझ्याबरोबरच्या मुलाला तिच्यासाठी चहा घेऊन येण्यास सांगितलं. थोड्या वेळानं तारा शांत झाली.

ती म्हणाली, 'मास्तरीण बाई, मी तुमच्याशी उर्मटपणे वागले. मला माफ करा. तुमची काहीच चूक नाही. उलट तुम्ही मला 'अक्का' म्हणून हाक मारून मलाच मोठेपणा दिलात. आजवर माझ्याशी इतकं चांगलं कुणीच बोललेलं नाही. लोक मला किती वेगवेगळ्या नावांनी हाका मारतात. मी माझ्या तोंडानं तुम्हाला ती सांगणार- सुद्धा नाही. काय वाट्टेल ते बोलतात. पण तुम्ही 'अक्का' म्हणालात, आणि लहानपणची आठवण आली.'

मग तारा भरभरून बोलली. आपल्या गरिबीविषयी बोलली. आपले आईवडील साथीच्या रोगात कसे मृत्युमुखी पडले ते तिनं सांगितलं. तिला केवळ एक लहान भाऊ उरला होता. खरं तर ती त्या वेळी स्वत:च इतकी लहान होती पण धाकट्या भावाचा सांभाळ करण्यासाठी तिनं मोलमजुरीचं काम पत्करलं. ती बारा वर्षांची झाली आणि तिचा भाऊ अकरा वर्षांचा. त्या वेळी त्यानं घाणेरड्या वस्तीत तिला नेऊन तेथील दलालाला तिला विकलं. गावच्या जत्रेला जाऊ या, असं सांगून त्यानं तिला तिथं नेलं होतं. तो नारळी पौर्णिमेचा दिवस होता.

तिथे त्या दिवशी, त्या देवळाच्या पायरीवर बसलेली असताना तिच्या मनात

काय चाललं असेल ते मला समजलं. तोही नारळी पौर्णिमेचाच दिवस होता... आणि त्या अक्का शब्दानं तिच्या मनातील नको त्या आठवणी जाग्या केल्या होत्या. ज्या आठवणींना दडपून टाकण्याचा, विसरून जाण्याचा ती जन्मभर प्रयत्न करत असेल, अशा आठवणी. राखी म्हणजे काही बहिणीने भावाच्या मनगटावर नुसता राखीचा धागा बांधणं नव्हे. भावाबहिणीमधील पवित्र बंधाचं ते प्रतीक आहे. आणि ताराचा काही दोष नसताना तिच्या स्वत:च्या भावानंच तिला पापाच्या गर्तेत लोटून दिलं होतं. तेही राखी पौर्णिमेच्या दिवशी.

०००



१२

# एका भिकाऱ्यानं दिलेला धडा

मीना माझी चांगली जवळची मैत्रीण. ती एल्. आय. सी.मध्ये मोठ्या पदावर आहे. चांगला पगार मिळवते. पण तिचं वागणं जरासं विचित्र आहे, खटकणारं आहे. ती नेहमी असमाधानी असते. मी तिला कधीही भेटले की थोड्या वेळानं मलाच उदास, निराश वाटू लागतं. जणू काही तिच्या ठायी असलेलं नैराश्य, औदासीन्य तिच्या सहवासात येणाऱ्यांनाही झाकोळून टाकतं. कोणत्याही विषयावर किंवा एखाद्या व्यक्तीबद्दल तिला चांगलं बोलताच येत नाही.

उदाहरणार्थ तिला जर कधी म्हटलं : 'मीना, अग राकेश शाळेत पहिला आला. तुला माहीत आहे ?'

मीनाची प्रतिक्रिया असेल : 'येणारच. त्याचे वडीलच त्या शाळेत शिकवतात.'

तिला जर कधी म्हटलं : 'मीना, श्वेता काय सुंदर आहे, नाही ?' मीनाचं उत्तर पुन्हा आपलं नकारात्मक.

'त्यात काय ? तरुण वयात घोडंसुद्धा चांगलं दिसतं. सगळा वयाचा प्रश्न असतो. जरा थोडे दिवस थांब. श्वेता कशी घाणेरडी दिसायला लागेल, बघ.'

'मीना काय छान हवा पडली आहे. चल फिरायला जाऊ.'

'नको किती गरम होतंय. फार चाललं की मला थकायला होतं. शिवाय फिरणं तब्येतीला चांगलं असतं, असं कुणी सांगितलं ? काय पुरावा आहे ?'

तर अशी मीना. ती आपल्या फ्लॅटमध्ये एकटीच राहायची, कारण तिचे आईवडील दिल्लीला होते. ती एकुलती एक मुलगी होती, त्यामुळे या ना त्या गोष्टीबद्दल सतत कुरकुर करत राहण्याची तिला सवयच होती. स्वाभाविकच तिचा सहवास कुणाला हवा असणार ? सगळे तिला टाळायचे. तिला भेटायला कधी कोणी जात नसे. अचानक एक दिवस मीनाची मुंबईला बदली झाली आणि आम्ही तिला विसरूनही गेलो.

अनेक वर्षांनंतर असंच एकदा मुंबईत फ्लोरा फाऊंटनपाशी मी मुंबईच्या पावसात अडकले होते. मुसळधार पाऊस होता आणि माझ्याकडे छत्री नव्हती. मी अकबर अलीज् डिपार्टमेंटल स्टोअरजवळ उभी होते, पाऊस थांबण्याची वाट पाहात.

अचानक मला मीना दिसली. माझी पहिली प्रतिक्रिया होती, आता इथून पळ काढावा. अगदी भर पावसात पण या मीनाची कुरकुर ऐकणं नको. पण माझी सुटका इतक्या सहजपणे होणार नव्हती. तिनं मला पाहिलं आणि जवळ येऊन प्रेमानं माझा हात पकडला. इतकंच नव्हे तर ती खूप आनंदात, उत्साहात दिसत होती.

'अग... किती दिवसांनी भेटते आहेस. अशा जुन्या मैत्रिणी भेटल्या की किती छान वाटतं ! पण तू इकडे काय करते आहेस ?'

मी मुंबईला ऑफिसच्या कामासाठी आले होते. तसं मी तिला सांगितलं.

'मग आज रात्री माझ्याकडेच राहा ना,' ती म्हणाली, 'आपण गप्पा मारू. जुनी वाईन, जुनी मैत्री आणि जुन्या आठवणींचं मूल्य करता येत नाही.'

माझा माझ्या कानांवर विश्वास बसेना. ही खरंच मीना होती का ? मी स्वत:ला एक चिमटा काढला. मी स्वप्नात तर नक्कीच नव्हते. मीना इथे माझ्या समोर खरोखरच उभी होती. माझा हात घट्ट धरून हसतमुखाने आणि हो, ती खुशीत दिसत होती. बंगलोरमधील तिच्या तीन वर्षांच्या वास्तव्यात तिला इतकं आनंदानं हसताना मी कधीच पाहिलं नव्हतं. तिच्या डोक्यात काही पांढऱ्या बटा चमकत होत्या, त्या पाहिल्या आणि मला जाणीव झाली, आपल्याला भेटून काही वर्षं लोटली आहेत ! तिच्या चेहऱ्यावर थोड्या सुरकुत्या उमटल्या होत्या, पण खरं तर पूर्वीपेक्षा ती आत्ता कितीतरी आकर्षक दिसत होती.

अखेर मी तिला कसंबसं सांगितलं, 'मीना, मी आज रात्री तुझ्याकडे नाही राहू शकत. मला रात्रीच्या जेवणाचं बोलावणं आहे. पण मला तुझं कार्ड दे... मी नंतर नक्की तुझ्याशी संपर्क साधीन.'

मीनाच्या चेहऱ्यावर क्षणभर निराशा पसरली. मग ती म्हणाली, 'निदान कुठेतरी बसून चहा तरी घेऊ.'

'पण मीना... केवढा पाऊस पडतोय.'

'पडला तर पडला. आपण आधी एक छत्री विकत घेऊ आणि मग ग्रँड हॉटेलमधे जाऊ.'

'पण या पावसात टॅक्सी तरी कशी मिळणार ?' मी कुरकुरत म्हणाले.



'मग काय झालं ? आपण चालत जाऊ.'

मी आश्चर्यानं थक्क झाले. मला माहीत असलेली मीना ती ही नव्हतीच. आज ती काय वाटेल ती तडजोड करायला तयार होती.

अखेर चिंब भिजलेल्या अवस्थेत आम्ही ग्रँड हॉटेलमध्ये पोचलो. मीनासारख्या सतत नकारात्मक विचार करायचा स्वभाव असणाऱ्या व्यक्तीमधे हा एवढा मोठा सकारात्मक असा बदल कशामुळे घडून आला हे जाणून घेण्याची माझी उत्कंठा शिगेला पोचली होती.

'मीना, एक सांग. तुला कुणी राजकुमार भेटला की काय ? तुझ्यात हा एवढा बदल कुणी घडवून आणला ?'

माझा प्रश्न ऐकून मीनाला आश्चर्य वाटलं. 'छे ग, असं कोणीही नाहीये...' ती म्हणाली.

'मग तुझ्या या सळसळत्या उत्साहाचं रहस्य तरी काय ?' मी जाहिरातीतल्या तेंडुलकरसारखं विचारलं.

ती हसून म्हणाली, 'एका भिकाऱ्यानं माझं आयुष्य बदलून टाकलं.'

ते ऐकून मी हतबुद्धच झाले. तिलाही ते जाणवलं.

'हो ना, भिकाऱ्यानं,' ती परत जणू काही मला धीर दिल्यासारखं म्हणाली. मग तिनं स्पष्ट करून सांगितलं. 'तो म्हातारा होता. आपल्या पाच वर्षांच्या नातीबरोबर आमच्या घरासमोर राहायचा. मी पूर्वीपासून किती निराशावादी विचारसरणीची होते, तुला माहीतच आहे. मी रोज घरातलं शिळं अन्न त्या भिकाऱ्याला देत असे. पण त्याच्याशी कधी एक शब्दही बोलत नसे. तोही कधी काही बोलायला यायचा नाही.'

'असाच पावसाळ्याचा दिवस. मुसळधार पाऊस पडत होता. मी बेडरूमच्या खिडकीत उभी राहून पावसाला शिव्याशाप देत होते. खरं तर मी त्या पावसात भिजतसुद्धा नव्हते. मला इतकं चिडायचं काय कारण होतं ? त्या दिवशी मला रोजच्यासारखं त्या भिकाऱ्याला आणि त्याच्या नातीला शिळं द्यायला जमलं नाही. त्यांना त्या दिवशी नक्कीच उपास घडला असणार.'

'पण तरीही माझ्या खिडकीतून मला जे काही दृश्य पाहायला मिळालं, त्यानं मी थक्क झाले. रस्त्यावर गर्दी नसल्यामुळे तो भिकारी रस्त्यातच आपल्या नातीशी खेळत होता. ते जोरजोरात हसत होते, टाळ्या वाजवत होते, ओरडून आनंद व्यक्त करत होते. जणू काही नंदनवनात असल्यासारखे ! त्यांना भुकेची पर्वा नव्हती. पावसाची तमा नव्हती. ते दोघेही चिंब भिजले होते आणि अतिशय आनंदात होते. त्यांचा तो जगण्याचा दुर्दम्य उत्साह पाहून मला त्यांचा हेवा वाटला.'

'ते दृश्य पाहून मी थोडं आत्मावलोकन केलं. माझ्या जीवनाविषयी शांतपणे विचार केला. मला जेवढ्या सुखसोयी, जेवढा ऐषाराम उपलब्ध होता, त्यांपैकी काहीसुद्धा त्यांच्यापाशी नव्हता. पण त्यांच्यापाशी एकच अशी महत्त्वाची गोष्ट होती, जी माझ्याकडे नव्हती. आयुष्य जसं काही असेल ते सुखासमाधानानं जगण्याची वृत्ती त्यांच्यापाशी होती. मला माझी स्वत:ची लाज वाटली. माझ्याकडे काय काय आहे आणि काय काय नाही याची मी यादी बनवण्यास सुरुवात केली. अनेक माणसांच्या कल्पनेतही येणार नाही अशा कितीतरी गोष्टी माझ्याकडे होत्या, आणि त्याबद्दल खरं म्हणजे मला कृतज्ञता वाटायला हवी होती. त्या भिकाऱ्याचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून त्या दिवशीपासून मी माझा जीवनविषयक दृष्टिकोन पूर्णपणे बदलायचं ठरवलं.'

मीनाचं बोलणं संपल्यावर काही क्षण नि:शब्द शांततेत गेले. त्यानंतर मीच शांततेचा भंग करत विचारलं, 'तुला असं बदलायला किती वेळ लागला ?'

त्यावर ती म्हणाली, 'ही जाणीव झाल्यानंतर आमूलाग्र बदलण्यास दोन वर्षे लागली. पण आता कशानंही फरक पडणार नाही. मी आता नेहमीच आनंदात असते. अगदी छोट्या छोट्या गोष्टींत आता मी आनंद शोधते. प्रत्येक परिस्थितीतून, प्रत्येक व्यक्तीच्या ठायी मला आनंद दिसतो.'

'मग तू तुझ्या गुरुला काही गुरुदक्षिणा दिलीस की नाही ?' मी विचारलं.

'नाही. दुर्दैवानं माझ्यात हे परिवर्तन पूर्णतया घडून आलं तोपर्यंत तो वारला होता. पण त्याच्याविषयीचा आदरभाव व्यक्त करण्याचा एक मार्ग म्हणून मी त्याच्या नातीला स्वखर्चानं बोर्डिंग स्कूलमधे दाखल केलं आहे.'

ooo



## १३

# आपलाच इतिहास आपण विसरतो आहोत....

आपल्या देशाला हुतात्म्यांची आणि थोर देशभक्तांची मोठी परंपरा आहे. आपली मान आदराने झुकून जावी असा आपला इतिहास आहे. त्यांच्या जीवनकहाण्या आपल्याला स्फूर्तिदायक ठराव्या, अशाच आहेत. पण आजच्या तरुण पिढीला या थोर महात्मांविषयी किती माहिती आहे ?

आपल्या देशातील हुतात्मापद पत्करलेल्या स्त्रियांच्या कहाण्या तर अधिकच स्फूर्तिदायी आहेत. त्यांच्यातील अनेक स्त्रिया रूढार्थाने अशिक्षित म्हणाव्या लागतील पण आपल्या शत्रूंसमोर सर्व सामर्थ्यानिशी उभ्या ठाकण्याचं आणि आपल्या देशासाठी लढण्याचं असामान्य धैर्य त्यांच्या अंगी होतं. चित्रदुर्ग जिल्ह्यातील ओबवव्वा, उत्तर कर्नाटकातील कित्तूर चन्नम्मा, बेळगाव जिल्ह्यातील बेलावाडी माअम्मा- यादी खूप मोठी आहे. ओबवव्वाजवळ एक तांदूळ सडायचं मुसळं सोडलं तर आपल्या शत्रूंचा सामना करण्यासाठी दुसरं तिसरं काही हत्यार नव्हतं. पण आजच्या तरुणांपैकी किती जणांनी तिच्याविषयी ऐकलं आहे ?

भारताच्या इतिहासात ज्या काही नायिका, थोर स्त्रिया होऊन गेल्या, त्यांमध्ये झाशीची राणी लक्ष्मीबाई हिचं नाव अग्रभागी तळपतं. एक तरुण निपुत्रिक विधवा, तिनं ब्रिटिशांच्या महासत्तेला आव्हान दिलं. तिचं धैर्य इतकं अतुलनीय होतं, की तिच्या शत्रूलासुद्धा तिच्याविषयी आदर वाटला. तिच्याविषयी कितीतरी काव्यं लिहिली गेली. तिच्या साहसाचं वर्णन किती सार्थ शब्दांत केलं जातं - तिच्या संपूर्ण सैन्यामध्ये खरा 'मर्द' कोण असेल तर फक्त तीच होती. आपल्या आजच्या किती तरुणांना तिच्याविषयी माहिती आहे ?

नुकताच मला भोपाळतर्फे 'ओजस्विनी' पुरस्कार देण्यात आला. हा समारंभ दिल्लीमध्ये संपन्न झाला. त्या पुरस्कारामध्ये एका सुंदर स्मृतिचिन्हाचा समावेश होता. हातात तळपती तलवार घेऊन घोड्यावर स्वार झालेल्या झाशीची राणी

लक्ष्मीबाई हिची ती नितांत सुंदर प्रतिकृती होती.

मी विमानानं बंगलोरला परतले. झाशीच्या राणीचा तो पुतळा असलेलं मोठं खोकं मी हँड बॅगेज म्हणून हातात धरलं होतं. कारण मी जर माझ्या इतर सामानाबरोबर ते पाठवलं तर तो पुतळा भंग पावेल अशी मला भीती वाटत होती.

दिल्ली विमानतळावरील सुरक्षा अधिकाऱ्यांना मी ही गोष्ट समजावून सांगितल्यावर ते माझ्याशी सज्जनपणे वागले. त्यांनी मेटल डिटेक्टरच्या साहाय्याने त्या पुतळ्याची तपासणी केली व तो मला विमानात घेऊन जाण्याची परवानगी दिली.

जेट एअरवेजचे कर्मचारीपण खूप चांगले वागले. मी इकॉनॉमी क्लासने चालले होते. तो एवढा मोठा पुतळा मला मांडीवर धरून बसणंही शक्य नव्हते आणि तो पायापाशी ठेवणं बरं वाटत नव्हतं. अर्थात डोक्यावरील सामान ठेवायच्या कप्प्यात तो बसला असता. पण एअर होस्टेसने तो माझ्याकडून घेतला आणि एक्झिक्यूटिव्ह क्लासमधील एका रिकाम्या आसनावर नेऊन ठेवला. मर्दानी राणी लक्ष्मीबाईच्या इतमामाला साजेशी वागणूक तिला मिळाली.

सर्वांनी मला इतकी मदत केली. मी आता जरा आरामात स्थिरस्थावर होऊन बसले. मग जरा इकडेतिकडे लक्ष गेलं. माझ्या आजूबाजूचे प्रवासी हे जे काही इतका वेळ चाललं होतं, त्यामुळे जरा कुतुहलाने माझ्याकडे पाहात होते. विमानानं आकाशात झेप घेतली. अजूनही लोक माझ्याकडे वळून बघतच होते, पण कुणी आपण होऊन काही बोललं वगैरे नाही.

'संभाषण' या विषयाबद्दल माझा स्वत:चा एक सिद्धांत आहे. पाहिजे तर त्याला आपण फॉर्म्युला म्हणूया. जर आपण किती बोलतो याचा विचार केला तर मला वाटतं ते माणसाच्या आर्थिक परिस्थितीच्या बरोबर विरुद्ध प्रमाणात, असं म्हणावं लागेल. म्हणजे असं, की आपण जर बसनं प्रवास करत असलो, तर आपले सहप्रवासी लगेच, काही आडपडदा न ठेवता मोकळेपणानं आपल्याशी बोलायला सुरुवात करतात. तेच जर आपण रेल्वेच्या फर्स्ट क्लासमधून प्रवास करत असलो, तर लोक जरा परकेपणाने वागतात. विमानप्रवासात तर सहप्रवाशानं आपण होऊन बोलण्याची शक्यता जवळजवळ नसतेच. आणि जर आपण आंतरराष्ट्रीय फ्लाईटने, तेही फर्स्ट क्लासने प्रवास करत असलो, तर आपला सहप्रवासी चोवीस तासांत एखादा शब्दसुद्धा आपल्याशी बोलत नाही.

या दिल्ली-बंगलोर फ्लाईटमधे माझ्या शेजारी विशीच्या आतील दोन तरुण मुलं होती - एक मुलगा आणि एक मुलगी. त्यांच्या अंगात उंची, महागड्या जीन्स होत्या. दोघांचेही केस इतके बारीक कापलेले होते, की दोन्ही मुलं सारखीच दिसत



होती. दोघांच्यात एवढाच फरक होता की त्या मुलीचे कान टोचलेले होते. दोघे च्युइंग गम खात, एम. पी. थ्री. प्लेअरवर संगीत ऐकत स्वत:च्या नादात बसले होते. दोघे चांगले बड्या घरचे होते, हे तर उघडच होतं. त्यांची संभाषण करण्याची मुळीच इच्छा नव्हती हेही दिसतच होतं. इतरांबरोबर बोलणं तर बाजूलाच राहो, ते एकमेकांशीसुद्धा बोलत नव्हते. संगीत आणि च्युइंग गम या दोन्ही गोष्टी एकत्र आल्या की असंच होतं.

थोड्या वेळानं मीच या शांततेचा भंग करून त्या मुलांशी बोलायचं ठरवलं. मी स्वत: कॉलेजात शिकवते त्यामुळे तरुण मुलांशी बोलताना मला मोकळेपणा वाटतो. मला त्यांच्याशी बोलायला आवडतं. त्या वयात ही मुलं सहसा धूर्त किंवा कावेबाज नसतात. ती उत्साहानं सळसळणारी, जराशी मुक्त असतात आणि त्यांचे विचारही ताजे, टवटवीत असतात.

आधी मी उगीच इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या. दोघेही बंगलोरच्याच एका कॉलेजात शिकत होते. तो मुलगा व ती मुलगी चुलत भावंडं होती व दिल्लीला आपल्या आजीआजोबांना भेटून आता परत चालली होती.

त्या मुलीनं जरा चाचरत विचारलं. 'तुमच्याकडे तो काळ्या घोड्यावर स्वार झालेल्या बाईचा पुतळा आहे ना ? छान खेळणं आहे. ते बंगलोरला मिळत नाही का ? तुम्हाला ते जवळ बाळगायला इतका त्रास होतोय, मग तरी ते तुम्ही काही खास कारणाने स्वत: घेऊन चाललाय का ?'

'ते खेळणं नाहीये. तो पुरस्कार आहे,' मी तिला सांगितलं.

आता तो तरुण मुलगा उत्सुकतेनं विचारू लागला. 'तुम्हाला घोड्यांची खूप आवड आहे, वाटतं ?'

मी माझ्या आजवरच्या आयुष्यात कधीच घोड्याची रेस पाहायला गेलेली नाही. मला ते ऐकून फार विचित्र वाटलं. संध्याकाळची फ्लाईट असल्यानं अंधार होता म्हणून त्या मुलांना माझ्या चेहऱ्यावरचे भाव दिसले नाहीत.

त्या मुलानं विचारलं, 'हे घोड्यांच्या रेसबद्दल अॅवॉर्ड मिळालं आहे का ? त्या सुंदर घोड्यावर एक बाई बसली आहे.'

त्या मुलांना माझा पुरस्कार पाहून फक्त रेसची आणि घोड्यांची आठवण झाली हे मला कळून चुकलं. त्या घोड्यावर आरूढ झालेली स्त्री कोण होती हे त्यांना मुळीच समजलं नव्हतं. आपण सांगावं का त्यांना ?

'तुम्ही जरा तिकडे जाऊन तो पुतळा नीट निरखून बघा, आणि जरा विचार करून तुम्हांला काय वाटतं, ते सांगा... चालेल ?' मी म्हणाले.

‘आम्ही तो पुतळा नीट निरखून पाहिलाय. म्हणूनच तर आम्ही तुम्हाला ते विचारलं,’ मुलं म्हणाली.

आता मात्र मला धक्का बसला. मी स्वत: एक शिक्षिका असल्यामुळे, आता या मुलांना झाशीची राणी लक्ष्मीबाई हिच्याविषयी सांगणं माझं कर्तव्य आहे, असं मला वाटलं. (मला प्रत्येक तरुण मुलगा किवा मुलगी हा एक विद्यार्थी वाटतो आणि त्याला ज्ञानदान करण्याची एकही संधी मी सोडत नाही, असं माझ्या मुलाचं मत आहे, व त्यावरून तो मला नेहमी चिडवत असतो.)

‘तुम्ही पहिल्या स्वातंत्र्यसमराविषयी काही ऐकलं आहे का ?’ मी त्या मुलांना विचारलं.

‘हो, १९४२ साली झालं ते.’ तो मुलगा म्हणाला.

त्यावर त्या मुलीने पुष्टी जोडली, ‘हो ना. आम्ही तो सिनेमा पाहिलाय ना. ‘१९४२ अ लव्ह स्टोरी’ भारतीय आणि ब्रिटिश यांच्यातील युद्ध. त्यात मनीषा कोईराला काय सुंदर दिसते !’

‘नाही, नाही. ती तर ‘छोडो भारत’ चळवळ होती. पहिलं भारतीय स्वातंत्र्य समर तत्पूर्वी जवळ जवळ शंभर वर्षं आधी लढलं गेलं, आणि त्यात आपण हरलो.’

त्यावर ती मुलं काहीच बोलली नाहीत.

‘१८५७मध्ये भारतात इंग्रजांच्या विरोधात एक संग्राम झाला. तरुण राणी, झाशीची राणी लक्ष्मीबाई त्या वेळी ब्रिटिशांविरुद्ध लढली. तिनं आपल्या सेनेचं नेतृत्व केले. खरं तर तिला गप्प बसून, ब्रिटिशांकडून तनखा स्वीकारून ऐषारामात आयुष्य घालवता आलं असतं. पण तिनं तसं केलं नाही. कारण ती प्रखर देशभक्त होती. असामान्य धैर्यानं ती युद्धात लढली व रणांगणावरील तिचं हे युद्धकौशल्य पाहून तिच्या शत्रूलाही विस्मय वाटल्यावाचून राहिला नाही. तेव्हापासून तिला धैर्याचं प्रतीक मानतात व भारतीय जनतेच्या स्वातंत्र्यप्रेमाचं मूर्त स्वरूप मानतात. आपणां सर्वांना स्वतंत्र भारतात जगता यावं म्हणून तिनं मरण पत्करलं.’

दोन्ही मुलं एक अक्षरही न बोलता गप्पपणे माझं बोलणं ऐकत होती, आणि च्युईंग गम न चघळता.

ooo



१४

# आधी डोकेदुखी द्या... मग औषध द्या...

प्रवास करणं हा एक अत्यंत आनंददायी अनुभव असतो. प्रवासाशिवाय शिक्षण अपुरं असतं. प्रवासानं ज्ञानाची कवाडं उघडतात. त्यामुळे आपले वाडवडील म्हणतात - ‘सीईंग इज बिलीव्हिंग.’

आपला देश अनेक अर्थांनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. आपल्या इथे इतकी राज्ये आहेत, प्रत्येक राज्याची वेगळी भाषा, वेगळी प्रथा, रूढी, परंपरा, वृक्षवल्ली, पशुपक्षी निराळे. नुसत्या भारतभर प्रवास करूनसुद्धा देशोदेशी पर्यटन केल्याचा आनंद आपल्याला मिळू शकतो.

आपण जर बसने किंवा रेल्वेच्या सेंकड क्लासने प्रवास केला तर आपल्या भिन्न भिन्न सामाजिक स्तरांतून आलेले, भिन्न पार्श्वभूमी असलेले लोक भेटतात. बस किंवा ट्रेनमधे सहप्रवाशांशी गप्पा मारण्याचा अनुभव फारच छान असतो.

मला हा अनुभव अनेकदा येतो - अशीच एकदा मी दिवसाची ट्रेन घेऊन बंगलोरहून हुबळीला निघाले होते. साधारणपणे अशा गाड्यांना तिकिटाचं आरक्षण करण्याची गरज नसते. निसर्गसौंदर्याचा आनंद मनमुराद लुटता येतो आणि वेगवेगळ्या लोकांना भेटता येतं.

मी अडीच वाजता बंगलोर स्टेशनवर गाडीत चढले. गाडी रात्री दहापर्यंत हुबळीला पोचणार होती. गेले दोन दिवस एका उपक्रमासाठी मी अतोनात झटून काम केलं होतं, त्यामुळे मी थकले होते. मला विश्रांतीची नितांत गरज होती.

मी खिडकीची जागा पकडली, हातपाय ताणून आळस दिला आणि निवांत बसले. थोड्याच वेळात मला डुलकी लागली. इतक्यात कोणीतरी कंपार्टमेंटमधे शिरलं आणि माझ्या शेजारी येऊन बसलं. मी डोळे उघडून पाहिलं, तर ती एक पंचवीस वर्षांची तरुणी होती. सुती साडी नेसली होती. ती बहुधा अगदी आयत्या वेळी स्टेशनावर पोचली असणार व तिनं पळत गाडी पकडली असणार, कारण ती

घामानं डवरली होती. तिच्या अंगावर एकही दागिना नव्हता. ती एखाद्या अगदी सामान्य मध्यमवर्गीय कुटुंबातील मुलगी असणार.

ती बसली व तिनं पर्समधील आरशात पाहून रुमालानं घाम टिपण्यास सुरुवात केली. थोडं पाणी प्यायलं आणि माझ्याकडे पाहिलं. परीक्षेला नीट व्यवस्थित तयारी करून जाणाऱ्या एखाद्या उत्साही विद्यार्थिनीसारखी ती मला भासली. ती माझ्याकडे पाहून हसली. तिला बहुधा माझ्याशी बोलायचं असावं.

तिचा पहिला प्रश्न अर्थातच होता, 'तुम्ही कुठे निघालाय ?'

'हुबळीला' मी म्हणाले.

'हुबळीला कुठे ?'

तिला सगळा तपशील लगेच द्यावा की नाही... मी जराशी घुटमळले. पण मग मी सांगून टाकले, 'विश्वेश्वरनगर. तुम्हाला माहीत आहे ?'

'हो, साधारण.' ती म्हणाली.

'मी शांती कॉलनीत चालले आहे.'

'शांती कॉलनीत ?' तिने विचारले. 'म्हणजे नक्की कुठल्या ? कारण दोन शांती कॉलनी आहेत.'

तिला त्या भागाची बरीच माहिती दिसत होती. मला आश्चर्य वाटलं. 'रेल्वे लाईनच्या जवळची.'

'पण दोन्ही कॉलन्या रेल्वे लाईनच्या जवळच आहेत. ही उत्तरेला आहे की दक्षिणेला ?' तिनं विचारलं.

'उत्तरेला.' मी म्हणाले.

आता तिची उत्सुकता शमली असेल व ती आणखी काही प्रश्न विचारणार नाही, असं मला वाटलं. मला विश्रांती घ्यायची होती.

मी मुळात तशी मनमोकळ्या स्वभावाची आहे. वेगवेगळ्या लोकांशी बोलायला मला आवडतं. पण त्या दिवशी रेल्वेत मी फार दमले होते... कुणाशी गप्पा वगैरे मारायचा मूडही नव्हता. पण त्या मुलीला मात्र बोलायचं होतं.

'तुम्ही नोकरी करता ?' तिनं विचारलं.

आता ती आणखीही बरेच तपशील विचारणार हे लक्षात आल्यामुळे मी तिला घाईनं आधीच सगळी माहिती पुरवली. 'हो. मी कॉलेजात नोकरी करते. आता सुट्या लागल्या आहेत. मी मूळची हुबळीचीच आहे, म्हणून तिकडे निघाले आहे.'

यावर तरी तिचे समाधान होऊन ती गप्प बसेल असं मला वाटलं खरं. पण तो माझा गैरसमज होता. 'अरे वा ! तुम्ही प्राध्यापिका आहात तर ! कुठले विषय



शिकवता तुम्ही ?'

जे लोक मुळात बडबडे असतात त्यांना गप्पा मारायला कोणताही विषय चालतो. जे अबोल असतात ते मात्र एका शब्दात उत्तर देऊन बोलणं संपवतात.

काही लोक दुसऱ्याला बोलतं करून त्यांच्याकडून बरीच माहिती काढून घेतात, पण स्वत:विषयी मात्र एक शब्दही सांगत नाहीत. ही माझ्या समोरची तरुणीसुद्धा तशीच दिसत होती. आता माझी झोप उडाली. कंटाळा पण पळून गेला. मी पण आता त्या संभाषणाच्या खेळात सहभागी व्हायचं ठरवलं. बघूया, ही किती प्रश्न विचारते, ते !

'मी ख्राईस्ट कॉलेजमधे कॉम्प्युटर सायन्स शिकवते. आता तरी तिचे प्रश्न थांबतील, असं मला वाटत होतं. पण ते खरं नव्हतं.'

'अरे, वा ! कॉम्प्युटर्स. आजकाल तर कॉम्प्युटर नाही असं ठिकाणच नसेल. पुढे कधीतरी तर असाही दिवस उजाडेल, की ज्याला कॉम्प्युटरची माहिती नसेल, त्याला अशिक्षित म्हणतील. तुम्हाला काय वाटतं ?'

वेगवेगळे प्रश्न विचारून मला पुन:पुन्हा संभाषणात ओढण्याच्या तिच्या कौशल्याचं मला नवल वाटलं.

'कॉम्प्युटरचं शिक्षण आपण नक्की कशाला म्हणतो, त्यावर ते अवलंबून आहे.' मी एखाद्या मॅनेजमेंट कन्सल्टंटसारखं उत्तर दिलं.

तिनं मात्र यावर लगेच भाष्य केलं. 'मला वाटतं शिक्षण आणि ज्ञान यांत फार फरक आहे. नुसतं शिक्षण घेणं याचा अर्थ एखाद्या विषयाची माहिती करून घेणं पण त्या विषयाचं ज्ञान आहे याचा अर्थ जे काही आपण शिकलो, ते नीट समजलं, असा अर्थ होतो. तुम्हाला माझी ही व्याख्या कशी वाटते ?'

या मुलीला काय म्हणावं, तेच मला समजेना. एव्हाना ट्रेन बंगलोर शहर सोडून बाहेर पडली होती व तुमकूरकडे निघाली होती. बाहेरचं दृश्य अत्यंत रमणीय होतं. पावसाळा नुकता संपला असल्यानं तळी काठोकाठ भरली होती. हवा प्रसन्न होती. एअरकंडिशनिंगची किंवा पंख्यांची गरज भासत नव्हती. शेतात स्त्री-पुरुष कामं करताना दिसत होते. गुरं चरत होती. आभाळाच्या पार्श्वभूमीवर पर्वतरांगा दिमाखात उभ्या होत्या. दुपार असूनही सूर्याचा ताप जाणवत नव्हता.

ही मुलगी जर अशीच सतत बोलत राहिली तर प्रवासातील उरलेले सहासात तास कसे काय काढायचे, असा मला प्रश्न पडला. मी दमले असून मला विश्रांतीची गरज आहे व थोडा एकांत हवा आहे... असं तिला स्पष्टच सांगितलं, तर ?

पण का कोण जाणे, असं स्पष्ट सांगणं मला काही जमेना. ती इतकी निरागस दिसत होती. ती उत्साहानं नुसती सळसळत होती. तिच्या चेहऱ्यावर मनमोकळे भाव होते. उत्सुकता होती. माझ्या विद्यार्थ्यांसारखीच ती दिसत होती. अखेर मी एक प्राध्यापिका होते. मी तिला असं कसं सांगणार ? त्यामुळे मी नुसती हसले.

'हसणं ते प्रकृतीला चांगलं असतं,' ती तरुण मुलगी शांततेचा भंग करत म्हणाली. 'तुम्ही हसलात की जगही तुमच्याकडे बघून हसतं. पण तुम्ही रडता, तेव्हा मात्र तुम्ही एकटे असता. खरं की नाही ?'

'वा ! छान सुविचार आहे.' मी म्हणाले. आता आपल्याला झोप मिळणार नाही, अशी मी मनाची तयारी केली होती.

'हो पण हे वाक्य माझं नाही काही ! तो अमिताभ बच्चनचा डायलॉग आहे. तुम्हाला अमिताभ आवडतो ?'

मला वाटलं, हिला जरा आश्चर्याचा धक्का द्यावा, म्हणून मी म्हटलं, 'नाही. मला हृतिक रोशन आवडतो.'

'हो, तो काय देखणा आहे !' क्षणार्धात अमिताभला विसरून हृतिकचं कौतुक तिनं सुरू केलं. 'हृतिक देखणा दिसतो, कारण त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा बुजरा भाव आहे. जर एखाद्या तरुणाच्या किंवा तरुणीच्या चेहऱ्यावर असा लाजरा भाव नसेल, तर ते भावशून्य दिसतात. अक्षयच्या चेहऱ्यावर पण असाच एक बुजरा भाव आहे, नाही का ?'

'कुठला अक्षय ?' या सर्व वेळ मीच तिच्या प्रश्नांची उत्तरं देत होते. आता पहिल्यांदाच मी तिला एक प्रश्न विचारला. त्या संपूर्ण संभाषणात मी नकळत ओढली गेले होते. संभाषण हे एखाद्या भोकासारखं असतं. हवं असो वा नसो, त्यात आपण ओढले जातोच.

'तुम्हाला अक्षय नाही माहीत ? अक्षय खन्ना. अक्षय कुमार नव्हे. अक्षय खन्ना हा विनोद खन्नाला त्याच्या पहिल्या बायकोपासून झालेला मुलगा. त्याने तालमध्ये ऐश्वर्या रॉयबरोबर काम केलंय आणि अक्षय कुमारचं नुकतंच ट्विंकल खन्नाशी लग्न झालं.'

फिल्म इंडस्ट्रीचं तिचं इतकं सखोल ज्ञान पाहून मला नवल वाटलं.

सकाळपासून माझं डोकं जरा दुखत होतं, ते आता परत ठणकू लागलं. या सततच्या बोलण्यामुळे तर नसेल ना ? मी नुसता एक प्रश्न विचारला तर त्यावर हिची एवढी बडबड... मग आता हुबळीला पोचेपर्यंत काय होणार ? तिथं मला



काही काम करणं तरी जमेल का नाही ? गेला दीड तास ती मुलगी सतत प्रश्न विचारत होती, बोलत होती. माझं दुखणारं डोकं त्याचं साक्षीदार होतं.

हे मात्र अती झालं. आता आपल्याला झोप हवी आहे, असं तिला स्पष्टच सांगायचं, मी ठरवलं. माझं डोकं आता इतकं ठणकत होतं, की मी नकळत दोन्ही बोटांनी स्वत:चं कपाळ चोळलं.

'तुम्हाला बरं वाटत नाहीये का ?' तिनं काळजीनं विचारलं.

'माझं डोकं सकाळी दुखत होतं,' मी म्हणाले तिच्या बडबडीनं माझी डोकेदुखी वाढल्याचं काही मी तिला बोलले नाही.

'मग तुमच्याकडे काही औषध आहे का ?' तिनं विचारलं.

'नाही.'

तिनं आपली बॅग उघडून आतून बामची बाटली काढून मला दिली. 'हे एक नवीन औषध आहे. निरंजना बाम. डोकेदुखीवर एकदम गुणकारी आहे. वापरल्यावर तुम्हाला एकदम ताजंतवानं आणि छान वाटेल. त्याचा सुवास छान आहे. त्यानं अंगदुखीपण थांबते. शिवाय चिकटपणाही नाही. हे आयुर्वेदिक औषध आहे. बाजारात मिळणाऱ्या इतर बामपेक्षा किंमत कमी आहे, पण हमखास गुण येतो. शिवाय जास्त खरेदीवर डिस्काऊंटही मिळेल. ही सँपलची बाटली आहे.'

आता माझी उत्सुकता वाढली. 'तू कुठे कामाला आहेस ?' मी विचारलं.

'मी निरंजना बामची सेल्सगर्ल आहे,' ती हसून म्हणाली.

खरंच, हसणं प्रकृतीसाठी नक्कीच चांगलं असतं.

ooo

# १५

# खरंच स्टोव्ह भडकला का ?

संस्कृतमधे एक सुभाषित आहे, 'यत्र नार्यस्तु पूजन्ते, रमन्ते तत्र देवता:' जिथे स्त्री पूजनीय मानली जाते, जिथे तिला आदरभावाने वागवण्यात येतं, तिथे ईश्वराचा वास असतो. पण खऱ्या आयुष्यात मात्र हे तितकंसं खरं नाही. आपल्या देशात फार थोड्या स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य, उत्तम प्रकारचं शिक्षण घेण्याचं स्वातंत्र्य किंवा आपला पती आपण स्वत: निवडण्याचं स्वातंत्र्य आहे. आपल्याकडे अनेक स्त्रियांना अन्यायकारक वागणूक मिळत असलेली दिसते.

स्त्रियांची अशी दुर्दशा होण्याचं एक कारण म्हणजे शिक्षणाचा अभाव, व परिणामी त्यातूनच उद्भवलेलं आर्थिक पारतंत्र्य. स्त्री जर आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र नसेल, तर तिचं आयुष्य फार कठीण असतं.

एकदा माझी एक डॉक्टर मैत्रीण स्त्री गर्भाच्या हत्येच्या प्रश्नाची चर्चा करत होती. ती स्वत: सरकारी रुग्णालयात स्त्री-रोग तज्ज्ञ म्हणून काम करत असल्यामुळे स्वाभाविकच तिला या विषयाची अगदी खरीखुरी साद्यंत माहिती होती. तिनं मला प्रश्न केला, 'स्त्रीच्या चेहऱ्यावरील पराकोटीचं दु:ख तुला पाहायचंय ? मग चल, मी तुला दाखवते.'

तिनं मला रुग्यालयातल्या भाजलेल्या रुग्णांच्या वॉर्डमध्ये नेलं. दिल्लीच्या रेड फोर्टमधे लिहिलेल्या एका वचनात थोडाबदल करून म्हणायचं झालं तर 'पृथ्वीतलावर जर नरक कुठे असेल तर या इथे आहे.' तेथील वातावरण अत्यंत निराशाजनक होतं. जवळजवळ सर्वच रुग्ण स्त्रिया होत्या. त्यांतील बहुतांशी स्त्रिया १८ ते २८ वयोगटातील होत्या. अत्यंत गरीब परिस्थितीतील होत्या. त्या सर्व जणी यातनांनी तळमळत होत्या. सर्वांची कहाणी सारखीच होती - 'मी स्वयंपाक करायला म्हणून स्टोव्ह पेटवायला गेले. स्टोव्हचा भडका उडाला. नायलॉनच्या साडीचा पदर पेटला. सगळी चूक माझीच आहे. माझा नवरा फार चांगला आहे.



माझे सासू-सासरे माझ्या आईवडिलांप्रमाणे आहेत.'

आपल्या देशात अनेक तरुण विवाहित स्त्रिया या अशा तथाकथित स्टोव्हच्या भडक्याने मृत्युमुखी पडत असतात. या स्टोव्ह तयार करणाऱ्या कंपन्यांवर कोणीही खटला कसा नाही भरत ? आपल्याला सर्वांनाच याचं उत्तर माहीत आहे. हे काही स्टोव्हचा भडका उडून झालेले अपघात नसतातच. ज्या देशात दुर्गामातेची पूजा केली जाते आणि स्त्रीला 'स्त्री-शक्ती' म्हणून संबोधण्यात येते, त्या देशात आपल्याच बहिणींना एखाद्या वांग्याप्रमाणे निर्दयपणे भाजण्यात येतं. मला ते पाहून रडू येतं.

त्या भयानक वॉर्डमधे एक स्त्री तर गर्भवती होती. ती २४ नंबरच्या पलंगावर झोपली होती. तीसुद्धा 'स्टोव्हचा भडका' उडाल्यामुळेच भाजलेली होती. ती बहुधा वाचणार नाही, असं मला माझ्या डॉक्टर मैत्रिणीनं सांगितलं. तुला जर तिच्याशी बोलायचं असलं तर बोल ! माझी मैत्रीण मला म्हणाली. पण त्या वेदनेनं तळमळत असलेल्या गरीब मुलीसमोर जाण्याचं धैर्य मला काही झालं नाही. ते दृश्यसुद्धा सहन होण्यापलीकडचं होतं. पण आपण काहीतरी बोललं पाहिजे असं मला आतून सारखं वाटत होतं. पण काय बोलावं ते मात्र समजत नव्हतं. माझी तिच्याशी बोलायची इच्छा असल्याचं त्या स्त्रीला बहुधा जाणवलं असावं, कारण त्या मरणयातना सोसत असतानासुद्धा तीच आपण होऊन माझ्याशी बोलली.

'अम्मा' ती म्हणाली, 'माझे आता किती दिवस उरले आहेत, सांगता येत नाही. पण मला तुम्हाला काहीतरी सांगायचंय. माझ्या आईवडिलांनी जर मला शिकवलं असतं, मला जर काहीतरी नोकरी असती, माझ्या आईवडिलांना कमी मुलं असती, तर आज माझी ही अवस्था झाली नसती.' ती याहून अधिक काही बोलू शकली नाही. ती किंचाळली. तिचा चेहरा यातनांनी पिळवटला. तिला त्या वेदना असह्य होऊ लागल्या. तिची ती दारुण अवस्था मला बघवेना. मी बाहेर येऊन पायऱ्यांवर बसले. माझं मन विषण्ण झालं होतं.

काही क्षण तसेच गेले. नंतर माझं लक्ष गेलं तर एक वृद्ध स्त्री कोपऱ्यात बसून मूकपणे रडत होती. ती थकली भागलेली फार गरीब दिसत होती. तिची फार पिळवणूक झाली असावी. ती एकटीच बसली होती. मी तिच्या जवळ जाऊन तिची विचारपूस केली.

'तुम्ही आता जिच्याशी बोलत होतात, ती दुर्दैवी मुलगी माझीच. तिला लवकर मरण येऊ दे, अशीच मी देवाची प्रार्थना करत आहे.'

आपल्या मुलीच्या मरणाची प्रार्थना करण्याची वेळ एखाद्या मातेवर यावी, याइतकी दुर्दैवी गोष्ट आणखी कोणती असू शकेल ?

तिचं मूक रुदन थांबून आता ती हमसाहमशी रडू लागली. तिला शांत करण्यासाठी काहीतरी बोलायचं म्हणून मी विचारलं, 'स्टोव्हचा भडका कसा काय उडाला ?'

'त्यांच्या घरात स्टोव्ह नाहीच आहे.' ती वृद्धा म्हणाली. 'ते सगळं खोटं आहे. आम्हांला पाच मुली. हीच सर्वात मोठी. ती नवव्या इयत्तेत असतानाच आम्ही तिला शाळेतून काढलं. ती अभ्यासात चांगली हुशार होती. पण आम्ही तरी काय करणार ? मला घरकामात मदतीला कुणीतरी हवं होतं. धाकट्या मुलांना सांभाळायला कुणीतरी हवं होतं. त्यामुळे तिला शाळा सोडावी लागली. ती स्वत: लहान असतानाच आपल्या पाठच्या बहिणींना सांभाळायची. काही वर्षांनी आम्ही तिच्या लग्नाचा विचार केला. आमच्या आजूबाजूला सगळ्याच मुलींना लहान वयातच उजवतात. आम्हीही मुलीचं लग्न लवकर केलं नाही, तर लोक काय म्हणतील ? आम्ही चांगला हुंडा वगैरे देऊन आमच्या परीनं तिचं थाटामाटात लग्न करून दिलं.'

हे सगळं अगदी ठराविक साच्यात बसणारंच होतं आणि नंतर घडलेल्या घटनाही अगदी तशाच !

ती अगतिक बाई बोलतच होती. 'सासरचे लोक खुष नव्हते. तिचा नवरा आणि सासू तिला पैशासाठी मारायचे. मग ती माहेरी यायची. तिला सासरची माणसं इतकं वाईट वागावायची, हे माहिती असूनही आम्ही तिला परत पाठवायचो. आमच्या बाकीच्या मुलींची लग्नं व्हायची आहेत. शिवाय एकदा लग्न झालं की मुलीची जागा आपल्या नवऱ्याच्या घरीच असते ना ?'

या वर्षानुवर्षं चालत आलेल्या तत्त्वाविरूद्ध आवाज कोण उठवणार ?

मी त्या स्त्रीला विचारलं, 'तुमचा नवरा काय करतो ?'

तो सुतार होता, असं तिनं सांगितलं. 'त्याला वाटतं, मुलगा असलाच पाहिजे. तरच आयुष्याला काहीतरी अर्थ आहे.'

आपल्या देशात अजूनही कित्येक लोकांच्या आयुष्यात या गोष्टीला किती महत्त्व आहे त्याचं आणखी एक उदाहरण.

आता तिच्या दु:खाचा भर थोडा ओसरला होता. पण तिच्या डोळ्यांत मला संताप स्पष्ट दिसत होता. तिची कहाणी अगदी साचेबंद होती. 'आम्हांला वाटलं, पोरंबाळं झालं की सगळं ठीक होईल. पण तसं झालं नाही. तिला दिवस राहिले. तिला मुलगी होणार आहे असं तिच्या सासूला कळलं. मग त्यांनी माझ्या मुलीलाच मारून टाकायचं ठरवलं. माझ्या मुलीनं मृत्यूपूर्व जबानीत लिहून दिलं- एकदा मध्यरात्री तिच्या नणंदेनं तिचे हात बांधले, तिच्या नवऱ्यानं तिच्यावर केरोसीन ओतलं आणि सासूनं काडी लावली. माझी बाहुलीसारखी पोरगी कापरासारखी जळाली.'

एवढं बोलून ती अनावर होऊन रडू लागली. डोळ्यांतून घळाघळा पाणी वाहू लागलं. तिचं सांत्वन कसं करावं, तेच मला कळेना. मी पुटपुटले, 'काळजी करू नका. कायदा काय ती कारवाई करीलच, शिक्षा होईल.'

पण सासरच्या लोकांनी त्याचीही काळजी घेतली होती. नवऱ्यानं धमकी दिली होती, 'जर का खरं काय ते सांगितलं, तर तुझ्या बहिणींचं काही खरं नाही. मग त्यांच्या लग्नाची बात तर विसराच.' मग तिनं आपली मृत्युपूर्व जबानी परत घेतली.

अशा प्रकारे गुन्हेगार सुरक्षित राहिले. समाजाच्या लालसेच्या वेदीवर आणखी एका मुलीचा बळी गेला. त्या गरीब मुलीच्या तोंडाच्या शब्दांचा अर्थ मला आता उमगला. जर तिला शिक्षणाची संधी मिळाली असती, तर तिनं नोकरी धरली असती आणि आपल्या नवऱ्याला सोडलं असतं. जर तिच्या आईवडिलांना कमी मुलं असती, तर त्यांनी तिला आपल्याजवळ ठेवून घेतलं असतं. तिची काळजी घेतली असती. आपल्याविषयी लोक काय बोलतील याची पर्वा तिच्या आईवडिलांनी केली पण नियतीनं आपल्या मुलीच्या पदरात काय वाढून ठेवलंय, त्याची पर्वा त्यांनी केली नाही.

या तरुण गरोदर स्त्रीच्या कहाणीचा अंतही अशाच इतर स्टोव्हचा भडका उडालेल्या कहाण्यांसारखाच होईल. तिचा नवरा मोकळा होईल, परत एक लग्न करायला. अशाच घटना परत परत घडतील. ही समस्या अशीच चालू राहणार, कारण गुन्हेगारांना गुन्हा घडताक्षणी लगेच शिक्षा होईल, अशी कोणतीही यंत्रणा आपल्याकडे नाही. अगदी खटला भरला गेलाच, तरीही तो न्यायालयात चार-पाच वर्षं रेंगाळतो. भौतिक वस्तू मिळवण्याची लालसा दिवसेंदिवस वाढतच चालली आहे, त्यामुळेच लोक हुंड्यासारख्या सोप्या मार्गाचा अवलंब करतात.

'यत्र नार्यस्तु पूजन्ते, रमन्ते...' असे शब्द पुनश्च माझ्या ओठांवर आले. नकळत माझ्या डोळ्यांत पाणी तरारलं.

एवढ्यात ड्यूटीवरची नर्स आली आणि तिने निर्विकारपणे जाहीर केलं, 'चोवीस नंबरच्या बेडवरची पेशंट वारली.'

 OOO

## १६

# विशीत आदर्शवाद, चाळिशीत वास्तववाद

काही दिवसांपूर्वीच आमच्या जुन्या मित्रमैत्रिणींचं स्नेहसंमेलन झालं. आम्ही सगळ्या बालमैत्रिणी. आमची लग्नं झाल्यावर आम्ही असं भेटायला सुरुवात केली. लग्नं झाल्यावर, मुलंबाळं झाल्यावर आणि आता आमच्या मुलांच्या लग्नांच्या निमित्तानं आम्ही भेटत असतो. आमची सर्वांची वयं झाली आहेत. त्याच्या पाऊलखुणा आमच्या चेहऱ्यांवर उमटल्या आहेत. पण तरीही आम्ही भेटतो. सुखदुःखांच्या गोष्टी करतो. कधीतरी एखादी मैत्रीण खूप वर्षांनंतर अचानक भेटते, आमच्या स्नेहसंमेलनाला हजेरी लावते, पण ती लगेच आमच्यात कधी मिसळून जाते, कळतसुद्धा नाही.

गेल्या पंचवीस वर्षांत खूप बदल झाले आहेत. यांतले काही बदल तर इतके अशक्यप्राय वाटत होते, पण आता ते घडून आल्यानंतर त्याविषयी विचार करताना हे वाटतं. आमची सर्वांची इतकी स्वप्नं होती. पण त्यांतील फारच थोडी साकार झाली आहेत.

आम्ही कॉलेजात असताना आमची मैत्रीण विमला अतिशय सुंदर होती. ती इतकी सुंदर होती, की अनेकांना ती सिनेमाची हिरॉईनच वाटायची. तिला आपल्या सौंदर्याची व्यवस्थित जाणीव होती व गर्वही होता. पण आता पंचवीस वर्षांनंतर तिला पाहिल्यावर वाटलं, आपल्या समोरची ही व्यक्ती विमलाच आहे का ? तिचे ते लांबसडक काळेभोर केस कुठे गेले ? ती मुलायम त्वचा कुठे गेली ? आता तिच्या त्वचेवर सुरकुत्या पडल्या होत्या व ती एखाद्या पिंपाप्रमाणे बेढब झाली होती. तिचे केस पांढरे, विरळ झालेले व बारीक कापलेले होते.

विमला एखाद्या विचारवंताप्रमाणे बोलत होती. सौंदर्य चिरस्थायी नसतं, ते क्षणभंगुर असतं. पण आपण जेव्हा तरुण असतो, तेव्हा आपल्याला वाटतं, हे सौंदर्य चिरकाळ टिकणार आहे. पण सौंदर्य हे बुद्धिमत्तेप्रमाणे नसतं. ती म्हणाली. बुद्धिमत्ता कशी कायम आपल्याबरोबर राहते.



माझ्या विनुता नावाच्या मैत्रिणीनं विमलेचा हा सिद्धांत खोटा ठरवला. विनुता ही आमच्या कॉलेजातील अत्यंत बुद्धिमान मुलगी. अत्यंत हुशार विद्यार्थिनांमधे तिची गणना होई. तिला सर्व जण मिनी कॉम्प्युटर म्हणत. प्रत्येक बाबतीत तिला जणू निसर्गदत्त देणगी होती. ती सुंदर होती, बुद्धिमान होती आणि मुख्य म्हणजे अत्यंत साधी. तिला कशाचाही गर्व नव्हता, अहंकार नव्हता. विनुताचं लग्न कुणाशी बरं होईल, असं आम्हांला नेहमीच वाटायचं. या इतक्या सद्गुणी, सुंदर मुलीला तसाच अनुरूप वर मिळणंही कठीण होतं.

विनुताला कॉलेजात एक चांगला मुलगा भेटला. तो अत्यंत बुद्धिमान होता. विनुता आणि पार्थ दोघेही इतके हुशार, दोघांना एकमेकांच्या बुद्धिमत्तेविषयी आदर, अभिमान वाटेल, ते एकमेकांबरोबर सुखात राहतील, असं आम्हांला वाटायचं. पण ते खोटं ठरलं.

अनेक वर्षांनंतर विनुता एकदा भेटली. ती अत्यंत निस्तेज दिसत होती. जीवन जगण्याचा तिचा उत्साहच जणू संपून गेला होता. कॉलेजात असताना हीच विनुता किती उत्साहानं सळसळत असायची. कॉलेजचा दिवस असो, पाककला स्पर्धा असो नाही तर गणिती कोडे, विनुता त्यात अगदी समरसून जायची. बाकी कुणापेक्षाही अधिक. पण तिचं ते चैतन्य आता लोपलं होतं, सतत टीकाटिपण्णी करणाऱ्या पतीच्या सहवासात ती कोळपत चालली होती.

'तुझा नंबर आला की नाही परीक्षेत ?' तो तिला खोचून विचारे. अनेकदा तो तिला म्हणे, 'तुला एवढी साधी गोष्ट समजत नाही ?' कधी कधी तो आव्हान दिल्याच्या थाटात म्हणायचा. 'हा प्रॉब्लेम सोडवायला तुला किती वेळ लागतो आणि मला किती वेळ लागतो, बघूया !'

आपण इतक्या बुद्धिमान आहोत, हा आपल्याला एक प्रकारचा शापच आहे असं विनुताला वाटू लागलं. आपला समाजसुद्धा कसा विचित्र आहे ? आपल्या पतीच्या यशात व कीर्तीत स्त्री नेहमीच आनंद मानत असते. पण पुरुष मात्र आपल्या पत्नीच्या यशात आनंद मानू का शकत नाही ? आपली पत्नी बुद्धिमान आहे ही गोष्ट सहन करून तिचं त्याबद्दल कौतुक करणारे पुरुष विरळाच.

याउलट रत्ना ही आमची मैत्रीण, सर्व अर्थांनी, सर्व बाबतींत अतिसामान्य होती. ती इतकी सर्वसामान्य होती, की ती पुढे कोणाच्या स्मरणातसुद्धा राहिली नसेल. सर्व मध्यमवर्गीय घरातल्या मुलींप्रमाणेच ती पदवीधर झाली आणि मग लग्न करून संसारात रममाण होऊन गेली. तिचा पती रघू हा साधा कारकून होता. जरा भित्रा, गरीब स्वभावाचा होता.

एक वर्ष अचानक रत्ना आमच्या स्नेहसंमेलनाला आली. तिला पाहून आम्ही सर्व जणी आश्चर्यानं थक्क झालो. ती किती आमूलाग्र बदलून गेली होती. आता ती एक यशस्वी महिला उद्योजक होती व तिला कित्येक पुरस्कार प्राप्त झाले होते. ती आता अगदी आधुनिक झाली होती. तिच्यातील ते परिवर्तन इतकं आश्चर्यकारक होतं, की आम्ही काही क्षण तिच्याकडे टक लावून बघतच राहिलो. विमलेनं रत्नाला तिची सगळी हकीकत विचारली.

'शून्यातून सगळा संसार उभा करण्याची गोष्ट आहे माझी,' रत्ना म्हणाली. 'माझ्या लग्नानंतर काही दिवसांतच एक गोष्ट माझ्या लक्षात येऊन चुकली ती म्हणजे माझ्या पतीच्या अंगात नेतृत्वगुण नसले तरी सहाय्यकाचं काम ते अतिशय उत्कृष्ट तऱ्हेने पार पाडू शकतात. ते उत्तम अनुयायी होऊ शकतात. आमच्या घरात माझी सासूच बॉस होती.'

मनोवैज्ञानिकांचंसुद्धा असंच मत आहे की जर एखाद्या मुलाच्या आईवडिलांचं वागणं हुकूमशाही असेल तर ते मूल एक तर अत्यंत बंडखोर तरी होतं किंवा अत्यंत भित्रं, बुजरं. रत्नाच्या पतीच्याही बाबतीत हा दुसरा प्रकार घडला असावा.

रत्नानं आपली कहाणी सांगितली. 'आपले निर्णय आपण स्वत:च घ्यायला हवेत, ही जाणीव मला लवकरच झाली. तसं केलं नसतं तर मी माझ्या सासूची गुलाम होऊन राहिले असते. आपण काहीही करून आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र व्हायचं, असं ठरवलं. मी मूळची काही फार बुद्धिमान नाही, मला कोणतंही कलाकौशल्य अवगत नव्हतं, हे तुम्हीही जाणताच. माझी शैक्षणिक पात्रताही यथातथाच होती. या पार्श्वभूमीवर मला नोकरी मिळणंही कठीण होतं. मला एकच गोष्ट नीट जमणारी होती, ती म्हणजे कपडे शिवणं. त्यामुळे मी घरी शिवण शिवण्यास सुरुवात केली. सुरुवातीला मी शिवण्यासाठी कापड वापरलं व नंतर लेदर. लवकरच हा व्यवसाय करण्याचं तंत्र मला नीट जमलं व माझ्या गिऱ्हाईकांची पसंती लक्षात ठेवून मी माझा व्यवसाय खूप वाढवला.'

'तू मसाल्याच्या पदार्थांकडे कधी वळलीस ?' मी विचारलं.

'एकदा तयार कपड्यांच्या व्यवसायात यश मिळाल्यावर मी घरगुती उत्पादनांकडे वळले. म्हणतात ना - यशापाठोपाठ यश येतं. मी गिऱ्हाईकाला नेहमीच देव मानत आले. काम करायचं ते गिऱ्हाईकाच्या समाधानासाठी, आपल्या नव्हे - असं माझं तत्त्व आहे. जीवन हा मोठा शिक्षक आहे. मी आयुष्यात सर्व काही अनुभवांतूनच शिकले. माझ्या हातून घडणाऱ्या प्रत्येक चुकीतून मी शिकत गेले. त्या चुका पुन्हा हातून घडणार नाहीत, अशी खबरदारी मी घेत गेले.'



रत्नाचं असामान्य धैर्य आणि त्यामुळे तिचा झालेला उत्कर्ष, यांमुळे आम्हांला आश्चर्यही वाटलं व आनंदही झाला.

विनुता आयुष्यात खूप यशस्वी होईल आणि रत्ना अत्यंत सामान्य आयुष्य जगेल, अशी आमची कल्पना होती. पण प्रत्यक्षात जे घडलं, ते याच्याबरोबर उलट, वयाच्या विसाव्या वर्षी आम्ही आदर्शवादी होतो आणि आता चाळिशीला वास्तवतावादी.

 OOO

१७

# स्वातंत्र्यदिनाची सुट्टी

पंधरा ऑगस्ट हा कॅलेंडरमध्ये लाल अक्षरांत लिहिलेला दिवस. १९४७ साली याच दिवशी पारतंत्र्यातून आपली सुटका झाली, असंख्य वीरांनी आपल्या प्राणांच्या आहुती दिल्यानंतर परकीय सत्तेपासून भारताला स्वातंत्र्य मिळालं. या स्वातंत्र्यलढ्यात अनेक लहान मुलं, स्त्रिया आणि वृद्धसुद्धा आपल्या जिवाची पर्वा न करता सहभागी झाले होते. पण आज त्यांच्यापैकी अनेकांची आठवण आपल्या स्मरणातून गेलेली आहे. त्यांचे पुतळे बांधण्यात आलेले नाहीत की त्यांच्या शौर्याचे पोवाडे कुणी रचलेले नाहीत. त्यांच्या यशोगाथा कुणी लिहिलेल्या नाहीत. ते अनामिक योद्धे आहेत. आपल्याला स्वतंत्र भारतात राहता यावं म्हणून त्यांनी प्राणांचं बलिदान केलं.

या दिवसाचं महत्त्व लक्षात घेऊन आपल्या सरकारनं १५ ऑगस्ट या स्वातंत्र्यदिनी राष्ट्रीय सुट्टी जाहीर केली आहे. आपण आपल्या हुतात्म्यांचं स्मरण करावं आणि स्वातंत्र्य साजरं करावं, हा त्यामागचा हेतू आहे. या दिवशी शाळांमधे, ऑफिसांमध्ये आपल्या स्वातंत्र्यलढ्यासंबंधी भाषणं, चर्चासत्रं आयोजित करण्यात येतात. ध्वजा रोहणाचा कार्यक्रम असतो. देशभक्तिपर गीते गाण्यात येतात. लहान मुलांना तर हा दिवस साजरा करायला फार आवडतो.

अशाच एका स्वातंत्र्यदिनी मी एक आठवड्याच्या दौऱ्यावर होते. या खेपेला मी कर्नाटकच्या ग्रामीण भागात भेटीला गेले होते. त्या वर्षी १५ ऑगस्टचा दिवस शुक्रवारी आला होता. आपण मुद्दाम काही शाळांमध्ये जाऊन त्यांच्या समारंभांत सहभागी व्हावं, असं मी ठरवलं.

मी शहरात उतरले होते. त्यामुळे जवळच सात किलोमीटरवर असलेल्या एका खेड्यातील शाळेत जाण्यासाठी मी बसस्टँडवर आले.

स्टँडवर खेड्यातील एका शाळेचे मुख्याध्यापक भेटले. मी त्यांच्या शाळेला-



सुद्धा भेट द्यायची ठरवली होती. मला पाहून त्यांना फार आनंद झाला. काही माणसांच्या चेहऱ्यावर त्यांच्या मनातील भाव लगेच प्रतिबिंबित होतात. तसेच ते होते. अशी माणसं क्वचितच भेटतात. याउलट काही लोकांच्या चेहऱ्यावरून त्यांच्या मनात काय चाललंय याचा थांगपत्ता लागत नाही. जणू काही त्यांच्या मेंदू आणि हृदय यांचा एकमेकांशी काही संबंधच नसतो. त्यांच्या मनातले विचार आपल्याला मुळीच जाणून घेता येत नाहीत. मोठ्या शहरांमध्ये अशी माणसं भेटतात. याउलट लहान गावांमध्ये माणसं मनमोकळी असतात.

मुख्याध्यापक जरा घाईत दिसले. 'मॅडम, तुम्ही बंगलोरला निघाला आहात का ?' त्यांनी विचारलं. मग असं विचारण्याचं त्यांनी स्पष्टीकरण दिलं, 'तुम्ही जर शनिवारी काम करत नसाल तर मग तुम्हाला ही सलग तीन दिवसाची मोठी सुटी मिळाली. मला वाटलं, म्हणूनच तुम्ही बंगलोरला निघाला आहात की काय !'

'नाही. मी बंगलोरला जात नाहीये,' मी म्हणाले. 'या भागात एक आठवडाभर काम आहे मला. परत जायचं आणि यायचं म्हणजे उगीच वेळेचा अपव्यय.'

माझे शब्द ऐकून त्यांच्या चेहऱ्यावर निराशा पसरली. ती का, ते जाणून घेण्याची मला उत्सुकता वाटली.

ते म्हणाले, 'अरे, अरे ! मी बंगलोरला निघालोय. मला वाटलं, आपण बरोबर जाऊ.'

अचानक मला आठवण झाली. आज १५ ऑगस्ट.

'पण काय हो, आज १५ ऑगस्टचं तुमच्या शाळेत ध्वजवंदन असेल ना ? ध्वजारोहण, देशभक्तिपर गाण्यांचा कार्यक्रम वगैरे तुमच्या शाळेत असतं ना ?'

त्यांच्या चेहऱ्यावर उत्साहाचा अभावच होता. 'नाही हो. दर वर्षी हे सगळं करायचं म्हणजे उगीच वेळ वाया घालवणं. माझ्या गेल्या २० वर्षांच्या बदलीच्या नोकरीत या सगळ्या राष्ट्रीय सुट्यांमुळे मी अगदी कंटाळून गेलो आहे. आम्हांला नियमानुसार शाळा बंदही ठेवता येत नाही. शिक्षणखात्याच्या हुकमाप्रमाणे आम्हांला हे सगळे कार्यक्रम त्या दिवशी राबवावेच लागतात. त्याऐवजी त्यांनी दिवाळी नाही तर. ख्रिसमससारखी पूर्ण सुटी देऊन टाकली तर बरं, असं मला वाटतं.

ते खूश नव्हते, ते माझ्या लक्षात आलं. मग मी त्यांना विचारलं, 'तुम्ही बंगलोरला कशासाठी चालला आहात ?'

'मला जिल्ह्याच्या ठिकाणी बदली होण्यासाठी प्रयत्न करायचाय. त्यासाठी कोणाला जाऊन भेटायचं, ते कोणाच्या हातात आहे, वगैरे माहिती काढायला

बंगलोरला निघालोय. माझ्या मुलीला कॉम्प्युटर सायन्स शिकायचंय. कॉम्प्युटर सायन्स शिकून चांगली नोकरी मिळते ना... तुम्हाला काय वाटतं ? कशी आहे ही कल्पना ? शिवाय मुलगी जर कॉम्प्युटर विषयात पदवीधर असली तर तिला नवरा मिळणंही सोपं जातं.''

ते वडील जास्त आणि मुख्याध्यापक कमी होते. त्यांच्या बोलण्याकडे माझं फारसं लक्ष नव्हतं कारण माझ्या मनात अजूनही स्वातंत्र्यदिनाचाच विचार चालला होत. 'मग आज तुमच्या शाळेतील कार्यक्रमाचं सूत्रसंचालन कोण करणार ?' मी विचारलं.

त्यांनी माझ्याकडे कीव येऊन पाहिलं, 'एवढं काय त्यात ? माझ्या उपमुख्याध्यापकांना मी सांगितलंय. या दिवशी करायचं भाषण तर वीस वर्षांपूर्वीच तयार केलंय मी. काहीही बदल झालेला नाहीये. त्यामुळे त्यांनीसुद्धा तेच भाषण वाचलं, तरी चालेलं. मी तर शाळेत गेलोसुद्धा नाही. मुलांना तरी या भाषणात किंवा स्वातंत्र्यदिन साजरा करण्यात कुठे रस असतो ? आमच्या गावच्या तंबूत नवा सिनेमा लागलाय. मुलांना तिकडे जायचंय. या स्वातंत्र्यदिनाचं कोणालाही कौतुक नाहीये.'

मी विचारात बुडून गेले. त्यानंतर बस आली. गडबड उडाली. जागा मिळवण्यासाठी मुख्याध्यापक आत घुसले. बसल्यावर त्यांनी मला हात केला. बस धुरळा उडवत निघून गेली.

पुढच्या आठवड्यात मी बंगलोरला परतले.

एका मैत्रिणीकडे रात्रीच्या जेवणाचं बोलावणं होतं, तिथे मी गेले. तीपण माझ्यासारखी शिक्षिकाच आहे. आमच्यात बऱ्याच बाबतींत साम्य आहे. पण एकाच शहरात राहूनसुद्धा आमची वरचेवर भेट होत नाही. आम्ही दोघी आपापल्या कामांत आकंठ बुडून गेलेलो असतो. यातून आम्ही एक उपाय काढलाय, तो म्हणजे अधून-मधून मुद्दाम जेवणाच्या निमित्ताने भेटायचं.'

मी तिला विचारलं, 'तुम्ही शाळेत स्वातंत्र्यदिन कसा साजरा केला ?'

तिच्या चेहऱ्यावर दु:ख पसरलं. 'फार भयंकर रीतीने. आम्ही सर्व शिक्षक सकाळी लवकर शाळेत गेलो. आम्ही एका वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्याला ध्वजवंदनासाठी प्रमुख पाहुणे म्हणून बोलावलं होतं. बिचारा. त्यानं इतकं मोठं भाषण तयार केलं होतं आणि तो वेळेवर हजरही होता. पण...' ती थांबली.

गेल्या आठवड्यात मी त्या शाळेच्या मुख्याध्यापकांना स्टँडवर भेटले होते. ती आठवण मनात अजून ताजी होती.



'तुमच्या शाळेच्या मुख्याध्यापिका आल्या होत्या की नाही ? का काही प्रॉब्लेम झाला ?'

'आल्या होत्या ना. आमच्या मुख्याध्यापिका फार चांगल्या आहेत. त्या दिवशी त्यांच्या अंगात ताप होता, तरी त्या वेळेवर हजर होत्या.' ती म्हणाली.

'पण आमचे विद्यार्थीच आले नाहीत. खरं तर आमच्या शाळेत एक हजारांच्या वर विद्यार्थी आहेत. पण त्या दिवशी जेमतेम पन्नास उगवले होते.'

'का ?'

'पंधरा ऑगस्ट शुक्रवारी आल्याने लागोपाठ तीन दिवसांनी सुटी मिळाली. आईवडिलांनी मुलांना गावाला नेलं. जी मुलं कुठे गावाला गेली नाहीत ती सिनेमाला गेली. त्या दिवशी दिवसभर व्हीडिओ लायब्ऱ्यांमध्येसुद्धा केवढी गर्दी होती. आमच्या प्रमुख पाहुण्यांच्या समोर केवढी शोभा झाली.'

'पण त्या दिवशी हजर राहिलंच पाहिजे, अशी सक्ती नव्हती ?'

'होती ना. त्या दिवशी मुलांनी शाळेत हजर राहिलंच पाहिजे अशी नोटीस वर्गांमधून फिरवली होती. पण काय उपयोग ? मुलं काय, दुसऱ्या दिवशी खोटा वैद्यकीय दाखला घेऊन येतात. कधी कधी तर असं वाटतं, १५ ऑगस्ट आणि २६ जानेवारीची सुट्टी द्यायलाच नको. त्याऐवजी व्यवस्थित नेहमीसारखी शाळा ठेवावी व शेवटच्या दोन तासांत कार्यक्रम ठेवावे. आजकाल ती सुटी मजा करण्यासाठीच धरली जाते. आपल्या देशभक्तांची आठवण कोणालाच काढायची नसते. तुला काय वाटतं ?'

मी काहीच बोलले नाही. काय बोलणार ? तिच्या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर नव्हतं.

वाचक हो, या प्रश्नाचं तुमच्याकडे तरी काही उत्तर आहे का ? केवळ मलाच नाही तर माझ्यासारख्या अनेक शिक्षकांना ते ऐकायला आवडेल.

ooo

## १८

# कोणे एके काळी, जेव्हा जगणं साधं होतं...

उत्तर कर्नाटकातील एका खेड्यात माझा जन्म झाला. तिथेच मी लहानाची मोठी झाले. त्या वेळी सारं काही सरळ, सोपं असे. आपल्याला एखाद्या माणसाचं एखादं वागणं आवडलं नाही तर तसं सरळ त्याला तोंडावर सांगून मोकळं व्हायचं. जर कुणी आपल्याला मदत केली, तर काहीही आडपडदा न बाळगता त्याचं तोंड भरून कौतुक करायचं. कुणी काही चुकीचं वागलं, तर न्याय मागायचा. भावना लपवायच्या नाहीत. कदाचित ते वागणं फारसं सुसंस्कृत किंवा आदबशीर नसेलही. पण त्या काळचा समाजच सरळ साधा होता. आयुष्यही सरळ-सोट होतं.

आजकाल खेड्यातला समाज कसा असतो याची काही मला कल्पना नाही. पण आमच्या काळी गावातील सामाजिक वातावरण कसं सरळ, साधं असे. एक दिवस आमची गाय हरवली होती. मला तो दिवस अजूनही स्पष्टपणे आठवतो. आमची गाय गोपाळच्या गोठ्यात बांधून ठेवलेली असल्याची बातमी आमच्या कानावर आली. लगेच गावातील वडील माणसांनी त्याला पंचायतीत बोलावून घेतलं. गोपाळच्या मालकीचा एक जमिनीचा तुकडा होता व तो त्याच्यात भाज्या उगवायचा. त्या गावच्या बाजारात विकून जो काही पैसा हाती यायचा, तेवढंच काय ते त्याचं उत्पन्न. आमची गाय आमच्याकडून सुटून पळून गेली ती गोपाळच्या शेतात घुसली व तिनं तिथे धुडगूस घातला. सगळ्या ताज्या भाज्या खाऊन टाकल्या. स्वाभाविकच गोपाळ संतापला आणि त्यानं तिला गोठ्यात बांधून ठेवली. ते ऐकून आम्हाला वाईट वाटलं. आम्ही त्याची नुकसान भरपाई देऊ केली. त्यानं ते लगेच मान्य केलं व त्या गाईला सोडलं.

कुठे कायद्याची पुस्तकं कोणी उघडली नाहीत की कोणी वकिलाला बोलावणं धाडलं नाही. पंचायतीनं निर्णय दिला, नुकसान भरपाईची रक्कम ठरवली व समस्या सुखासमाधानानं सोडवून टाकली. दोन्ही पक्षांमध्ये कुठेही शत्रुत्वाची भावना



निर्माण झाली नाही.

मला आणखी एक घटना आठवते. आमच्या शेजाऱ्यांकडे एका मुलीचं आपल्या सासूशी पटत नव्हतं. सर्वच जातीजमातींत सासूनं सुनेचा छळ करणं ही फार पुरातन समस्या आहे. मग त्यांची भाषा कोणतीही असो, संस्कृती कोणतीही असो. एक जुनी चिनी म्हण आहे. 'मांजर आणि उंदराची कधी मैत्री होऊ शकते का ?' काही अपवाद असतीलही, पण ते केवळ नियम सिद्ध करण्यापुरते.

आमच्या शेजारच्या घरची तरुण सून गावच्या पाणवठ्यावर पाणी भरायला यायची. ती जेमतेम २० वर्षांची असेल. नाजूक आणि हळवी होती. पाणवठ्यावर ती एकटीच असायची. पायऱ्यांवर बसून मुळूमुळू रडायची. घरी तिला फारच जाच होत असे.

माझ्या आजीनं असंच एकदा त्या मुलीला रडत बसलेलं पाहिलं. ती लगेच आमच्या शेजाऱ्यांकडे गेली आणि तिनं हाका मारून त्या मुलीच्या सासूला बाहेर बोलावलं. आणि तिला म्हणाली, 'तुझ्या सुनेला जाच नको करू. तुझी मुलगी पण कुणाच्या तरी घरची सून आहे, ही गोष्ट ध्यानात ठेव. तूही या घरची सून होतीस, तेव्हापासून मी तुला पाहात आहे. वरती पण एक कोर्ट आहे आणि तू इथं जे वागशील त्याचं उत्तर तुला तिकडे द्यावं लागेल.'

दुसऱ्या लोकांच्या घरच्या भानगडीत आपण पडू नये, असं माझ्या आजीला कधीच वाटायचं नाही. एखाद्या कुणाची वैयक्तिक बाब असूच शकत नव्हती. कालांतरानं आमच्या शेजारणीनं आपलं वागणं सुधारलं. सर्वांत महत्त्वाचं म्हणजे तिनं माझ्या आजीवर राग धरला नाही. त्या काळचे लोक आपल्या वडीलधाऱ्यांचं बोलणं मुकाट्यानं ऐकून घेत असत. वागण्यातील ही त्या वेळची मूल्यं होती. व्यवहारज्ञानाला महत्त्व होतं. सरळ साध्या व्यवहारज्ञानापुढे नियम आणि कायद्यांना फारशी किंमत नव्हती.

काही दिवसांपूर्वी माझ्या वडिलांचं निधन झालं. स्वयंपाकाचा गॅस त्यांच्या नावावर होता. त्यांच्या निधनानंतरही तसाच तो गॅस त्यांच्या नावावर ठेवणं हा कायद्यानं गुन्हा आहे, असं मला वाटलं. मग मी त्यांचं डेथ सर्टिफिकेट जोडून एक अर्ज लिहिला व तो गॅस माझ्या नावावर करावा अशी त्यात विनंती केली. एक दिवस मला गॅस एजन्सीकडून बोलावणं आलं.

'तुमचा अर्ज अपूर्ण आहे,' तेथील मॅनेजर म्हणाला, 'तुमच्या वडिलांनी त्यांच्या मृत्युपत्रांत गॅस तुमच्या नावे ठेवला आहे, हे जरी खरं असलं तरी तुमच्या भावाबहिणींची याला काही हरकत नाही व त्यांना हा गॅस नको आहे, असं सिद्ध

करणारी कोणतीही कागदपत्रं यात नाहीत. त्यामुळे त्यांची हरकत नसल्याची कागदपत्रं तुम्ही दिल्याशिवाय हा गॅस तुमच्या नावे करणं बेकायदेशीर आहे.'

माझा भाऊ व बहीण हे दोघेही कायमचे अमेरिकेत राहात असून त्यांनी तेथील नागरिकत्व पत्करलं आहे, त्यामुळे त्यांना या गॅसमध्ये काहीही रस नाही, असं मी त्या अधिकाऱ्याला समजावण्याचा प्रयत्न केला. पण तो खऱ्या अर्थानं ऑफिसर होता. नियम म्हणजे नियम. व्यवहारज्ञानाचा तिथे संबंध नव्हता.

'मग तुम्ही असं करा, अमेरिकेहून त्या दोघांकडून त्या अर्थाचं नोटरीचं सर्टिफिकेट मागवून घ्या,' तो म्हणाला.

ते ऐकून मला धक्काच बसला. ही अशी काही भानगड उपस्थित होईल, असं मला वाटलं नव्हतं. माझ्या वडिलांनी तसं मृत्युपत्रात लिहून ठेवल्यामुळे ही गोष्ट सरळपणे होईल अशी माझी अपेक्षा होती.

मी तसं म्हणताच तो अधिकारी अधिकच अडेलतट्टूप्रमाणे वागू लागला. 'मॅडम, कायद्याहून मोठं कुणीच नसतं. ते अमेरिकेचे नागरिक असले म्हणून काय झालं ? त्यांना नियमाचं पालन तर करावंच लागेल. उगाच नंतर या गोष्टीसाठी काही लफडं व्हायला नको.'

'या इतक्या क्षुल्लक गोष्टीकरता अमेरिकेत नोटरीचं प्रमाणपत्र मिळवणं किती कठीण आहे. या असल्या कामासाठी अर्धा दिवस रजा घ्यावी लागेल.'

पण तो मॅनेजर माझं काही ऐकून घ्यायलाच मुळी तयार नव्हता. मी निराश होऊन त्या गॅस एजन्सीच्या ऑफिसातून परतले. एक महिन्यानंतर मी गॅसचा सिलिंडर नोंदवण्यासाठी परत तिथं गेले. पण त्या मॅनेजरनं परत नियमावर बोट ठेवलं. 'तुमचे वडील हयात नाहीत. तुम्हाला त्यांच्या नावावर सिलिंडर घेता येणार नाही.'

मी जर माझ्या वडिलांच्या मृत्यूविषयी त्याला काही कळवलंच नसतं, तर सगळं सोपं झालं असतं, असा विचार माझ्या मनात चमकून गेला. एखादी गोष्ट कायदेशीरपणे आपण करायला जावं तर असाच अनुभव येतो की येथील यंत्रणेमध्ये कायदेशीरपणे वागणं शक्यच नाही.

आमच्या घरासमोरचा रस्ता झाडणारी एक झाडूवाली गेली अनेक वर्षं माझ्या परिचयाची आहे. एक दिवस ती रडत असलेली मला दिसली. मला वाईट वाटलं. तिचा नवरा रोज दारू पिऊन तिला मारायचा, असं तिच्याशी बोलल्यावर समजलं. मला ते ऐकल्यावर राहवेना. मी तिच्या नवऱ्याला भेटले आणि समजावून सांगू लागले. कदाचित माझ्या आजीचा थोडा प्रभाव माझ्यावर असावा. आमच्या



शेजाऱ्या-पाजाऱ्यांनी सुद्धा तिला रडताना पाहिलं होतंच, पण तिच्या नवऱ्याशी बोलायला कोणी गेलं नव्हतं.

मी तिच्या नवऱ्याशी बोलायला गेल्यावर तो फणकारून म्हणाला, 'मॅडम, हा आमचा खाजगी मामला आहे. यात दखल घ्यायचं काही काम नाही तुम्हाला. हा नवरा-बायकोचा मामला आहे. मी जर माझ्या बायकोला त्रास देत असेन, तर ती वकिलाकडे जायला मोकळी आहे. तिला तुमची गरज नाही.'

यावर काय बोलावं ते मला कळेना. त्यानं कायद्याची भाषा काढली, तेव्हा कायद्याचा नक्की अर्थ काय, तेच मला कळेना. कायदे कशासाठी बनलेले असतात ? एका मजबूत समाजाची घडण व्हावी, सर्वसामान्य लोकांना संरक्षण मिळावं, म्हणून. पण या कायद्यांचं पालन करणंच कठीण होऊन बसतं, तेव्हा ते बनवण्यामागचा उद्देशच कोलमडून पडतो. अतिउत्साही अधिकारी कायद्यांचा जेव्हा अत्यंत संकुचित दृष्टीनं अर्थ लावतात, तेव्हाही त्यांचा उद्देश हरपतो.

याबद्दल जनसामान्यांनी काय करायचं ? दैनंदिन जीवनात आपल्याला किती तरी छोट्या छोट्या अडचणींना तोंड द्यावं लागतं. गॅसची कनेक्शन्स नाही तर दारुडे नवरे... या दैनंदिन समस्या कशा सोडवायच्या याविषयी एखादा विद्वान वकील काही सूचना करू शकेल का ?

ooo

## १९

# धूर्त राजकारणी आणि अनामिक देणगीदार

जे लोक सत्तेवर असतात त्यांना विविध प्रकारचे मानसन्मान, गौरव प्राप्त होत असतात. त्या गौरवास ते खरोखर पात्र आहेत का नाहीत ही गोष्ट अलाहिदा. सर्वात महत्त्वाची गाष्ट म्हणजे त्यांच्या हातात असलेली सत्ता. या लोकांचा गौरव जे कुणी करत असतात त्यांना अर्थातच त्या लोकांकडून त्या बदल्यात कोणत्यातरी गोष्टीची अपेक्षा ही असतेच. कधीकधी तर मला असं वाटतं, हे सत्कार समारंभ असूच नयेत. कारण सत्कारमूर्तीला घातलेल्या शालीच्या आत एखादा विनंती अर्ज, एखादी मागणी दडलेली असतेच.

आम्ही ज्या काही राज्यांत कार्य करतो त्यांपैकी एका राज्यातील सरकारी इस्पितळासाठी इन्फोसिस फौंडेशनने एक संपूर्ण जोडविभाग बांधून दिला. त्याचा उद्घाटन सोहळा हॉस्पिटलच्या आवारातच पार पडला. हे स्थळ कर्नाटकापासून बरंच दूर होतं. प्रमुख पाहुणे म्हणून त्या राज्याच्या आरोग्यमंत्र्यांना बोलावण्यात आलं होतं. हा कार्यक्रम सकाळच्या वेळी ठेवावा अशी मी संयोजकांना खास विनंती केली होती, म्हणजे कार्यक्रम जर वेळेत संपला तर मला लगेच कारनं त्याच दिवशी वेळेत परत जाता आलं असतं. रात्रीच्या वेळी एकटीनं कारनं जाणं मला बरं वाटत नाही.

पण संयोजक काही ते मान्य करेनात. प्रमुख पाहुण्यांच्या दृष्टीनं सकाळचा कार्यक्रम गैरसोयीचा होता. त्यामुळे उद्घाटनाची वेळ सायंकाळी सातची ठरली.

कार्यक्रम ठरलेल्या वेळेपेक्षा तासभर उशिरा सुरू झाला. व्यासपीठावर भरपूर खुर्च्या मांडलेल्या होत्या. मोगऱ्याच्या फुलांचे डझनभर हार, चंदनाचे आणि झेंडूचे हार, विविध प्रकारच्या शाली व विविध प्रकारच्या फळांनी भरलेल्या करंड्या वाटपासाठी व्यासपीठावर ठेवल्या होत्या. एका बॉक्समध्ये अत्यंत किंमती अशी सिल्कची साडीसुद्धा ठेवली होती. त्या सर्व गोष्टींसाठी भरपूर खर्च केलेला दिसत



होता. मी काही एक न बोलता सर्व काही बघत होते.

मी ज्या प्रकारच्या समाजकार्यात भाग घेते त्यामध्ये आम्ही ज्या लोकांना मदत करतो, त्यांच्याकडून आम्ही कोणत्याही प्रकारची अपेक्षा ठेवत नाही. त्यांनी आमच्या कामाबद्दल चार चांगले शब्द काढले तरी आम्हांला मनापासून समाधान मिळतं. या शब्दांनी आम्हांला पुढे अशाच प्रकारचं काम करण्याचा हुरूप येतो. त्याचा अर्थ असाही होतो की आम्ही दिलेल्या देणगीचं ती स्वीकारणाऱ्यांना खरोखरच मोल आहे. मी तिथे स्वत:शीच विचार करत बसले होते. खरंच... या लोकांना केवढी कृतज्ञता वाटते आहे, आपण यांना हॉस्पिटल बांधून दिलं त्याबद्दल सत्काराची केवढी तयारी केली आहे यांनी, आणि किती सुसंस्कृत आहेत ही माणसं.

मंद वाऱ्याची थंडगार झुळूक आली. लोकांची गर्दी वाढत चालली होती. एक तासानंतर मंत्री महोदय आले. लोकांनी त्यांच्या पाया पडण्यासाठी धाव घेतली. काही लोक हातात अर्ज घेऊन पळत आले. लवकरच तिथे एक छोटासा दरबारच भरला.

कार्यक्रम सुरू झाला. मला व्यासपीठावर कोपऱ्यातल्या एका खुर्चीत बसवण्यात आलं. त्यानंतर पुष्कळ भाषणं झाली. मंत्री महोदय कसे सक्षम आहेत, त्यांचं नेतृत्व कसं खंबीर आहे व आपल्या जनतेवर त्यांचं कसं प्रेम आहे वगैरे, वगैरे. त्यांच्या खंबीर नेतृत्वाखालीच आज या हॉस्पिटलचा कोणत्यातरी देणगीदाराच्या मदतीने विस्तार करण्यात आला आहे. त्यांपैकी एकाही भाषणात देणगीदाराचा किंवा त्या हॉस्पिटलचा साधा उल्लेखसुद्धा नव्हता. जे काही भाष्य चाललं होतं ते सगळं ते मंत्री व त्यांच्या सरकारविषयीच. गाव तसं छोटंच होतं व तेथील गरीब लोकांना मदत करणं एवढा एकमेव उद्देश आमच्या फौंडेशनपुढे होता. बाकी काहीही नाही. तो अगदीच मागास भाग होता.

त्यानंतर मंत्री इमारतीचं उद्घाटन करण्यासाठी उठले. आपली लोकशाही राज्यपद्धतीवर नितांत श्रद्धा असून आपल्याला जनतेविषयी अतोनात कळकळ आहे, असं त्यांनी आपल्या भाषणात सांगितलं. हॉस्पिटलचा अशा प्रकारे विस्तार करण्याची आपली मनापासून इच्छा होती कारण आपल्याला स्वत:पेक्षाही जनतेच्या स्वास्थ्याची जास्त काळजी आहे... मात्र अजूनही आपण समाधानी नाहीच आहोत कारण या हॉस्पिटलमधे अजूनही बऱ्याच सोयी करण्याची गरज आहे... वगैरे... वगैरे...

त्यानंतर ते माझ्याकडे वळून म्हणाले, 'मॅडम, आम्हांला पंखे, पलंग, कपाटे, गाद्या, उशा, पांघरुणे, पिण्याच्या पाण्याची सोय अशा अनेक सुविधांची या

संपूर्ण हॉस्पिटलसाठी गरज आहे. तुमचे लोक या सर्व सुविधा करून देऊ शकतील अशी माझी खात्री आहे. त्या सुविधांचा हे लोक उत्तम फायदा करून घेतील असं मी आपल्याला आश्वासन देतो.'

मी त्यावर काहीच बोलले नाही.

त्यानंतर कार्यक्रमाचा सर्वात महत्त्वाचा भाग झाला. तो म्हणजे ज्या लोकांनी या हॉस्पिटलच्या उभारणीत मदत केली त्या लोकांचा सत्कार. त्यानंतर राष्ट्रगीत होऊन कार्यक्रम संपला. मंत्रीमहोदय घाईने आपल्या गाडीत जाऊन बसले व त्यांच्यामागे लोक पळत सुटले. मी तिथे एकटीच उभी होते. मॅच संपल्यावर मैदानात एकट्यात उभ्या असणाऱ्या खांबासारखी.

आता संपूर्ण परिसर ओकाबोका झाला होता. व्यासपीठावर सर्वत्र कुस्करलेल्या फुलांचा खच पडला होता. मंडपाचा अंतर्भाग सोडून बाहेर सर्वत्र अंधार होता. एक चुरगळलेला हार आणि बॅग घेऊन मी एकटीच उभी होते.

माझ्या समोरच आमच्या फौंडेशनने बांधलेली नवी कोरी इमारत होती. त्याच्या आत दिव्यांचा लखलखाट होता. त्या इमारतीच्या उभारणीत अर्थातच माझे एकटीचे परिश्रम कारणीभूत नव्हते. वास्तुशिल्पकार होते, कारागीर होते, विश्वस्त होते, इतर अनेक लोक सहभागी होते. त्यांच्यापैकी कोणाच्याही नावाचा येथे उल्लेख झाला नव्हता. मी एक 'नकोशी' पाहुणी होते. केवळ उपचार म्हणून मला आज इथे निमंत्रण होतं.

संपूर्ण संध्याकाळ वाईट गेली. खूप वैफल्य आलं होतं. एका स्त्रीला याहून जरा चांगली वागणूक देता आला नाही का यांना ? ही स्त्री इतक्या दुरून आली आहे, एका धर्मादाय संस्थेची प्रतिनिधी म्हणून आली आहे याचीही पर्वा असू नये यांना ? या लोकांकडे पाहा, मी स्वत:शीच पुटपुटले. हॉस्पिटलच्या नव्या इमारतीच्या उभारणीसाठी या मंत्रीमहोदयांनी स्वत:चा वेळ, पैसा किंवा साधनसामुग्री यांपैकी कशाचाही हातभार लावलेला नव्हता. हॉस्पिटलच्या विस्ताराचं काम चालू आहे, याची त्यांना साधी माहितीसुद्धा नव्हती. पण आपला सत्कार होऊन आपले एखाद्या हीरोसारखं कौतुक व्हावं याची त्यांनी पुरेपूर काळजी घेतली. त्यांच्या गळ्यात हारतुरे. याला राजकारण म्हणायचं की नैतिक पातळीवरील भ्रष्टाचार ?

मग मी स्वत:च्या मनाला बजावलं - आमच्या संस्थेचं अंतिम उद्दिष्ट हे काही मंत्र्याला खूश करणं हे नव्हतं, किंवा राजकारणी, धनाढ्य किंवा सत्ताधाऱ्यांना खूश करणं हे नव्हतं. आमचे सर्व प्रयत्न गोरगरिबांना मदत करण्याच्या दृष्टीनं चालले होते. शेवटी मंत्रीमहोदयांचा संबंध नव्हता, महत्त्व होतं ते गरीब लोकांना.



मग माझं वैफल्य जास्त काळ टिकलं नाही.

फाटक्यातुटक्या कपड्यातील एक वृद्ध स्त्री माझ्यापाशी आली आणि म्हणाली, 'अम्मा, कुणीतरी मला सांगितलं की तुमच्या कंपनीनं ही इमारत बांधली. आम्ही त्याबद्दल तुमचे खूप आभारी आहोत. मुख्य हॉस्पिटलात जागा नाहीये, त्यामुळे आमच्यासारख्या बऱ्याच लोकांना इथे दाखलच करून घेत नाहीत. पण तुम्ही इथे एक सार्वजनिक वॉर्ड बांधून दिलाय, व स्पेशल रूम नाही बांधल्यात ते बरं झालं. स्पेशल रूममध्ये नेहमी ओळखीच्याच लोकांना प्रवेश मिळतो. आमच्यासारख्या लोकांच्या दृष्टीने सार्वजनिक वॉर्डच चांगला.'

त्यानंतर ती माझ्या आणखी जवळ येऊन म्हणाली. 'माझ्याकडे तुम्हाला द्यायला काही नाही. मी फुलांचे गजरे विकते. तुम्हाला शाल किंवा साडी घ्यायची माझी काही ऐपत नाही. पण मी तुम्हाला प्रेमानं हा मोगऱ्याचा गजरा दिला तर तुम्हाला चालेल ? तुमच्यासारखी माणसं या देशात परत परत जन्माला यावी, हीच माझी ईश्वरचरणी प्रार्थना.'

तिनं मला दिलेला मोगऱ्याचा गजरा त्या शालीपेक्षा आणि फळांच्या करंड्यांपेक्षा कितीतरी मौलवान्य वाटला.

ooo

२०

# धरणीमातेची दीन बालके

कुष्ठरोग - नुसतं हे नाव काढलं की बरेच लोक घाबरतात. आंतरराष्ट्रीय पातळीवर कुष्ठरोगी व्यक्तीस 'लेपर' म्हणून कधीही संबोधू नये, अशी प्रथा आहे. कारण 'लेपर' या शब्दाच्या मागे जो एक अभिप्रेत भाव आहे, तो फार वाईट आहे. कुष्ठरोगाची शिकार झालेल्या व्यक्तीचा विचार आला, की लगेच आपल्याला हातापायांची बोटे झडलेला भिकारीच आठवतो. कुष्ठरोगाने पीडित असलेल्या व्यक्तींना समाजसुद्धा वाळीत टाकतो.

पण इथे एक गोष्ट आपण सर्वांनी लक्षात घेतली पाहिजे, की वेळच्या वेळी, योग्य उपचार घेतले, तर कुष्ठरोग पूर्णपणे बरा होऊ शकतो, तोही काहीही शारीरिक व्यंग मागे न सोडता ! अर्थात हे उपचार दीर्घ काळ चालतात. रुग्णाला खूप संयम बाळगावा लागतो, धीरानं घ्यावं लागतं. कुटुंबीयांच्या आधाराची गरज असते. या भयावह रोगाविषयी कितीतरी गैरसमज आढळून येतात - तो संसर्गजन्य आहे, आनुवंशिक आहे इत्यादी. पण हे गैरसमजच आहेत. कुष्ठरोगाचे सर्वच प्रकार काही संसर्गजन्य नसतात.

या रोगाविषयीच्या अज्ञानामुळे त्याची लक्षणे लोकांच्या लवकर लक्षात येत नाहीत. खरं तर ही लक्षणे लवकर कशी ओळखावी याविषयी प्रसारमाध्यमे अनेकदा जनजागरणाचं काम करत असतात, पण तरीही हे घडत नाही. अनेकदा लोक फिकीरच करत नाहीत. आपण नेहमी असाच विचार करत असतो की हा प्रश्न इतरांचा आहे, आपला नव्हे. आपण एक गोष्ट विसरतो की या रोगाच्या जगात गरीब-श्रीमंत, स्त्री-पुरुष असा भेदभाव नाही आणि कुष्ठरोग तर मानवजातीच्या अगदी प्रारंभीच्या काळापासून या पृथ्वीतलावर अस्तित्वात आहे. अगदी येशू ख्रिस्ताच्या काळापासून.

आमच्या संस्थेचे जे अनेक उपक्रम आहेत, त्यांतील एक उपक्रम कुष्ठरोग्यांना



मदत करणे हाही आहे. या क्षेत्रात वेगवेगळे सिद्धांत मांडले गेले आहेत. काही लोकांच्या मते कुष्ठपीडित रुग्णांनी आपल्या कुटुंबातच राहायला हवे, तर काही लोक म्हणतात की त्यांनी वेगळ्या वस्तीत जाऊन राहिले पाहिजे.

मी एकदा एका ओसाड प्रदेशात कामासाठी गेले होते. तिथे कुष्ठरोग्यांची वेगळी वसाहत होती. उन्हाळ्याचा ताप असह्य होत होता. त्या वसाहतीमधील दृश्य अत्यंत निराशाजनक होते. वसाहतीत राहणाऱ्या लोकांना त्या रोगाची घृणा वाटत होती. त्यांना यातनासुद्धा सहन होत नव्हत्या.

आम्ही तिथे त्यांना दया दाखवण्यासाठी किंवा आर्थिक मदत करण्यासाठी गेलो नव्हतो. त्या लोकांना आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी करावं, हाच आमचा हेतू होता. ते अगदी लहानसहान काम जरी करू शकले व पोटापाण्यापुरतं मिळवू शकले, तरी त्यासाठी लागेल ती आर्थिक मदत करायला आम्ही तयार होतो. त्यांचा आत्मविश्वास परत यावा म्हणून आम्ही असं करायचं ठरवलं होतं. कारण माणसाला जेव्हा स्वत:विषयी आत्मविश्वास वाटतो तेव्हाच तो उजळ माथ्याने समाजापुढे तोंड वर काढू शकतो.

त्या वसाहतीतील सर्वच लोक गरीब व असहाय होते. त्यांना मानसिक आणि वस्तुरूपाने, अशी दोन्ही प्रकारची मदत हवी होती. "काळजी करू नका. आम्ही आहोत ना !" असे छोटेसे शब्दसुद्धा त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचे होते. समाजाकडून स्वीकार आणि काही मर्यादित स्वरूपात का होईना पण आर्थिक स्वातंत्र्य या दोन गोष्टींनी या लोकांचे आयुष्य बदलून गेले असते.

वसाहतीत बऱ्याच झोपड्या होत्या. प्रत्येक झोपडीत एक एक कुटुंब राहात होते. प्रत्येक कुटुंबातील निदान एक तरी व्यक्ती या रोगाने पीडित होती. हवा फार त्रासदायक होती, पण मला माझं कर्तव्य पार पाडणं भागच होतं. या झोपडीतून त्या झोपडीत भेटीसाठी जाणं गरजेचं होतं. झोपडीतील स्त्रिया त्यांच्या अडचणी मला सांगत होत्या. सर्वात दु:खाची गोष्ट अशी की त्यांना झालेल्या या दुखण्यामुळे साधी धुणंभांड्यांची कामंही त्यांना कोणी देत नव्हते. त्यांच्यातील काहींनी नशिबापुढे हार मानली होती. सकाळची वेळ असूनही तरुण मुले झोपून होती. लहान मुले मातीत खेळत होती.

वृद्धांची अवस्था तर अत्यंत दारुण होती. मुळात कुष्ठरोगासारखा दुर्धर रोग, त्यात वृद्धापकाळामुळे कमजोर झालेले शरीर, शिवाय या रोगामुळे समाजाकडून मिळणारी हेटाळणीची वागणूक— कधीकधी अशा परिस्थितीने गांजलेली व्यक्ती आत्महत्येलासुद्धा प्रवृत्त होऊ शकते.

तिथे एक लहानशी, गवताने शाकारलेली झोपडी होती. चिकणमातीच्या भिंती व बांबूचे दार होते. एक स्त्री तिथे राहात होती. ती त्या वसाहतीतील सर्वात वयोवृद्ध स्त्री होती. तिचं नाव वीरम्मा. मी तिला हाका मारून बाहेर बोलावले. पण ती आली नाही. तिला कदाचित जरा कमी ऐकू येत असेल, त्यामुळे आपणच आत जाऊन तिच्याशी बोलावं असं मला वाटलं. मी त्या दारावर अगदी हलकेच टकटक केली, न जाणो, दारच मोडायचं. तरीही तिनं ओ दिली नाही, की बाहेर आली नाही. मग मीच दार ढकलून आत गेले.

झोपडीत काहीही सामानसुमान नव्हतं. छताला थोडे झरोके होते. त्यातून थोडी हवा व उजेड आत येत होता. दोन-तीन गाडगी-मडकी व एक मातीची थाळी होती. तीन दगडांची चूल मांडलेली होती. एक फाटकी चटई जमिनीवर अंथरलेली होती. जवळच दोनतीन कांदे पडले होते व पाण्याने भरलेला माठ होता.

मला झोपडीत वीरम्मा चटकन दिसेना, पण तिच्या श्वासोच्छ्वासाची चाहूल तर लागली. बाहेरच्या लख्ख प्रकाशातून एकदम आत शिरले होते, त्यामुळे डोळे दिपले होते. काळोखाची डोळ्यांना सवय होण्यास वेळ लागला.

मी परत एकदा हलकेच हाक मारली, "वीरम्मा, मला तुमच्याशी बोलायचंय. कुठे आहात तुम्ही ?"

ती म्हणाली, "अम्मा, मी इथे आहे. पण माझ्याजवळ नका येऊ."

आता मला अंधारात, खोलीच्या कोपऱ्यात बसलेली ती कृश स्त्री दिसली. शरीर सुरकुतलेलं, अंगावर मांसाचा कण नाही. नुसतं कातडं आणि हाडांचा सापळा. ती हाताची घडी करून कोपऱ्यात बसली होती. पाय पण पोटाशी ओढून अंगाचं मुटकुळं करून बसली होती.

"अम्मा" ती पुटपुटली "तुम्ही बाहेरून खूप हाका मारत होता, ना ? पण मी तुमच्याशी बोलायला बाहेर कशी येणार ? मी एक स्त्री आहे. म्हातारी असले म्हणून काय झालं, अंगात कपडा नसताना इतक्या लोकांसमोर कशी येणार मी ?"

तेव्हा मला कुठे जाणवलं, की तिच्या अंगावर जवळपास वस्त्रच नव्हतं.

मी माझ्या कार्याच्या निमित्ताने अनेक गरीब वस्त्यांमधून हिंडले आहे. अठरा विश्वे दारिद्र्य मी पाहिलंय. पण आजवर कधीही अशी स्त्री मी पाहिली नव्हती. आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्षं झाल्यानंतर गरिबीची ही दारुण अवस्था खरोखर मानवतेला कालिमा फासणारी होती. एका वृद्ध स्त्रीजवळ अंग झाकण्यापुरता कपडा नसावा ? आणि तरीही ती तक्रार करत नव्हती. सहा वार साडी नेसल्याबद्दल मलाच अपराधी वाटलं.



काही क्षण मला माझी स्वत:ची लाज वाटली. मी काहीच बोलले नाही. खरं तर थेट वस्तुरूपाने देणगी किंवा रोख रक्कम हातात द्यायची नाही, असं आमच्या संस्थेचं धोरण आहे. पण ते मी क्षणभर विसरले. ही परिस्थितीच अशी होती की तातडीने काहीतरी उपाययोजना करणं अत्यावश्यक होतं. मी माझ्या ड्रायव्हरला पाठवून त्या वस्तीतील स्त्रियांना देण्यासाठी शंभर साड्या मागवल्या. त्या स्वावलंबी होतील की नाही, स्वत:च्या पायांवर उभ्या राहतील की नाही ही दूरची बाब होती. स्त्रीला लज्जारक्षणापुरतं वस्त्र तरी किमान असणं ही निकड होती. तेवढं पुरवूनसुद्धा त्याने त्या स्त्रियांच्या आयुष्यात फार मोठा फरक पडणार नव्हता. पण इतकी गरीबी, इतकी दारुण अवस्था पाहिली की काही वेळा आपण तातडीने काहीतरी कृती करून जातो, त्यातलीच ही एक गोष्ट. ही गरीब माणसे त्यांचा स्वत:चा काहीही अपराध नसताना अशी दु:खाच्या खाईत खितपत पडलेली दिसतात तेव्हा आपल्यासारख्या लोकांनी त्यांना जमेल तेवढी मदत केली पाहिजे. कारण ईश्वराने मुक्त हस्ताने आपल्यावर कृपेची उधळण केलेली आहे.

भारत म्हणजे काही नुसतं तंत्रज्ञान, आधुनिकता, फॅशन, सिनेमे किंवा सौंदर्यस्पर्धा नव्हे. खरा भारत तर आपल्या देशाच्या अंधाऱ्या कानाकोपऱ्यांत वसलेला आहे. कोणत्याही सरकारी यंत्रणेचे हातदेखील पोचू शकणार नाहीत, अशा कानाकोपऱ्यांत आपण देशसेवा करणं, म्हणजे या अशा लोकांची सेवा करणं.

त्या दिवशी त्या कुष्ठरोगांच्या वसाहतीत जाऊन आल्यापासून आता मी नेहमी एक गोष्ट करत असते- कधीही अशा वस्तीत भेटीसाठी गेले, तर किमान दहा तरी साड्या बरोबर घेऊन जाते.

ooo

२१

# झट मंगनी पट ब्याह

सुमारे तीन दशकांपूर्वीचा काळ असा होता, की कर्नाटक-महाराष्ट्र सीमा भागातील काही ठिकाणी कमालीचं दारिद्र्य होतं. पण तो काळ आता लोपला आहे. कृष्णा, मलप्रभा आणि घटप्रभा नद्यांचं मुबलक पाणी आणि ऊसाचं पीक यांमुळे परिस्थिती पालटली आहे. आज त्या भागातील शेतकरी वर्षातील दहा महिने त्या प्रदेशातील अगणित साखर कारखान्यांना ऊस पुरवतात.

आज त्या भागात जर कशाची कमतरता असेल, तर ती आहे काळाची. याचाच परिणाम म्हणून लग्नांची एक आधुनिक पद्धत उदयास आली आहे. ती जैन लोकांमध्ये दिसून येते व त्याला नाव पडलं आहे. 'यादी में शादी.'

ही एक तशी साधी सोपी पद्धत आहे. एखाद्या तरुणीसाठी एखादा अनुरूप वर सापडला की दोन्ही पक्षांची वडीलधारी माणसे एकत्र येऊन याद्या करायला बसतात. त्या याद्यांमध्ये त्या जोडप्याला देण्याच्या सर्व काही वस्तूंची नावे लिहिण्यात येतात. मग त्या रोख रकमेच्या स्वरूपात असोत वा वस्तुरूपात. लग्न त्याच दिवशी पार पडतं, व त्याला दोन्ही घरी अगदी जवळची माणसेच तेवढी उपस्थित राहतात.

"तीस वर्षांपूर्वी मात्र लग्न समारंभ म्हटलं की, जेवणावळी होणार, माणसं एकमेकांना भेटणार. सर्वांच्या आवडीचा तो प्रसंग असे," प्रेमलता रेड्डी म्हणते. ही एक समाजसेविका असून तिने कर्नाटकातील ऐनापूर व अथणी भागात किमान सत्तर 'यादी में शादी' प्रकारची लग्ने जुळवली आहेत. "आज मात्र वाढत्या सुबत्तेबरोबर सगळ्या संकल्पना बदलल्या आहेत. लग्नाची तयारी करणं हे एक भलं मोठं काम. पण ते करायला आज वेळ कुणापाशी आहे ?"

तिच्या मते महाराष्ट्रात तर ही यादी में शादीची पद्धत आज गेली कित्येक वर्षे रुळली आहे व कर्नाटकाच्या सीमा भागामधील लहान गावांमधेही ती लोकप्रिय होत चालली आहे. या गावांमध्ये बरेच लोक एकमेकांना ओळखतच असतात



आणि यादीत मांडून ठेवलेल्या गोष्टींची पूर्तता कुणी न करण्याचे प्रसंग फारसे उद्भवत नाहीत.

पंचवीस वर्षांच्या चंद्रा नावाच्या तरुणाला वाटतं- दुसऱ्याच्या लग्नाला जाणं म्हणजे खरोखर वेळेचा अपव्यय. "मला माझ्या मित्राबद्दल अत्यंत प्रेम आणि आदर आहे. पण जर बेळगावसारख्या दूरच्या ठिकाणी जर त्यांचं लग्न असेल, तर तिथे त्या लग्नाला नुसतं तोंड दाखवायला जायचं म्हटलं तरी माझे दोन दिवस प्रवासात मोडतील," तो म्हणतो. चंद्रा पदवीधर आहे. त्याच्या वडिलांची वीस एकरांची ऊसाची शेती आहे व तो शेतीच्या कामात वडिलांना मदत करतो. "त्या दिवशी माझे मजूर शेतात काम करत असणार आणि मी जर तिथे हजर नसलो तर काम पुरं होणार नाही." चंद्रा म्हणतो.

चंद्राचं लग्न ठरवायची जेव्हा वेळ आली, तेव्हा त्याच्या आईवडिलांनीसुद्धा ही 'यादी में शादी'ची पद्धतच निवडली. बऱ्याच मुली पाहिल्यावर आर्थिक व सामाजिक पार्श्वभूमीचा विचार करून त्यांनी एकूण तीन मुली पसंत केल्या. मग एक दिवस चांगला मुहूर्त बघून ते चंद्राला बरोबर घेऊन या तीनही मुली पाहण्यासाठी गेले. पहिल्या दोघी काही चंद्राला पसंत पडल्या नाहीत, पण तिसरी मात्र पडली.

एव्हाना सायंकाळचे चार वाजायला आले होते. पण कोणीतरी गडबडीनं जवळच्या गावातून दोन हार, एक तबक, पायांतील जोडवी-विरवल्या, वधूला पिवळी साडी आणि ब्लाऊज, व नवऱ्या मुलासाठी पायजमा-शर्ट आणि अंगठी आणली. कुणाला तरी रवा, तांदूळ व साखर आणायला पाठवण्यात आलं. जेवणावळीचा खर्च तेवढा ज्यांच्या घरी लग्न होते, त्यांनी करायचा अशी पद्धत आहे. उरलेला खर्च मात्र दोन्ही घरच्यांनी सारखा वाटून घेतला.

वधू-वर तयार होत असतानाच इकडे घरच्या बायकांनी जमलेल्या सर्वांसाठी गोडाधोडाचा स्वयंपाक केला. पुरुष जमून याद्या करायला बसले. आजकाल तर या याद्यांचे छापील फॉर्म्ससुद्धा उपलब्ध असतात.

वधू-वरांच्या आईवडिलांनी आपण त्या दोघांना लग्नाची काय काय वस्तू भेट म्हणून देणार ते तपशीलवार लिहिले. जे काही थोडे फार मतभेद निर्माण झाले तेही सोडवण्यात आले. नंतर मुद्दाम वडीलधाऱ्यांना बोलावून घेऊन त्यांच्यासमोर वधू-वरांच्या मातापित्यांनी त्या याद्यांवर स्वाक्षऱ्या केल्या. त्यानंतर त्या याद्यांची देवाणघेवाण झाली. लग्नाची तारीख ठरली. सामान्यत: सुगीच्या मोसमानंतरचा मुहूर्त पाहण्यात येतो. या वेळी यादीतील सर्व गोष्टी जमा करून सुपूर्द करायच्या असतात.

लग्न घरच्या घरीच लहान प्रमाणावर करण्यात आले. गावचे काही जवळचे

नातेवाईक व मित्र तेवढे उपस्थित होते. वाजंत्री नाही, स्वागत समारंभ नाही, फक्त उपस्थितांसाठी जेवण तेवढे ठेवण्यात आले होते.

या अशा प्रकारच्या लग्नांच्या बाजूने असणारे लोक त्याचे फायदे पटवून देताना म्हणतात- अशा प्रकारच्या लग्नात अनेक अनावश्यक चालीरीतींना फाटा दिलेला असतो व लग्न करून देणाऱ्यांना वायफळ खर्च पडत नाही. अशा प्रकारच्या लग्नात पत्रिकाही बघत नाहीत आणि मुहूर्तही नाही. असं लग्न मध्यरात्रीसुद्धा केलं तरी चालतं. पुरोहितांनी अशा प्रकारच्या लग्नांना हरकत घेतलेली नाही. 'यादी में शादी' म्हटल्यावर मोठा लग्नसमारंभ नसणार, आहेर करायचा नसणार आणि मोठ्या जेवणावळी नसणार. ही गोष्ट समाजानेसुद्धा स्वीकारलेली आहे.

पण या पद्धतीचेही काही तोटे आहेत. हुंडापद्धत यामध्येही आहेच. यादीमध्ये नमूद केलेल्या गोष्टींची पूर्तता एखाद्या पक्षाने केली नाही, असं सहसा होत नाही. मानसिक दृष्ट्यासुद्धा मुलीला ही यादी में शादी स्वीकारणं कठीण होऊ शकतं, कारण कधी कधी केवळ १२ तासांच्या आत तिचं लग्न उरकण्यात येऊन तिची स्वत:च्या कुटुंबातून उचलबांगडी होते व ती परक्या घरात जाऊन पडते.

चन्नाप्पा गोंडा हा एक सधन शेतकरी. याने आपल्या तिघा भावांची लग्ने अशा नव्या पद्धतीने उरकली. पण त्यांपैकी एका भावाच्या लग्नाला तो स्वत:च उपस्थित राहू शकला नाही, कारण तो त्या वेळी परगावी गेलेला होता. लग्न झाल्याचं त्याला दुसऱ्या दिवशी कळलं.

"तुम्ही कुटुंब प्रमुख. मग तुम्हाला राग नाही आला ?" असं विचारताच गोंडा हसतो. "मुळीच नाही. माझे काका आणि माझ्या बहिणी होत्याच की. शिवाय मुलीकडच्या लोकांना आम्ही गेली दहा वर्षे ओळखतोय," तो म्हणतो. "अगदी मी जरी उपस्थित राहू शकलो असतो, तरी असा काय मोठा फरक पडणार होता ? माझ्या भावाला मुलगी आवडली. तो जर सुखी झाला तर ते आमचं सुदैवच की !"

त्या तीन लग्नांचा मिळून गोंडाला दहा हजार रुपये खर्च आला. त्यांतील दोन लग्ने तर त्याच्या स्वत:च्या घरीच झाली.

"त्यांतील एका लग्नाच्या वेळी मुलीचे आईवडील आमच्याकडे मुलगी दाखवायला घेऊन आले. आम्हांला ती पसंत पडली." तो सांगतो.

दुसऱ्या लग्नाच्या वेळी दोन्ही पक्षांना वधू आणि वर पसंत पडले पण मुलीकडच्यांनी यादी करण्यासाठी मुलाच्या घरी येण्याची इच्छा व्यक्त केली.

"कदाचित त्यांना आमची अधिक माहिती काढायची असेल. अखेर ते आपली मुलगी आमच्या घरात देणार होते ना." गोंडा म्हणतो.



"पण मग मुलीच्या आईवडिलांनी समजा यादीत लिहिलेल्या काही गोष्टी दिल्या नाहीत, तर ?"

"९५ टक्के लग्नात तरी असं कधीच होत नाही." गोंडा सांगतो. "प्रत्येक आईवडिलांची आपल्या मुलीला काही ना काहीतरी देण्याची इच्छा ही असतेच. कुणाचीच फसवणूक करायची इच्छा नसते. विशेषत: लहान गावात. कारण तसं झालं तर त्यांची छी-थू होईल. कोणीच त्यांना आदरानं वागवणार नाही. तुम्ही यादी तयार करा नाही तर नको, पण लग्न म्हटलं की परस्परांवर विश्वास हा आलाच."

मी बंगलोरला परत आले. माझ्या टेबलावर लग्नपत्रिकांचा एक गठ्ठाच जमा झाला होता. सोनेरी अक्षरांतील निमंत्रणे, काही हाताने चितारलेली, काही पत्रिकांवर वधू-वरांचे फोटो तर काही अगदी साधी. प्रत्येक लग्नपत्रिकेत विवाहस्थळ म्हणून एखाद्या मंगल कार्यालयाचे नाव, मोठ्या महागड्या नाही तर साध्या. प्रत्येक स्वागत समारंभात वाद्यवृंद तरी असणार होता नाही तर सिनेसंगीताचा गोंगाट.

हे जगच वेगळं आहे. लग्नाचा स्वागत समारंभ म्हणजे इथे व्यावसायिक क्षेत्रातील संबंध जुळवून आणण्याची पर्वणी, आपल्या श्रीमंतीचे प्रदर्शन मांडण्याची संधी, आहेराच्या रूपाने केलेली उपकाराची परतफेड आणि आपले हात कसे सर्वत्र वरपर्यंत पोचलेले आहेत हे दाखवण्याची संधी. हे सारं आपल्याला करावंच लागतं, कारण आपण त्या ऊसाच्या प्रदेशातील साधेसुधे लोक नाही. गोष्टी जशा आहेत तशाच स्वरूपात त्यांचा स्वीकार करणारे सरळ, निर्मळ लोक नाही आपण.

OOO

२२

# आठवणीत राहील असा तो लग्नसोहळा

इन्फोसिस फौंडेशनची विश्वस्त या नात्याने मला रोज ढिगाने पत्रे येतात. येथे आम्ही वेगवेगळ्या कारणांसाठी लोकांना आर्थिक मदत देत असतो. स्वाभाविकच गरजू आणि मदतीची फारशी गरज नसलेले, असे दोन्ही प्रकारचे लोक आम्हांला पत्रे लिहितात. या दोन्ही प्रकारच्या लोकांमधून नेमके खरे गरजवंत ओळखून काढणं, हे खरं तर फार कठीण काम आहे.

अशीच एक सोमवारची सकाळ. त्या दिवशी पत्रांचा नुसता पाऊस पडला होता. मी एकेक पत्र वाचत होते. माझ्या सेक्रेटरीने मला सांगितलं, "मॅडम एक लग्नपत्रिका आली आहे व त्यासोबत एक हस्तलिखित खाजगी चिठ्ठी पण जोडली आहे. तुम्ही त्या लग्नाला जाणार आहात ?"

मी कॉलेजात अध्यापनाचं काम करत असल्याने मला माझ्या विद्यार्थ्यांकडून नेहमीच लग्नाची बोलावणी येत असतात. त्यामुळे ही पत्रिका माझ्या एखाद्या विद्यार्थ्यांचीच असेल असं मला वाटलं. पण पत्रिका उघडून वाचल्यावर मात्र वधू-वरांच्या नावांवरूनही काहीच बोध होईना.

सोबतच्या चिठ्ठीत हस्ताक्षरात लिहिलं होतं, "मॅडम, तुम्ही जर लग्नाला आला नाहीत, तर ते आम्ही आमचं दुर्भाग्य समजू."

मुलाचं वा मुलीचं नाव काही केल्या मला आठवत नव्हतं. पण उत्सुकतेपोटी मी त्या लग्नाला जायचं ठरवलं. पावसाळ्याचे दिवस होते. लग्नस्थळ शहराच्या पार दुसऱ्या टोकाला होतं. एकदा क्षणभर तर असंही वाटलं, "कुठल्यातरी अनोळखी व्यक्तीच्या लग्नाला इतक्या दूर जाण्यात काही अर्थ आहे का ?"

लग्नसमारंभाच्या जागी पोचले तर ते अगदी मध्यमवर्गीय कुटुंबातील लग्न दिसत होतं. स्टेजवर फुलांची भरगच्च आरास केली होती. सिनेसंगीत मोठ्यांदा वाजत वाजत होतं. त्याकडे कुणाचंही लक्ष नव्हतं. पावसामुळे मुलांना बाहेर



अंगणात खेळता येत नव्हतं त्यामुळे बरीच मुलं हॉलच्या आतच लपंडाव खेळून धुमाकूळ घालत होती. स्त्रियांच्या अंगावर बंगलोर सिल्क, म्हैसूर क्रेप सिल्क अशा साड्या होत्या.

व्यासपीठावर उभ्या असलेल्या वधू-वरांकडे मी निरखून पाहिलं. कदाचित त्यांच्यातील कोणी माझा विद्यार्थी असेल, नाही तर एखादे वेळी दोघेसुद्धा असतील. तिथे त्या गर्दीत मी उभी होते. कुणाची ओळख नाही, पाळख नाही. काय करावं ते मला समजेना.

इतक्यात एक वयोवृद्ध गृहस्थ माझ्यापाशी आले आणि म्हणाले, "तुम्हाला वधू-वरांना भेटायचंय का ?"

मग मी त्यांच्यापाठोपाठ स्टेजवर गेले, स्वतःची ओळख करून दिली आणि त्यांना 'वैवाहिक' जीवन सुखाचे जावो, अशा शुभेच्छा दिल्या. ते दोघे खूप आनंदात होते. 'यांची नीट विचारपूस करा', असं नवऱ्यामुलाने त्या वृद्ध गृहस्थांना सांगितलं. तरीही माझ्या मनात तो प्रश्न वारंवार डोके काढतच होता. "हे लोक कोण आहेत ? त्यांनी ही अशी चिठ्ठी मला का पाठवली असेल ?"

ते गृहस्थ मला जेवणाच्या हॉलमधे घेऊन गेले व त्यांनी मला खाण्यासाठी फराळाचे पदार्थ आणले. आता मात्र फार झालं. हे लोक नक्की कोण, हे जाणून घेतल्याशिवाय मी काहीही खाणार नाही मी ठरवलं.

माझ्या मनाची चलबिचल पाहून ते गृहस्थ हसले आणि म्हणाले, "मॅडम, मी नवऱ्यामुलाचा पिता. ही जी मुलगी आहे ना मालती, हिच्या प्रेमात माझा मुलगा पडला. आम्ही दोघांचं लग्न ठरवलं. साखरपुडा झाल्यानंतर मालतीच्या अंगावर कोड उठलं. माझ्या मुलानं लग्न करण्यास नकार दिला. आम्हांला सर्वांनाच खूप वाईट वाटलं. 'तिच्या घरच्या लोकांना तिच्या भविष्याची चिंता वाटू लागली. कुटुंबातील वातावरणच सगळं बिघडून गेलं. घरातील ताणतणाव सहन होईना म्हणून माझा मुलगा वारंवार लायब्ररीत जाऊन बसे. एक महिन्याने तो माझ्यापाशी आला, आणि म्हणाला, मी मालतीशी लग्न करण्यास तयार आहे. आम्हांला सर्वांनाच खूप आश्चर्य वाटलं व आनंदही झाला. आज आता लग्न आहे."

पण तरीही माझ्या प्रश्नाचं उत्तर मला मिळालंच नव्हतं. या सगळ्यात माझा संबंध कुठे आला ? पण त्या प्रश्नाचं उत्तर वरपित्याने लगेच दिलं.

"मॅडम, या काळात त्यानं तुमची 'महाश्वेता' ही कादंबरी वाचली होती, असं आम्हांला मागाहून समजलं." ते म्हणाले. "माझ्या मुलाची परिस्थिती पण अगदी त्या पुस्तकातल्या गोष्टीसारखीच होती. त्याने ती कादंबरी किमान दहा वेळा

वाचली व त्यातील मुलीचं दु:ख त्याला जाणवलं. त्याने एक महिनाभर विचार केला आणि ठरवलं- आपण त्या कादंबरीतल्या माणसाप्रमाणे आता आपली जबाबदारी झटकून टाकून नंतर त्याबद्दल पश्चात्ताप करत बसायचं नाही. तुमच्या कादंबरीनं त्याच्या विचारांमधे परिवर्तन घडवून आणलं.''

आता काय घडलं ते माझ्या लक्षात आलं.

त्यानंतर मुलाच्या वडिलांनी एक पार्सल आणलं व अत्यंत आग्रहाने मला या भेटीचा स्वीकार करायला लावला. मी जरा घुटमळले. पण त्यांनी ते जबरदस्तीने माझ्या हातात ठेवलं आणि म्हणाले, ''ही साडी मालतीने खास तुमच्यासाठी आणली आहे. ती तुमच्याशी नंतर बोलणार आहे.''

पाऊस जोराने कोसळू लागला. हॉलमधे पाणीच पाणी झालं. माझी सिल्कची साडी भिजत होती. पण मला त्याचं काही वाटलं नाही. मला खूप खूप आनंद झाला होता. माझ्यासारख्या एखाद्या सामान्य व्यक्तीच्या योगाने कोणाचं आयुष्यच असं बदलून जाईल, असं मला स्वप्नातसुद्धा कधी वाटलं नव्हतं.

मी जेव्हा कधी ती साडी नेसते, तेव्हा मला मालतीचा आनंदाने उत्फुल्लित झालेला चेहरा आणि महाश्वेता पुस्तकाचं मुखपृष्ठ डोळ्यासमोर तरळतं. माझ्याकडे असलेली ती सर्वात मौल्यवान साडी आहे.

ooo



२३

# संवेदनाशून्यतेचे मोजमाप

फेब्रुवारी महिना म्हणजे वास्तुशांत्यांचा महिना, मुंजींचा महिना आणि झटपट लग्ने उरकण्याचा महिना. विशेषत: थोड्या काळासाठी अमेरिकेहून भारतात येणाऱ्या सॉफ्टवेअर इंजिनीअर मुलांच्या लग्नांचा महिना. शाळेच्या विद्यार्थ्यांचा परीक्षेच्या तयारीच्या दृष्टीने खास महत्त्वाचा असणारा हा महिना.

माझी मैत्रीण सुमा हिनं नवीन घर घेतलं होतं आणि त्याच्या वास्तुशांतीसाठी आपल्या सर्व मैत्रिणींनी यावं अशी तिची इच्छा होती. या निमित्तानं आम्ही सर्व जणी बऱ्याच दिवसांनी एकत्र जमलो होतो.

मी पहाटेच तिच्या घरी पोचले तेव्हा पूजा सुरू झालेली होती. आमच्या इतर मैत्रिणी अजून आल्या नव्हत्या. पूजा चालली होती तिथे जाऊन मी मैत्रिणींची वाट बघत बसले. घर खूप मोठं होतं. पण पूजा मात्र तेथील एका लहानशा खोलीत चालली होती. पाहुण्यांना बसायला तिथे दोन गालिचे अंथरले होते. सुमा पूजेत गर्क होती. तिने सुंदर रेशमी साडी नेसली होती. डोक्यात फुलांचा गजरा माळला होता, त्याने ती अधिकच छान दिसत होती.

नेहमीप्रमाणेच इतर पाहुण्यांना त्या वेळी करण्यासारखं काहीच नव्हतं, त्यामुळे विविध विषयांवर गप्पा रंगल्या होत्या. तरुण मुलांच्या समस्या, पंतप्रधान, माधुरी दीक्षितविषयी खमंग चुरचुरीत गप्पा, मिस इंडिया, चांगली ब्यूटी पार्लर्स, अत्याधुनिक फॅशनचे दागिने- यादी न संपणारी होती. मात्र सासरच्या मंडळींवर गप्पांची गाडी घसरली आणि अनेक जणी हिरीरीने भाग घेऊन बोलण्यास सरसावल्या.

मी एकीकडे ते सर्व संभाषण ऐकत होते, पण त्याच वेळी मनाच्या कोपऱ्यात कुठेतरी एक वेगळाच विचार डोकं वर काढत होता. गुजरातेमधील भूकंप होऊन जेमतेम आठवडाच उलटला होता. टी. व्ही. च्या सर्व वाहिन्यांवर ताजी वृत्तचित्रे दाखवण्यात येत होती. भूकंपग्रस्तांशी माझी व्यक्तिश: ओळख नसूनसुद्धा

त्यांच्यावर ओढवलेल्या दारुण आपत्तीचा नुसता विचार केला तरी अंगावर काटा उभा राहात होता. त्या विचाराने माझे डोळे भरून आले. माझ्या मनात आजकाल दुसरा काही विचार येतच नसे.

मी संभाषणात प्रत्यक्ष भाग घेत नसले तरी त्यातील काही भाग कानावर पडल्यावाचून राहिला नाही. त्या म्हणत होत्या, 'ही सुमा काय नशीबवान आहे. इतकं सुंदर घर या किंमतीत मिळालं, म्हणजे...' बोलणाऱ्या स्त्रीच्या स्वरातून थोडी असूया डोकावत होती.

"किती पैसे पडले ?"

"फक्त पन्नास लाख. त्या लोकांनी अडचणीत आल्यामुळे तडकाफडकी विकलं म्हणे. या घराच्या मालकाला मी ओळखते ना."

"पण अडचणीत येऊन, घर विकायची का वेळ आली ?"

"त्याचा कारखाना होता. पण मंदीची लाट आली. कारखाना बंद करायची आणि घर विकण्याची पाळी आली."

"हे घर किती सुंदर आहे- सगळी मार्बलची फरशी, ॲटॅच्ड बाथरूम्स, त्यात टब. इतक्या कमी किंमतीत असं घर मिळणं म्हणजे... अक्षरशः लुटालूट !"

"अग हो, पण तुझ्या मुलीच्या लग्नाची तयारी कशी काय चालली आहे ?"

"मला वाटतं सगळ्या साड्या कांचीपूरम्‌ला जाऊनच घ्याव्यात. स्वस्तही पडतं आणि रंगसंगती चांगली मिळते."

"आणि चांदीच्या भांड्यांचं काय ?"

"त्याचा काहीच प्रश्न नाही. चिकंपेटमधे माझ्या ओळखीचा एक माणूस आहे. आम्ही नेहमी चांदीची खरेदी त्याच्याकडूनच करतो. मी त्याला शंभर कुंकवाच्या करंड्यांची व १०० छोट्या वाट्यांची ऑर्डर दिली आहे. करंडे लांबच्या नातेवाईकांना आणि वाट्या जवळच्यांना."

"आणि जेवणाचं काय ? त्याची काय व्यवस्था ?"

"ती केल्याशिवाय कशी राहीन मी ? ते मी मुलांशी आणि यांच्याशी बोलून सगळं व्यवस्थित ठरवलंय. आम्ही पाणीपुरी, भेळ आणि चाट असे स्टॉल एका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला साऊथ इंडियन स्नॅक्सचे स्टॉल ठेवणार आहोत. कोल्ड्रिंक्स व स्वीट्‌ससुद्धा ठेवणार आहोत. खरं तर आम्हांला सगळ्यांना गुजराती मिठाई खूप आवडते. पण आमचा जो आचारी आहे ना, तो गुजरातला गेलाय. त्याचे सगळे कुटुंबीय भूकंपात गेले म्हणे. तो लग्नाला न आलेलाच बरा, उगीच अपशकुन !"



"अग हो, त्या भूकंपग्रस्तांच्या निधीला तुम्ही किती मदत केलीत ?"

"आमच्या ऑफिसात पैसे जमा करत होते ना, तर मी सरळ सांगितलं, आम्ही दुसऱ्या एका ठिकाणी पैसे दिले आहेत म्हणून ! आणि ऑफिसात दिलेच नाहीत. नाही तरी आपल्या देशात एकापाठोपाठ काहीतरी संकटे येतच राहतात. इथल्या अडचणी संपायलाच तयार नाहीत. मग कशाला पैसे द्यायचे ? त्या भागात आमचे कोणी नातेवाईकही नाहीत."

आमचे तथाकथित उच्च मध्यमवर्गीय लोक गुजरातसाठी काय करणार होते ? तो काही आपल्या देशाचा भाग नाही ? जीवन हे मरणापेक्षा मोठं आहे हे मला मान्य आहे. आपण काही झाल्या गोष्टीचा सदान्‌कदा शोक करत बसू नये, हेही खरं. पण आपलं आयुष्य काय केवळ कुंकवाचे करंडे, कांचीपुरम्‌ साड्या आणि लग्नाच्या जेवणावळी एवढ्यापुरतंच मर्यादित आहे का ? आपलं वागणं बघून त्यातूनच आपली मुलं शिकत असतात, बोध घेत असतात. जर आपणच असे वागलो तर आपली पुढची पिढीसुद्धा अशाच संवेदनाशून्यतेने वागेल.

एक तरुण राजपुत्र, त्याची सुंदर पत्नी व मूल यांची कथा मला आठवली. एकदा त्याला त्याच्याशी संबंधित नसलेली अशी एक व्यक्ती, एक रुग्ण, एक वृद्ध आणि एक प्रेत दृष्टीस पडले. त्याबरोबर त्याने सर्वसंगपरित्याग केला आणि तो संन्यासी बनला. त्याचं सामाजिक संवेदनाक्षमतेचं परिमाण काय असेल ? त्याचं तर मोजमाप करतासुद्धा येणार नाही.

आणि आमच्याकडे बघा- तो तरुण साधू म्हणजेच गौतम बुद्ध आपल्या देशात होऊन गेला म्हणून आपण अभिमान बाळगतो. पण त्याच्यापासून आपण काय बरं शिकलो ?

०००

## २४

# टू सर विथ् लव्ह

आशा आणि मी एम्. जी. रोडवर खरेदीवर गेलो होतो. तेव्हा एक म्हातारा आमच्यापाशी आला. तो साधारण साठीचा असावा. रुपेरी केस व चेहऱ्यावर थोड्या सुरकुत्या असल्या तरी बाकी तब्येतीनं खणखणीत दिसत होता. तो आशाकडे बघून हसला. पण तिने काहीच ओळख दाखवली नाही. मग तो माणूस क्षणभर आमच्यासमोर तसाच उभा राहिला आणि मग निघून गेला.

तो निघून गेल्यानंतर मी आशाला म्हणाले, "अग, तो माणूस तुझ्या ओळखीचा होता का ? तो तुझ्याकडे बघून हसला. तू ओळखलंस का त्याला ?"

"हो, ओळखलं ना. ते आमचे गणिताचे शिक्षक होते शाळेतले. त्यांनी आम्हांला इतकं वाईट शिकवलं की मला गणिताविषयी तिटकारा वाटू लागला. ते महाभयंकर होते. त्यांच्याशी बोलण्याची कोणाची हिंमतही नसे, इतके ते कडक होते. त्यांनी आम्हांला कधीच काही शिकवलं नाही." आशाच्या आवाजात राग आणि निराशा होती.

कदाचित ती फार वाढवून सांगत असेल.

एक गोष्ट खरी, की कॉलेजापेक्षासुद्धा शाळेतील शिक्षकांमुळे तुमचा पाया पक्का होण्यास मदत होत असते. पदवीच्या वर्गात किंवा पदव्युत्तर वर्गाला शिकवणं हे तसं तुलनेनं सोपं काम असतं. पण शाळेच्या विद्यार्थ्यांना शिकवणं मात्र मुळीच सोपं नसतं. शाळेतील शिक्षकांचं आपल्या विद्यार्थ्यांवर निरतिशय प्रेम असलं पाहिजे. एखादा शिक्षक चांगला आहे का नाही याची पारख करण्यासाठी केवळ त्याच्यापाशी असलेल्या ज्ञानाचं मोजमाप करून चालत नाही.

मला माझ्या शिक्षकांची आठवण झाली. मला माझ्या शाळेतील शिक्षक भेटले असते, तर त्यांना पाहून माझी प्रतिक्रिया कशी बरं झाली असती ? मी विचार करू लागले. त्यांनी काय केलं असतं ? मला बघून ते काय म्हणाले



असते ? कदाचित म्हणाले असते, "तू इथे एम्. जी. रोडवर काय वेळ घालवत बसली आहेस ? घरी जा नाही तर ऑफिसात जा आणि पूर्ण तयारी असल्याशिवाय शिकवू नको."

त्यावर क्षणाचाही विचार न करता मी उत्तर दिलं असतं, "येस, सर." त्यानंतर जरा घुटमळले असते व हळूच विचारलं असतं, "सर, तुम्ही कुठे राहता ? मी नंतर सवडीनं तुम्हाला येऊन भेटले तर चालेल ?"

त्यांनीही प्रेमानं मला खांद्यावर थोपटलं असतं, थोडी काळजी व्यक्त केली असती. मी त्यांची विद्यार्थिनी असतानासुद्धा हे असंच घडायचं. मग आम्ही दोघंही हसलो असतो.

माझे शिक्षक, राघवेंद्र वारणेकर, हे सर्वार्थाने अत्यंत जगावेगळे असेच शिक्षक होते. ते माझ्याच गावचे, म्हणजे हुबळीचे. त्यांची राहणी अत्यंत साधी होती. त्यांना कधीच कोणत्याही प्रकारचे पुरस्कार किंवा मानसन्मान प्राप्त झाले नाहीत. ते स्वत: पदवीधर नव्हते पण तरीही ते अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे शिक्षक होते. गणित हा विषय ते इतक्या सहजतेने, व सुंदर शिकवत, की गणित अवघड असतं, असं कधी जाणवलंच नाही.

गणिताला ते सर्व शास्त्रांची राणी म्हणत. 'चला जाऊया बरं राणीला भेटायला' असं ते म्हणत आणि आम्हांला गणिताच्या अद्‌भुत दुनियेत घेऊन जात. मग आम्ही स्थळाकाळाचं भान विसरत असू. भूमितीमध्ये कितीतरी रायडर्स असत. बीजगणितात शेकडो प्रश्न. पण ते अत्यंत उत्साहाने, समरस होऊन शिकवायचे व म्हणायचे, "ज्या मुलांना वाटतं, आपलं गणित कच्चं आहे, त्यांच्यासाठीच तर मी इथे बसलो आहे. चांगलं, वाईट या आपल्या मनाच्या सगळ्या कल्पना. तुमची जर कष्ट घ्यायची तयारी असेल व खरोखर, प्रामाणिकपणे तुम्हांला विषय समजून घ्यायचा असेल तर मग तुम्ही राणीला जाऊन भेटा." एखादा गारुडी आपल्या पुंगीच्या तालावर नागाला मंत्र मुग्ध करतो तसे ते गणिताच्या तासाला आम्हां-विद्यार्थी-विद्यार्थिनींना मंत्रमुग्ध करत.

त्यांच्या अखेरच्या दिवसांत ते खूप आजारी होते तेव्हा मी त्यांना भेटायला गेले. जाताना एक छोटीशी भेटवस्तू घेऊन गेले. त्यांची आर्थिक परिस्थिती तशी खालावलेलीच होती, पण तरीही त्यांनी त्या भेटीचा स्वीकार केला नाही.

ते मला म्हणाले, "आपल्या विद्यार्थ्यांच्या ठायी जीवनाला सामोरं जाण्याचा आत्मविश्वास निर्माण करणं, हेच शिक्षकाचं कर्तव्य आहे. जीवनात वारंवार वेगवेगळ्या कसोट्यांना तोंड द्यावं लागतं. आपल्यापेक्षाही कितीतरी पटींनी श्रेष्ठ असे विद्यार्थी

घडवणं, हा एखाद्या शिक्षकाच्या आयुष्यातील अत्यंत आनंदाचा भाग असतो. मी माझं कर्तव्य उत्तम पार पाडलं आहे. आज माझे विद्यार्थी इतके प्रसिद्ध आहेत की मी त्यांचा शिक्षक म्हणून ओळखला जाणं ही खरोखर माझ्या दृष्टीने अत्यंत अभिमानाची व आनंदाची गोष्ट आहे.''

त्यांचं हे अत्यंत साधं, सोपं जीवनविषयक तत्त्वज्ञान ऐकून मी थक्क झाले. कारण हे तत्त्वज्ञान प्रत्यक्षात उतरवणं अत्यंत कठीण आहे. ते जर एखाद्या मोठ्या शहरातल्या मोठ्या शाळेत नोकरी करत असते, तर त्यांनी खाजगी शिकवण्या घेऊन कितीतरी पैसे कमावले असते नाही तर स्वत:चीच शाळा काढली असती. पण त्यांनी तसं केलं नाही. एखाद्या तेवणाऱ्या मेणबत्तीची मला त्यांच्याकडे पाहून आठवण झाली. स्वत: जळत दुसऱ्याला प्रकाश देत राहणाऱ्या मेणबत्तीची !

आज मी कधीही व्यासपीठावर आत्मविश्वासानं उभी राहते, किंवा आयुष्यात पुढे येऊन उभ्या राहिलेल्या संकटाचा धीरानं सामना करते, तेव्हा मला माझ्या या सरांची आठवण येते. त्यांनी मला ही जी शिकवण दिली ती खरोखर कितीही दाम मोजून विकत मिळणार नाही, कितीही संकटे कोसळली तरी ती शिकवण विरघळून जाणार नाही व कोणत्याही विद्यापीठात ती शिकायला मिळणार नाही.

०००



## २५

# पैसे द्या नाही तर जीव देईन

इन्फोसिस फाऊंडेशनमध्ये आम्हांला वर्षाला किमान दहा हजार पत्रे येतात. ती सर्व पत्रे उघडून वाचायची म्हणजे माझ्या सेक्रेटरीला एक महाकर्मकठीण काम असतं. काही पत्रे वाचून डोळे खाड्कन् उघडतात तर काही पत्रे विक्षिप्त, विनोदी असतात.

एक दिवस मला एक पत्र आलं. अगदी आणीबाणीची परिस्थिती सूचित करणारं होतं ते पत्र. ते चांगलं पाच पानी पत्र होतं व एक महिलेनं लिहिलेलं होतं. पहिल्या दोन पानांमध्ये शेअर बाजारात कशी उलथापालथ होत असते, त्यांचं वर्णन केलेलं होतं. आपण चुकीचा स्टॉक विकत घेण्यात स्वत:चे पैसे कसे घालवले ते तिनं लिहिलं होतं. पण तिला खरंखुरं जे काही म्हणायचं होतं ते शेवटच्या काही ओळींमध्ये लिहिलेलं होतं. तिने आपल्या मूर्खपणापायी जी काही कर्जे करून ठेवली होती ती सर्व मी फेडावी असं तिचं म्हणणं होतं. तिनं म्हटलं होतं, ''तशी रक्कम काही फार मोठी नाही. फक्त पाच कोटी आहेत.''

ही स्त्री कोण ते काही मला माहीत नव्हतं. हे असलं काहीतरी लिहिण्याचं तिचं धारिष्ट्य व्हावं याची मला मोठीच गंमत वाटली. मी उत्तर पाठवलं नाही.

पुढच्याच आठवड्यात तिच्याकडून आणखी एक पत्र आलं. परत पाच पानांचं. पण आता तिने त्याला आपल्या घरगुती अडचणींचा पाढा वाचला होता व मी तिला मदत करणं कसं अत्यंत गरजेचं आहे तेही लिहिलं होतं. मी जर तिला पैसे पाठवले नाहीत तर तिने आत्महत्या करीन, अशीही धमकी मला दिली होती व त्या आत्महत्येला अर्थातच मी जबाबदार असणार होते.

या असल्या पत्राला उत्तर तरी काय देणार मी ? मी अर्थातच काही लिहिलं नाही. दोन आठवड्यांनंतर परत तिचं पत्र आलं. त्यात तिनं मला पाषाणहृदयी स्त्री म्हटलं होतं. मला माझ्या बांधवाविषयी साधी करुणा, प्रेम, अनुकंपासुद्धा वाटत

नव्हती ! आणि ही अशी व्यक्ती, मानवजातीची सेवा करण्याच्या कामाला कशी लागली, याचंच तिला आश्चर्य वाटत होतं.

ही अशी पत्रे वाचली की मला कुठेतरी दु:ख होतं. या पाठीमागचं जे काही तत्त्वज्ञान आहे, ते मला समजू शकत नाही. एखाद्या माणसाने तुम्हाला जर पैसे दिले नाहीत तर एका क्षणात तो माणूस वाईट कसा होतो ? नाही तर तो माणूस अत्यंत थोर असतो. पुष्कळदा नातेवाईकसुद्धा असं वागतात. ते म्हणतात, "तुम्ही जर तुमच्या स्वत:च्या नातेवाईकांनाच पैसे देणार नसाल, तर त्या नातेवाईकांचा उपयोग तरी काय ? मग तुम्ही दुसऱ्यांना तेवढी कशी काय मदत करता ?"

'मदत' या शब्दाचा खराखुरा अर्थ तर फारच थोडे लोक जाणतात. आपण आपल्या देशबांधवांना आणि पर्यायानं देशाला मदत केली पाहिजे हे तर खरंच आहे. पण एखाद्या माणसाची परिस्थिती उत्तम असताना त्याला पैसे देणं, म्हणजे मदत नव्हे. दुसरं घर घेण्यासाठी, महागडे दागिने विकत घेण्यासाठी किंवा परदेश प्रवास करण्यासाठी कुणाला पैसे देणं, म्हणजे काही मदत नव्हे. जर कुणी झटपट श्रीमंत होण्याच्या आशेने शेअर बाजारात पैसे गुंतवले व त्यात त्याचे नुकसान झाले, तर अशा व्यक्तीला इतरांनी मदत काय म्हणून करावी ?

जी माणसे दुसऱ्याकडून मदतीची अपेक्षा करतात, त्यांच्या अंगात काही गुण असले पाहिजेत. जर आपल्याला पैसा मिळवण्याचे इतर सर्वच मार्ग खुंटले असले तरच आपण दुसऱ्यापुढे मदतीचा हात पसरावा आणि तोही काही आजारपण उद्भवले असेल व त्यासाठी मदत हवी असेल, किंवा शिक्षणाला मदत हवी असेल, तरच ! एक गोष्ट लक्षात ठेवायलाच हवी, की हा आपला पैसा नाही. देणगी देणाऱ्या माणसाने काही वेळेला स्वत:ची काही सुखे बाजूला सारून, आपल्या कुटुंबीयांची सुखे बाजूला रक्कम उभी केलेली असू शकते. तो पैसा मिळवण्यासाठी अहोरात्र मेहनत केलेली असू शकते. शिवाय आपले पैसे आपण कोणाला द्यायचे आणि कोणाला नाही, हे ठरवण्याचा अधिकार त्या दात्याचाच असतो. दान देणाऱ्याचा हात हा ते दान स्वीकारणाऱ्या हातापेक्षा नेहमीच वरच्या पातळीवर असतो.

जर कुणी मला कधी शाल भेट म्हणून दिली, तर त्या शालीआडून बरेच वेळा विनंती अर्जही येतो. जर एखाद्या व्यक्तीने माझी प्रशंसा केली, तर बरेच वेळा त्या प्रशंसेचा शेवट एखाद्या मागणीने होतो. त्यामुळे मी फक्त अशाच माणसांना मदत करायचं ठरवलंय, ज्यांना कशाचाच, कुणाचाच आधार नाही. आपण जर त्यांना मदत केली नाही तर त्यांचा अक्षरश: विनाश ओढवेल. ही अशी माणसं,



हीच माझी माणसं. तेच माझे नातेवाईक. मी त्यांच्यासाठी काम करते. मग त्यांची जात, उपजात, लिंग, भाषा किंवा राजकीय निष्ठा कोणतीही असो. जर आमच्यापाशी त्यांना मदत करण्यासाठी पैसे उपलब्ध असतील, तर ती आम्ही जरूर करतो.

त्या लोकांकडून मी त्या बदल्यात कसलीही अपेक्षा ठेवत नाही. पुष्पगुच्छाची-सुद्धा नाही. त्यांच्या डोळ्यांत तरळणारा आनंद हेच माझं पारितोषिक.

त्या स्त्रीच्या आत्महत्येची धमकी देणाऱ्या पत्रानंतर मी माझ्या सेक्रेटरीला सांगून ठेवलं आहे, ही असली पत्रे माझ्यापर्यंत पाठवूसुद्धा नकोस. त्याआधीच फाडून फेकून देत जा. त्यामुळेच आजकाल मला कमी पत्रे वाचावी लागतात.

०००

२६

# पुढची पिढीही अगदी व्यर्थ जाणार नाही

आजकाल जेव्हा मी लोकांशी बोलते तेव्हा मला त्यांच्याकडून आजकालच्या मुलांविषयी एकच तक्रार ऐकू येते, ती म्हणजे हल्लीची मुलं आमच्या बोलण्याला काही किंमतच देत नाहीत. ती उर्मट असतात. आणि त्यांचं वाचनही अगदी कमी असतं.

नुकतीच मी इजिप्तला भेटीसाठी गेले होते. मला त्या देशातील सर्वात जुना पिरॅमिड बघायचा होता. तो गिझा येथे नसून साक्कारा येथे आहे. कैरोपासून २४ किलोमीटर अंतरावर पारोह झोशेयरसाठी बांधलेला हा एक पाच पायऱ्यांचा पिरॅमिड आहे. त्याचा वास्तुशिल्पकार म्हणजे ईमेनटहॉटेप. हा त्या काळचा अत्यंत विद्वान माणूस.

मी प्रवासात बरोबर एक गाईड घेतला होता. त्याचा 'इजिप्टॉलॉजी' या विषयाचा सखोल अभ्यास होता. काही पिरॅमिडवर कोरलेले लेख तो वाचून दाखवत होता. काही लेखांकडे बोट दाखवून तो त्यांचं भाषांतर करून दाखवत होता. तो म्हणाला, "आपल्या पुढच्या पिढीची मुले अत्यंत उधळी असतील. ती फारसा विचार करणार नाहीत आणि आयुष्याविषयी त्यांना फारशी समज नसेल. त्यांचं भविष्य नक्की काय असेल ते काही आपल्याला माहीत नाही. फक्त सूर्यदेव 'रा' त्यांना वाचवू शकेल."

तो हे मला सांगत असताना माझ्या मनात वेगळेच विचार चालू होते. आज आपल्या देशातसुद्धा नव्या पिढीविषयी बोलताना हीच गाऱ्हाणी ऐकू येतात. प्रत्येक पिढी ही आपल्या नंतरच्या पिढीविषयी अगदी याच तक्रारी करत असते. हे सारं प्रत्येक पिढीत चालूच असतं. सर्व जगभर चालू असतं. निदान गेली पाच हजार वर्षं तरी चालूच आहे.

आमच्या पिढीच्या मानाने आजच्या मुलांना फार जास्त ज्ञान आहे व फार



कमी धीर आहे. अशीच एक दिवस मी माझ्या टीनएजर मुलाशी बोलत होते. मी त्याला सहजच म्हणाले, 'या शतकातील सर्वात महत्त्वपूर्ण असे तीन महत्त्वाचे शोध सांग पाहू.' त्यावर तो क्षणभर माझ्याकडे बघत राहिला व नंतर म्हणाला, "तू घरीपण शिक्षिकाच असल्यासारखी वागतेस. या शतकातील सर्वात महत्त्वाच्या संकल्पना माझ्या दृष्टीने जर कोणत्या असतील तर त्या म्हणजे अहिंसेचे तत्त्व, हिंसेमुळे घडून येणारा परिणाम आणि दळणवळणाच्या साधनांचा परिणाम."

त्याचे उत्तर ऐकून मी स्तिमित झाले.

तो म्हणाला, "मी तुला स्पष्ट करून सांगतो." मी त्याच्या उत्तरामुळे बुचकळ्यात पडल्याचं त्याच्या लक्षात आलं होतं. "भारत जेव्हा शतकानुशके गुलामगिरीत होता, जेव्हा आपल्यात निर्णय घेण्याची शक्ती नव्हती, तेव्हा एका लहानशा माणसाने एक वेगळी रक्तपातविरहित चळवळ सुरू केली. शस्त्रास्त्रे नाहीत, पैसा नाही, पण राज्यकर्त्यांना केवळ एक संदेश - 'आम्ही तुमच्याशी सहकार्य करणार नाही. मग काय व्हायचं असेल, ते होऊ दे.' या नवीन विचारधारेमुळे त्यांनी भारताला स्वातंत्र्य मिळवून दिले. खरं म्हणजे शांततेसाठी देण्यात येणारे नोबेल प्राईझ त्यांना द्यायला हवे होते. तो माणूस म्हणजे मोहनदास करमचंद गांधी, राष्ट्रपिता. त्यांच्या क्रांतिकारी कल्पनांनी मार्टिन ल्यूथर किंग ज्युनियर, नेल्सन मंडेला, अनुग सॅन सू की अशा कितीक नेत्यांना प्रेरित केले व त्यांनी आपापल्या देशांना स्वातंत्र्य मिळवून दिले.

"दुसरी कल्पनासुद्धा साधारण याच कालखंडातील, पण बरोबर यांच्या विरुद्ध दिशेने चाललेली आहे. या माणसाने विदेशाच्या संकल्पनेवर विश्वास ठेवला. आपण शस्त्रास्त्रे व हिंसेचा वापर करून लोकांवर राज्य करू शकू असे त्याला वाटले. त्याने चिलटांप्रमाणे माणसांना मारून टाकले. प्रेम, दया या शब्दांचा अर्थच त्याला कधी उमगला नाही. आपल्या या मार्गाने तो शांती कधीच प्रस्थापित करू शकला नाही व दुसऱ्या महायुद्धाला तोच कारणीभूत झाला. त्याच्यामुळे, त्याच्या धोरणांमुळे कोट्यवधी लोकांना यातना भोगाव्या लागल्या. त्याचे संपूर्ण आयुष्य म्हणजे युद्ध, असहिष्णुता व पूर्वग्रह यांचे उत्तम उदाहरण आहे. तो म्हणजे अ‍ॅडॉल्फ हिटलर."

मला माझ्या मुलाच्या बोलण्यात तथ्य वाटले. परंतु माझ्या मते मात्र या शतकातील सर्वात महत्त्वपूर्ण शोध म्हणजे कॉम्प्युटर आहे. माझ्या मुलाला ते पटले नाही.

"आज प्रसारमाध्यमांमुळे सर्व जग आकुंचित होऊन जवळ आले आहे.

जगभरात कुठे काय चाललंय हे आपल्याला क्षणार्धात समजू शकतं. टेलिव्हिजन आणि इंटरनेट हे त्याचेच भाग आहेत. त्यांच्यामुळेच दळणवळणाचा खर्च एकदम कमी झाला आहे व सर्व अडसर हळूहळू निघत चालले आहेत. याचा परिणाम उद्योगक्षेत्रात तसेच आपल्या सामाजिक जीवनातसुद्धा दिसून येतो. याचा अर्थ असा नव्हे की आपली सर्व जुनी संस्कृती हरवत चालली आहे. मी असं म्हणेन, की आपल्याला इतर संस्कृतींचीही ओळख होते आहे.''

माझ्या या छोट्या मुलाच्या तोंडचे हे शब्द ऐकून मी चकित झाले. याला बोटात पेन्सिल कशी धरायची ते मी शिकवलं होतं. आणि आता हिंसा, शांती दळणवळण अशा मोठमोठ्या विषयांवर हा एखाद्या प्रौढासारखा बोलत होता.

मला खात्री आहे, अनेक पालकांना कधी ना कधी हे असं वाटतच असेल. आपली लहानशी मुलं आपल्यापेक्षा हुशार आणि शहाणी झाल्याचा अनुभव त्यांना येत असेल. आपले जुने धर्मग्रंथ सांगतात, ''जो ज्ञानसंपन्न आहे, त्याचा नेहमीच आदर करावा. मग त्याचं वय, लिंग व जात कोणतीही असो.''

माझ्या मुलाची परदेशी जाऊन शिक्षण घेण्याची इच्छा आहे व माझ्या या छोट्याशा मुलाला ते कसं काय जमणार, अशी भीती मला वाटायची. पण आमचं हे बोलणं झाल्यानंतर मला कळून चुकलं, या पाखराचे पंख चांगले शक्तिशाली झाले आहेत. आता त्यानं आपली आपण झेप घेऊन आसमंतात विहार करण्याची वेळ आली आहे.

ooo



# २७

# सकारात्मक दृष्टिकोन - सुखाची पहिली पायरी

माझ्या आईकडे गिरिजा नावाची बाई स्वयंपाकाला होती. ती खूप गरीब घरची होती. आपल्या खाजगी आयुष्याबद्दल ती कधी एक चकार शब्दही काढत नसे. ती नेहमी हसतमुख असे. अंगावर नीटनेटकी सुती साडी, डोक्यात फुले माळलेली, ती चांगली चुणचुणीत होती. समाधानी होती. स्वयंपाकघरात काम करत असताना गाणी गुणगुणण्याची तिला सवय होती. आमच्या सर्व मागण्या ती अगदी हसतमुखाने पुरवायची. तिला मी दुःखी चेहऱ्यानं कुरकुर करताना पाहिलं नाही.

तिच्याविषयी आम्हांला फक्त एकच गोष्ट माहीत होती. ती म्हणजे तिच्या नवऱ्यानं तिला आणि त्यांच्या मुलाला टाकलं होतं. शिक्षण नाही, काही नाही. लहान गावात दुसरं काय करणार ती ? म्हणून तिनं हे स्वयंपाकाचं काम धरलं होतं.

आमच्या ओळखीचा एक वसंत म्हणून गृहस्थ होता. मित्रच होता तो. घरी कायम जाणंयेणं असे. तो एका मोठ्या आंतरराष्ट्रीय कंपनीत वरिष्ठ अधिकारी होता. नेहमी कशा ना कशाविषयी तक्रार करत राहण्याचा त्याचा स्वभाव. तो कधीही आमच्याकडे आला, की आमच्या घरचं वातावरणच बिघडून जायचं.

''माझा मुलगा १२वीत आहे, पण काही अभ्यास करत नाही,'' तो एकदा तक्रारीच्या सुरात म्हणाला.

त्याचा मुलगा खरं म्हणजे खूप हुशार होता, मेहनती होता, हे मलाही माहीत होतं. मग त्याचे वडील कशाबद्दल तक्रार करत असावेत ?

''मला माझ्या मुलाला आय्.आय्.टी.त घालायचंय.''

भारतातील प्रतिष्ठित म्हणून गणल्या गेलेल्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी संस्थेत प्रवेश मिळवण्यासाठी देशभरातून अक्षरशः लाखा मुले प्रयत्न करत असतात. एखाद्या मुलावर परीक्षेच्या वेळी अतिरिक्त मानसिक ताण आला व त्यामुळे त्याचे पाच मार्क जरी कमी झाले तरी गुणवत्ता यादीत त्याचा क्रमांक

त्यामुळे कितीतरी खाली जाऊ शकतो. आपण आपल्या मुलांना चांगला अभ्यास करण्यास जरूर सांगावे. पण त्याने इतरांच्या पुढे जावे, त्यांच्याहून जास्त गुण मिळवावे म्हणून काही आपण त्यांच्यावर दडपण आणणे योग्य नव्हे.

असाच हा वसंत पुन्हा एकदा आमच्या घरी आला. या वेळी त्याच्या तक्रारीचे कारण वेगळेच होते. "पाच वर्षांपूर्वी मी जमीन विकत घेतली. आणि आता ती मी विकायची म्हणतोय, तर त्याला फारच कमी किंमत मिळते आहे," तो तक्रार करत म्हणाला. "बाजारात मंदी आली आहे. मी जमिनीत पैसा गुंतवायला गेलो, पण सगळंच मुसळ केरात."

आता बाजारात मंदी येणं तर देशभरात सर्वत्रच घडलं होतं. मंदीची लाटच चालू असल्यामुळे ज्यांनी ज्यांनी या बाजारपेठेत पैसे गुंतवले होते त्या सर्वांचेच नुकसान झाले होते. तो एकटाच काही अपवाद नव्हता. पण त्याने आव तर असा काही आणला होता, की जणू काही या मंदीच्या लाटेमुळे तो एकटाच भरडला गेला होता, त्याचं एकट्याचंच नुकसान झालं होतं.

परत काही दिवसांनी वसंत भेटीला आला. तो अगदी दमलेला दिसत होता. "बंगलोर काही आता पूर्वीसारखं राहिलं नाही." तो कुरकुरत म्हणाला. "वीस वर्षांपूर्वी उन्हाळ्यातसुद्धा इथे थंड हवेच्या ठिकाणासारखी सुंदर हवा असे. आज मात्र आपल्याला एअरकंडिशनर्स बसवून घ्यावे लागतात नाही तर थंड हवेच्या ठिकाणी जावं लागतं."

आता सगळ्या पृथ्वीचंच तापमान वाढत चाललं आहे. बंगलोर त्याला अपवाद कसं असेल. पण तरीही आमचा हा मित्र तक्रार करणारच.

असंच एक दिवस घरात गिरिजा आणि मी अशा दोघीच असताना, मी तिला विचारलं, "गिरिजा, तुझा नवरा कुठे आहे ग ? कधी भेटतेस का तू त्याला ?"

त्यावर ती शांतपणे थोडा वेळ माझ्याकडे बघत राहिली आणि नंतर म्हणाली, "त्याने दुसरी बाई ठेवली आहे. तो तुमच्या शेजाऱ्यांकडे ड्रायव्हर म्हणून कामाला आहे."

मला ते ऐकल्यावर धक्काच बसला. ती आपल्या नवऱ्याला रोज बघत होती, व तेही दुसऱ्या बाईबरोबर !

"मग तुला त्याचा राग नाही येत ?''' मी विचारलं.

"सुरुवातीला यायचा. पण आता मी विचार करते, मी तर नशिबवान आहे. मला फक्त एकाच मुलाला वाढवून लहानाचं मोठं करायचंय. माझा मुलगा हुशार आहे, आज्ञाधारक आहे. त्याच्या वडिलांनी आम्हांला टाकलं त्यामुळे त्याला माझी जास्त काळजी आहे. समजा जर मी एकटीच असते, किंवा मला जास्त मुले असती किंवा माझं मूल जर बेजबाबदार असतं तर, मला किती अडचणी आल्या असत्या. देवाने माझ्यावर ती एक मेहरबानी केली आहे. माझ्यापुढे निदान असले तरी प्रश्न नाहीत."

"तुला तुझ्या भविष्याची काळजी नाही वाटत ?"

"मी काळजी कशासाठी करू ? आणि काळजी करून कधी कुणाचे प्रश्न सुटतात का ? तुमच्या आईंनी आम्हांला राहायला आऊट हाऊस दिलं आहे. मी प्रामाणिकपणे काम करते. तुम्ही सगळे त्यामुळे खुश आहात. मला कधीही कसली गरज पडली, तर मी तुमच्याकडे मदत मागू शकतेच ना. आणि तसंच बघायला गेलं, तर गरजा या कधी संपतच नाहीत. पण माझा मुलगा जेव्हा मोठा होईल, तेव्हा तो आपल्या बापासारखा वागणार नाही. कारण त्याने मला त्रास सोसताना पाहिलंय. अम्मा, मी फारशी शाळा शिकलेली नाही, पण आयुष्यानं मला एक गोष्ट शिकवली आहे. आयुष्याकडे बघताना नेहमी सकारात्मक दृष्टी ठेवूनच बघायचं. म्हणजे आपल्यालाही बरं वाटतं, आणि आपल्याभोवती असणाऱ्या लोकांनाही."

तिचे ते शब्द ऐकताच मला वसंताची आठवण झाली आपल्याकडे जी गोष्ट नाही, त्याचाच सतत विचार करून त्यानं आपलं आयुष्य दु:खी बनवून टाकलं होतं. आणि एकीकडे ही अशिक्षित स्त्री गिरिजा, प्रत्येक संकटाकडे सकारात्मक दृष्टीनं बघण्यास शिकली होती आणि आयुष्याचा आनंद घेत होती.

नुकतीच मी हार्वर्ड मॅनेजमेंट स्कूलमध्ये बिझिनेस मॅनेजमेंटचा कोर्स करण्यासाठी गेले होते. त्यांनी तिथे आम्हांला एक सर्वात महत्त्वाचा धडा शिकवला, तो म्हणजे "तुम्हांला जर सुखी व्हायचं असेल तर तुम्ही ते आपलं आपणच शिकाल व आत्मसात कराल."

हीच गोष्ट गिरिजा शिकली होती व तिने ती प्रत्यक्षातही उतरवली होती, कोणताही मॅनेजमेंट्चा कोर्स न करताच !

○○○

# २८

# ज्योत से ज्योत जगाते चलो...

एकदा मी माझ्या वडिलांबरोबर कर्नाटकाच्या अंतर्भागात, खेडोपाड्यांमधे प्रवासाला गेले होते. आम्ही महाराष्ट्राच्या सीमा भागावरील प्रदेशात पोचलो. माझे वडील हे एक डॉक्टर आणि निवृत्त प्रोफेसर होते. ते माझ्या कामात मला मार्गदर्शन करत आणि माझ्या प्रवासातही मला साथ देत.

असेच आम्ही एका खेड्यात गेलो होतो. तिथे एका देवीचं देऊळ होतं. तो शुक्रवार होता. भारतातील स्त्रिया शुक्रवारचा दिवस शुभ मानतात, त्यामुळे तिथे अनेक स्त्रिया देवीसाठी फळे, फुले वगैरे घेऊन आल्या होत्या. तिथे भलीमोठी रांग होती, पण मी काही त्या रांगेत उभी नव्हते.

त्या भागातील परित्यक्ता स्त्रियांचा अभ्यास करण्यासाठी मी आले असल्याने मी लोकांशी बोलत जरा लांब उभी होते. तिथे फळवाले, कासार आणि इतर विक्रेते होते. रस्त्यावर विक्रीसाठी उभे राहणाऱ्या या अशा लोकांकडून मला नेहमीच खूप काही शिकायला मिळतं. त्यांनी जातिभेदाचं कटू सत्य झेललेलं असतं. पैसा, राजकारण, जुन्यापुराण्या समजुती आणि खूप काही पाहिलेलं असतं. गरिबीवरील पी.एच.डी.चे प्रबंध वाचून आणि चर्चासत्रांना उपस्थिती लावून जेवढं ज्ञान मिळणार नाही, तेवढं ज्ञान मला या लोकांकडून मिळालेलं आहे. माझं हे मत अनेकांना पूर्वग्रहदूषित वाटेल. पण ते खरं आहे.

एकदा मी एका निवृत्त झालेल्या 'घरवाली' (वेश्या)ला भेटले. तिच्यासोबत एक सोळा वर्षांची देखणी मुलगी होती. लांबसडक केस, सुंदर चेहरा, भावपूर्ण डोळे आणि नितळ त्वचा. तिच्या चेहऱ्यावरच्या निरागसपणामुळे तिचं ते सौंदर्य अधिकच खुललं होतं. तिने हिरवी साडी नेसली होती. हातात हिरवा चुडा होता आणि डोक्यात मोगऱ्याचा भरगच्च गजरा. ती वृद्ध स्त्री आपण त्या मुलीची मावशी असल्याचा दावा करत होती. मी जरी त्या मावशीशी बोलत असले तरी माझी नजर



मात्र त्या मुलीवरच खिळून होती. बोलता बोलता मला समजलं, की ती तरुण मुलगी नुकतीच देवदासी झालेली होती. खरं तर स्त्रियांना देवदासी बनवण्यास आता कायद्यानं बंदी आहे, पण या देशात बेकायदेशीर रीत्या कितीतरी गोष्टी घडत असतात.

मी त्या मावशीकडे पाहिलं. तीही देवदासीच होती. तिच्या अंगाला उग्र असा दर्प येत होता आणि तंबाखू खाऊन तिच्या दातांवर काळे डाग पडले होते. तिच्या चेहऱ्यावर एक कठोर आणि अधाशी भाव होता. तिने रेशमी साडी नेसली होती; सोन्याच्या बांगड्या व गळ्यात सोन्याचा नेकलेसही घातला होता. पण अंगावर कितीही सोन्याचे दागिने घातले तरी ती सुंदर दिसणं शक्यच नव्हतं.

त्या म्हाताऱ्या मावशीसाठी लवकरच ती तरुण मुलगी सोन्याची खाण बनली असती. अजून तीस वर्षांनी ही सोळा वर्षांची कोवळी मुलगीसुद्धा अशीच, या मावशीसारखीच होईल, असं माझ्या मनात आलं. मग हीसुद्धा एखाद्या १६ वर्षांच्या निष्पाप मुलीला पकडेल. तिला देवदासी बनवेल आणि उतार वयात आपल्या उपजीविकेचं साधन म्हणून तिचा वापर करेल. आपलं पुढे काय होणार आहे याची त्या बिचाऱ्या मुलीला आता कल्पनासुद्धा नसेल.

नकळत माझे डोळे पाण्याने भरले आणि मला हुंदक्यांवर हुंदके येऊ लागले. आजूबाजूचे लोक माझ्याकडे वळून बघू लागले. या बाईंना काय झालं तरी काय - अशा आश्चर्याने ! माझं काहीतरी हरवलं असावं, असं त्यांना वाटलं असेल. आयुष्यात पहिल्यांदाच माझ्या तोंडून शब्द फुटेना.

पण मला कोणत्या गोष्टीचा त्रास होतोय, हे माझ्या वडिलांनी ताबडतोब जाणलं. ते म्हणाले, ''या शतकानुशतकं चालत आलेल्या समस्या नुसत्या टिपं गाळून सुटणार नाहीत. तू काही प्रत्येक व्यक्तीचं आयुष्य बदलू शकणार नाहीस. पण तुझ्या संपूर्ण आयुष्यात मिळून तू निदान अशा दहा स्त्रियांचं पुनर्वसन करू शकलीस, तरी मला तुझा खूप अभिमान वाटेल. ज्या मुलीने दहा असहाय्य स्त्रियांचं आयुष्य बदलून टाकलं, अशा मुलीला मी जन्म दिला, याचा मला निश्चित अभिमान वाटेल.''

प्रत्येकाने आपली क्षमता आणि ताकद ओळखली पाहिजे. त्याचप्रमाणे प्रत्येकाने आपल्या स्वत:च्या मर्यादासुद्धा जाणल्या पाहिजेत. आपल्या स्वत:च्या अंगी असलेल्या कमकुवतपणाची जाणीव होऊन आपले दोष ओळखणं हे आपली शक्तिस्थाने ओळखण्यापेक्षाही जास्त महत्त्वाचं आहे. आभाळाला गवसणी घालण्याची स्वप्ने बघू नयेत. त्यापेक्षा आपले पाय जमिनीवर घट्ट रोवून उभ राहावं व आपल्याभोवती

काम करत राहावं. अवतीभवती खूप अंध:कार आहे, दु:ख आहेत. पण त्या अंधारात राहण्यापेक्षा एखादी मेणबत्ती लावता आली, तर ते कितीतरी चांगलं. जेवढ्या मेणबत्त्या लावता येतील, तेवढ्या लावण्याचा प्रयत्न करणं खरं महत्त्वाचं !

OOO



२९

# यल्लम्मा - एक सक्षम मनाची स्त्री

पाऊस लागून राहिला होता. कुणातरी नेत्याचे निधन झाले होते. सर्व शाळा -कॉलेजांना त्याबद्दल सुटी देण्यात आली होती. कोणाही राष्ट्रीय नेत्याचे निधन झाले, की ताबडतोब शैक्षणिक संस्थांना सुटी का जाहीर करण्यात येते, ते मला कधीच समजलेलं नाही. ज्या व्यक्तीचा मृत्यू झालेला आहे, ती व्यक्ती जर फार जवळची असेल तर माणूस अश्रू ढाळेल किंवा फार फार तर कुटुंबीयांच्या भेटीसाठी, समाचारासाठी जाईल. पण शाळांना सुटी देणं म्हणजे पर्यायानं मुलांना रस्त्यावर खेळायला मोकाट सोडणं. मग मुलं सिनेमाला जातात, दुकानात जातात नाही तर कँटीनमध्ये बसून वेळ वाया घालवतात. अशा प्रकारे वर्षाचा शेवट उजाडतो तेव्हा अजून कितीतरी अभ्यासक्रम शिकवून पूर्ण करायचा राहिलेला असतो, त्यामुळे शिक्षक वर्गात अक्षरश: भराभरा शिकवून सोडतात. शेवटी त्यात नुकसान कोणाचं होतं ? विद्यार्थ्यांचंच.

नलिनी बंगलोरमधील एका कॉलेजात प्राध्यापिका आहे. तिने इतिहासात पी.एच्.डी. केले आहे. ती उत्कृष्ट शिक्षिका व तितकीच उत्तम गृहिणीसुद्धा आहे. तिची आणि माझी बऱ्याच दिवसांत गाठ झालेली नव्हती. त्यामुळे मी तिच्या घरी जायचं ठरवलं. मला पाहून तिला खरोखरच खूप आनंद झाला. तिचा मुलगा शाळेतून नुकताच घरी आला होता म्हणून ती खास त्याच्या आवडीचा स्वयंपाक करत होती. तिचा मुलगा बारावीच्या परीक्षेची तयारी करण्यात मग्न झाला. तिचा पती सतीश हा इंजिनीअर होता व तो ऑफिसात गेला होता. त्यामुळे आम्हांला दोघींना गप्पा मारायला भरपूर वेळ होता.

"बऱ्याच दिवसांत कुठे दिसली नाहीस, नलिनी. सध्या काय नवीन चाललंय ?"

"काही नाही. समीरची बारावी आहे ना, त्यातच गुंतले आहे."

"उगाच काय, नलिनी ? बारावीचा अभ्यास तू तर नाही ना करत आहेस ?

तू घरी राहून त्याला मदत करतेस वगैरे ठीक आहे. पण त्याचा अर्थ स्वत:ला जगापासून तोडून टाकायचं का ?''

नलिनीला माझं बोलणं पटलं नसावं. ती बऱ्याच मानसिक ताणाखाली दिसत होती, काळजीत होती.

''नलिनी, काय झालं ? काही अडचण आहे का ? तुमच्या घराचं बांधकाम पूर्ण झालं का ?''

''ते सगळं सतीश बघतो.''

''तुम्ही नवी गाडी घेणार होतात ना... त्याचं काय झालं ?''

''हो. सतीशच्या मते गाडीपेक्षा स्कूटरच घेतलेली बरी.''

या घरात सगळे निर्णय सतीशच घेत असावा, हे माझ्या लक्षात आलं.

''नलिनी, तुला काही स्वत:ची आवडनिवड नाही का ?''

''सतीश सर्वच बाबतींत माझ्याहून हुशार आहे. तो बाहेरच्या जगात वावरतो, त्याच्या खूप ओळखी आहेत. तेव्हा त्याचे निर्णय हे नेहमीच बरोबर असतात.''

तिचं ते उत्तर ऐकून मला धक्काच बसला. साधारणपणे नोकरी करणाऱ्या स्त्रिया या जास्त धीट असतात. त्यांच्यात आत्मविश्वास असतो. त्या स्वतंत्र असतात व स्वत:चे निर्णय स्वत: घेण्याची त्यांची इच्छा असते.

दुसऱ्याच दिवशी मी बसने एका खेड्यात निघाले होते. कधी नव्हे ती बस रिकामीच होती. माझ्याबरोबरच यल्लम्मा नावाची एक खेडूत स्त्री बसमध्ये चढली. ती माझ्या चांगली ओळखीची होती, कारण मी जेव्हा कधी त्यांच्या गावी जाई, त्या वेळी ती मला ताजी भाजी आणून द्यायची आणि त्याचे पैसेपण घ्यायची नाही.

यल्लम्मा पस्तिशीची होती. चांगली खणखणीत तब्येतीची आणि आनंदी वृत्तीची. तिने केसांना भरपूर तेल लावून चापून अंबाडा घातला होता. गळ्यात जाडजूड काळ्या पोतीचं मंगळसूत्र होतं. कानांत सोन्याची कर्णफुले, नाकात चमकी आणि प्रत्येक हातात चांगल्या डझनभर हिरव्या बांगड्या घातल्या होत्या. चेहऱ्यावर मात्र रंगरंगोटीचा लवलेशही नाही, कोणताच कृत्रिमपणा नाही. तिच्या तांबूस चेहऱ्यावर भरभरून हसू होतं व त्यामुळेच तो चेहरा नुसता चमकत होता.

यल्लम्मा व तिच्या नवऱ्याचा गावात छोटासा मळा होता. तीच त्यांची दौलत. ते तिथे मोसमी भाज्या उगवून आपला चरितार्थ चालवत.

''अम्मा, आज मला जरा घाईनं मळ्याकडे जायला हवं,'' ती म्हणाली.

''का बरं ? इतकी घाई कसली ? तुझा नवरा नाही का गेला मळ्यावर ?''

''हो, गेलाय ना. पण आज एक महत्त्वाचा निर्णय घ्यायचाय ना. पुढच्या



तीन महिन्यांसाठी उत्तम बियाणं कोणतं ते निवडून पेरायचंय मला.''

''पण तुझा नवरा रुद्राप्पा करेल की ते काम,'' मी म्हणाले.

''तसं नाही. माझे निर्णय मलाच घ्यायला हवेत. रुद्राप्पा पण चांगला अनुभवी आहे. पण मलाही त्यात लक्ष घालायलाच हवं ना. कारण सगळ्या प्रकारचं बी-बियाणं पावसाळ्यात लावून चालत नाही.''

तिचा तो आत्मविश्वास मला आवडला.

''सुरुवातीला मी जर काही मत दिलं, तर आमच्या घरचे लोक मला हसायचे. मग पुढे माझ्याच लक्षात आलं. जर मीच माझ्या मताचा आग्रह धरला नाही, तर ते मला कोणत्याही गोष्टीचा निर्णयच घेऊन देणार नाहीत. आणि मी जर निर्णय नाही घेतला, तर मी शिकणार कधी ? त्यामुळे मग मीच बागेच्या एका कोपऱ्यात वेगवेगळ्या प्रकारच्या भाज्या लावून बघायला सुरुवात केली. माझी सासू व नवरा या दोघांनाही ते समजलं नाही. पहिल्यांदा काही खेपेला मलासुद्धा नाही जमलं नीट. पण तरीही मी त्याचा पाठपुरावा केला. मग हळूहळू कोणती भाजी कोणत्या मोसमात उगवायची ते लक्षात आलं. आता मात्र ते मला विचारतात, माझं म्हणणं ऐकतात. या वर्षी मी गाजरं आणि कॉलीफ्लॉवर लावणार आहे. त्याचं पीक नक्की चांगलं येईल आणि भरपूर पैसा मिळेल अशी माझी तर खात्रीच आहे.''

ही यल्लम्मा सुशिक्षित नव्हती. प्रशिक्षित नव्हती, पण तरीही नलिनीपेक्षा किती वेगळी होती ती !

ooo

## ३०

# द आय् टी डिव्हाईड

आपल्या एखाद्या मैत्रिणीला बरं नसलं, तर तिला जाऊन भेटणं चांगलं. तिलाही तेवढाच वातावरणात बदल. आपण भेटल्यावर तिला आनंद होतो आणि तब्येतीतही थोडी सुधारणा होते. अशा वेळी बरोबर फुलं, फळं वगैरे घेऊन जाणं चांगलं.

माझी मैत्रीण स्वप्ना गेले तीन आठवडे आजारी होती. पण मला ते नुकतंच कळलं. एक दिवस ऑफिस संपल्यावर मी तिला भेटायला जायचं ठरवलं. दुपार उलटून गेली होती. तिला थोडी फुलं, फळं वगैरे घेऊन जायचं माझ्या मनात होतं. पण ती कुठे मिळणार ? नेहमी माझी आई आणि बहीणच बाजारहाट करतात.

मी माझा असिस्टंट रमेश याला बोलावून चांगली फळं, फुलं वगैरे कुठे मिळतील, ते विचारलं. त्याच्या माहितीचं एक दुकान होतं. ते स्वप्नाच्या घराच्या वाटेवरच होतं. तिथे थांबून खरेदी करायचं मी ठरवलं.

दुपारचा खूप उकाडा होता. मी घामाने चिंब भिजले होते. अंगावरची सुती साडी चुरगळलेली होती. पण जवळच्या मैत्रिणीला भेटायला जायचं म्हणून फळं व फुलं आपण निवडावी, रमेशला ते काम सांगू नये, असं मी ठरवलं.

शॉपिंग कॉम्प्लेक्सपाशी आलो तर आईसक्रीमच्या दुकानाजवळ भरपूर गर्दी होती. इकडेतिकडे उड्या मारणारी मुले, त्यांच्या सचिंत चेहऱ्याने चालणाऱ्या आया. सुटीचे दिवस होते, त्यामुळे मुलं आईच्या धमकावण्यांना मुळीच न जुमानता चालली होती. माझी मुलंही असंच तर करायची. त्यांचं बालपण आता संपलं, या गोष्टीचं मला वाईट वाटलं. पण अजूनही त्या आठवणी मनात ताज्या आहेत.

मी आत्ता ज्या दुकानासमोर उभी होते, त्यात फुलं व फळं असं दोन्ही विक्रीसाठी ठेवलं होतं. रंगीबेरंगी सुगंधी फुलं इतकी नेटकेपणे मांडून ठेवली होती, की नजर त्यांवरून हलत नव्हती. सुगंधी वासाची पांढरी रंजनीगंधा, चमकदार लाल



गुलाब, अर्धोन्मीलित ग्लॅडीओलाय् आणि इतर कितीतरी प्रकारची फुलं होती. कोणीतरी नुकतीच बागेतून तोडून आणली होती ती. दुकानदार त्यांच्या फांद्या व्यवस्थित कापून नीट पाण्यात घालून ठेवत होता.

दुकानाच्या दुसऱ्या भागात हारीने फळं मांडून ठेवली होती. : मुंबईहून आलेले आंबे, विजापूरची द्राक्षे, अलाहाबादचे पेरू, नागपूरची संत्री.

ती सगळीच फळं इतकी ताजी दिसत होती, की काय घ्यावं, याचा संभ्रम मला पडला. मी दुकानदाराला गुलाबाच्या टपोऱ्या कळ्यांच्या गुच्छाची किंमत विचारली. त्या पुरत्या उमलल्या नव्हत्या, त्यामुळे अधिकच सुंदर दिसत होत्या, दुकानदाराने माझा प्रश्न ऐकून न ऐकल्यासारखं केलं. मी परत तोच प्रश्न विचारला.

या खेपेला त्यानं तुसडेपणानं सांगितलं, "साडेतीन रुपयांना एक. गुच्छात वीस गुलाब आहेत — त्याचे सत्तर रुपये होतील."

मला धक्का बसला. माझी स्थिती रिप व्हॅन विंकलसारखी झाली होती. सध्याच्या बाजारभावांची मला काही कल्पना नव्हती. माझ्या आठवणीत अजूनही सगळे जुनेच दर असल्याने मला प्रत्येक गोष्ट महाग वाटायची. इथे आंब्यांचाही भाव विचारावा, असं माझ्या मनात आलं. मग मी त्याला डझनाचा भाव विचारला.

तो तुसडेपणानं परत म्हणाला, "दीडशे रुपये डझन. मग आपल्या शेजारी उभ्या असलेल्या मित्राकडे वळून तमीळ भाषेत उपहासाने म्हणाला, "या लोकांना परवडत तर काही नाही, पण येतात किंमती विचारायला. या असल्या लोकांच्या चौकशांना उत्तरं द्यायचासुद्धा मला कंटाळा येतो. ज्या लोकांना खरोखर घ्यायचंय, त्यांनी किंमत विचारूच नये !" त्याला वाटलं मला तमीळ काय समजतंय ?

एव्हाना रमेशनं आपली इतर खरेदी संपवली होती व तो फुलांच्या दुकानात येऊन पोचला होता. रमेश मुळातच स्मार्ट आहे. त्याचे कपडेही झकपक असतात. आज त्याच्या अंगात कंपनीचा लोगो असलेला टी शर्ट होता. शिवाय गळ्यात कंपनीचं एम्प्लॉयी कार्डगण लटकत होतं. त्यानं परत फुलांची व फळांची किंमत विचारली.

त्याच्या अँगातील कपड्यांकडे बघत दुकानदार अदबीने म्हणाला, "सर, फुलांचा गुच्छ १०० रुपयांना आहे. फक्त पाच रुपये एका फुलाला. खरं तर त्याची किंमत १५० रु. आहे, पण तुम्हाला म्हणून १०० रु.ना देऊ. आणि हे आंबे बघा. फक्त २०० रुपये डझन."

त्यावर रमेश काही बोलला नाही. पण मला मात्र राहवेना.

"तुम्ही अशी कशी किंमत सांगता त्यांना ?" दोन मिनिटांपूर्वी तुम्ही मला

म्हणालात गुलाबाचा गुच्छ ७० रुपये आणि आंबे १५० रुपये डझन. तुम्ही असं कसं करू शकता ?''

त्यावर तो दुकानदार अतिशय चिडला. ''तुम्हाला जर घ्यायला परवडत नसेल, तर गप्प बसा ना. हे साहेब एका मोठ्या कंपनीत कामाला आहेत. त्यांचा बॅज आणि कंपनीचा शर्ट पाहा जरा. ते सॉफ्टवेअर कंपनीत आहेत. त्यांना आमच्या किंमती परवडतात. ते लोक उगीच घासाघीस करत नाहीत. तुमच्यासारखे लोक म्हणजे फुकटची डोकेदुखी.''

रमेशनं उत्तर द्यायला तोंड उघडलं, पण मीच त्याला थांबवलं. मला आता या सर्व प्रकरणात अत्यंत रस निर्माण झाला होता. मी रिअल इस्टेट ब्रोकर्स, मॅरेज ब्रोकर्स, घरमालक, जॉब कन्सल्टन्टस अशा अनेक लोकांना आमच्या इन्फोसिस कंपनीचं वर्णनं 'सॉफ्टवेअर कंपनी' किंवा 'आय्. टी. कंपनी' असं करताना ऐकलं आहे. पण हे आता जे काय चाललं होतं, ते माझ्या कल्पनेपलीकडचंच होतं.

''काय हो, आय.टी. कंपनीत काम करणाऱ्या लोकांसाठी सगळ्या वस्तूंचे दर वेगळे असतात का ? आम्हां सामान्य लोकांपेक्षा त्यांना जास्त भावानं माल विकता का ?'' मी विचारलं.

''होय. मी मंगलोरचा आहे. मी स्वत: डोळ्यानं पाहिलंय. एखादा माणूस जर आय.टी.च्या कंपनीत नोकरीला असेल, तर लगेच त्याचा हुंडासुद्धा कमीत कमी दोन लाखांनी वाढतो. मग मी माझ्या मालाचा दर फक्त पन्नास रुपयांनी वाढवला, तर बिघडलं कुठे ?''

कारमध्ये बसल्यावर माझ्या मनात विचारचक्र चालू झालं. ही दरी, आय्.टी. आणि बिगर आय्.टी. कामगारांसाठी दोन वेगळी धोरणं, हा वागण्यातला दुटप्पीपणा... रोजच्या आयुष्यातला...

OOO



# ३१

# इच्छा असेल तिथे मार्ग असतो...

काही दिवसांपूर्वी मला एका कॉलेजच्या सभागृहाचं उद्घाटन करण्यासाठी निमंत्रण आलं होतं. सभागृह फार मोठं नसलं तरी त्याचा आराखडा उत्तम होता. उद्घाटन झाल्यावर त्यांनी मला इकडेतिकडे फिरून सर्व काही दाखवलं. आश्चर्याची गोष्ट अशी की कुठे एक इंचभर जागाही मोकळी सोडलेली नव्हती. सर्व भिंतीवर ग्रॅनाईटच्या फरशा बसवल्या होत्या. प्रत्येक फरशीवर देणगीदाराचे नाव कोरलेले होते. त्याने दिलेल्या देणगीची रक्कम लिहिली होती. भिंती सगळ्या फोटोंनी भरलेल्या होत्या. ते दृश्य जरा विचित्रच दिसत होतं.

संयोजकांनी माझ्या चेहऱ्यावरचे भाव पाहिले आणि स्पष्टीकरण दिले, ''मॅडम, आम्ही देणगीदारांकडे मदतीसाठी आवाहन केले. फारच कमी लोक पुढे आले. मग आम्ही त्यावर खूप विचार केला. त्यानंतर जाहिरात केली, जो कोणी या सभागृहाच्या उभारणीसाठी एक हजारांच्या वर देणगी देईल, त्याचे नाव ग्रॅनाईटवर कोरण्यात येईल व जो कुणी ५००० रु. देणगी देईल त्याचा फोटो लावण्यात येईल.''

''पण मग जे लोक १०,०००हून जास्त देणगी देतील त्यांचं काय ?'' मी उत्सुकतेनं विचारलं.

''त्यांचं नाव स्वतंत्र संगमरवरी दगडावर कोरून सभागृहाच्या मुख्य प्रवेशद्वारापाशीच लावण्यात येईल.'' संयोजक म्हणाले, ''आमच्या अपेक्षेप्रमाणेच या उपक्रमासाठी आम्हांला पुरेसा निधी मिळाला. इतकंच काय, पण काही विक्षिप्त लोक तर असेसुद्धा निघाले, की आपले नाव चार वेळा कोरले जावे म्हणून त्यांनी एक एक हजाराची रक्कम चार वेळा दिली.''

ज्या माणसाने स्वत: कष्टाने जमवलेला पैसा चांगल्या कामासाठी देणगी म्हणून दिला असेल, त्याचे नाव लोकांच्या स्मरणात राहावे, ही गोष्ट खरीच आहे.

पण त्याचा इतका अतिरेक नसावा. मग माझ्या मनात एका अत्यंत थोर व्यक्तीविषयीचे विचार घोळू लागले. हा माणूस काळाच्या कितीतरी पुढे होता.

मरिअप्पा हा बंगलोरचा एक धनाढ्य व्यापारी. १९१४ साली त्याने मानवजातीसाठी कल्याणकारी काम सुरू केले. तो स्वतः सुशिक्षित नव्हता, पण त्याने कित्येक हुशार मुलांना शिक्षणासाठी मदत केली. तो अशा गरीब व गरजू मुलांना स्वतःच्या घरी जेवू घाली आणि त्यांची फीपण भरे.

१२ मार्च १९१४ रोजी त्याचं निधन झालं. पण त्याच्या एक आठवडा आधीच त्यानं आपलं मृत्युपत्र लिहून ठेवलं होतं. त्यात त्याने आपल्या पत्नीला तहहयात दरमहा साठ रुपयांचे निवृत्तीवेतन मिळावे अशी तजवीज करून ठेवली होती. त्या दोघांना मूलबाळ नव्हते. त्याने शहरातील चार देवालयांमधील पूजेचा खर्च उचलण्याची तसेच देवालयांना तेल पुरवण्याचीही व्यवस्था केली होती व अखेरीस त्याने म्हटले होते, "एकंदर ४५ गरीब हिंदू विद्यार्थ्यांची — त्यांत १५ लिंगायत, १५ ब्राह्मण व १५ इतर जातींचे हिंदू विद्यार्थी असावेत — बंगलोर शहरात मोफत निवास व भोजनाची व्यवस्था केली जावी."

मरिअप्पाच्या या मुलखावेगळ्या मृत्युपत्रामुळे त्याला बऱ्याच लोकांचा विरोध पत्करावा लागला असणार. त्याच्या खाजगी आयुष्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाही. जे थोर मानवतावादी असतात ते अबोल व लाजाळू असावेत. त्यांच्या कार्याचा जगभर बोलबाला व्हावा असं त्यांना वाटत नाही. उलट त्यांचं तर असं वाटतं की उजव्या हातानं जर दान दिलं तर ते डाव्या हातालासुद्धा कळता कामा नये.

एक फार सुरेख वचन आहे, 'माणसाने पुष्कळ धन मिळवले, पण सत्कार्यासाठी जर दानधर्म केला नाही तर तो वाईट मार्गाला लागेल.'

१ जुलै १९२१ रोजी चामराजपेट आय्. आय्. टी. मेन येथे मरिअप्पा हॉस्टेलचे उद्घाटन झाले. त्यात ४५ विविध जातींतील गरीब व गरजू विद्यार्थ्यांची सोय करण्यात आली होती. त्या हॉस्टेलच्या विश्वस्त मंडळावर शहरातील विख्यात अशा सहा विश्वस्तांची नेमणूक करण्यात आली होती.

मरिअप्पाच्या मालमत्तेची योग्य व्यवस्था लावण्यात सात वर्षे गेली. त्यातून जमा झालेली रक्कम पावणेदोन लाख रुपये होती. त्या काळात ती रक्कम अतिशय मोठी होती. त्यातील अर्ध्या रकमेचा विनियोग होस्टेलसाठी जमीन विकत घेऊन इमारतीची उभारणी करण्याच्या कामासाठी करण्यात आला. उरलेली रक्कम आपत्कालीन निधीच्या स्वरूपात नव्यानेच सुरू झालेल्या म्हैसूर बँकेत ठेवण्यात आली.



नुकताच त्यांनी बी. के. मरिअप्पा होस्टेलचा ऐंशींवा वर्धापनदिन तसेच त्या हॉस्टेलच्या संस्थापकाची एकशेविसावी जयंती साजरी केली. त्या थोर मानवतावाद्याच्या योगाने या वसतिगृहाच्या आधाराने शिकून मोठी होऊन कित्येक माणसे विविध क्षेत्रांत नावारूपास आली. या महात्म्याच्या या दातृत्वामुळेच ती माणसे हे यश मिळवू शकली, अन्यथा त्यांना आपलं शिक्षण पुरं करणंसुद्धा कठीण झालं असतं.

कृतज्ञता ही सुसंस्कृतपणाची सर्वोच्च पायरी आहे. पण हे संस्कार कोणत्याही विद्यापीठात शिकायला मिळत नाहीत किंवा पुस्तके वाचूनही मिळत नाहीत. लहान मुलांच्या मनावर अगदी बालपणी हे संस्कार बिंबवणे शक्य असते. ते काम घरी वडीलधारे तर शाळेत शिक्षक करू शकतात.

या मरिअप्पाला आधुनिक कर्ण का म्हणू नये ? आपल्या देशाला आज अशा अनेक व्यक्तींची गरज आहे.

ooo

## ३२

# प्रश्न आहे आत्मविश्वासाचा

चारू ही माझी एक विद्यार्थिनी. तिचा अभ्यासात नेहमीच वरचा क्रमांक असे. तिला एका बँकेत नोकरी लागली. एका इंजिनीअरशी तिचं लग्न झालं आणि दोघे आयुष्यात चांगले स्थिरस्थावर झाले. माझी आणि तिची क्वचित कधीतरी गाठभेट होई. सुरुवातीला ती उल्हसित व समाधानी दिसे, पण जसजसे दिवस जाऊ लागले तशी ती उदासवाणी दिसू लागली, जणू काही तिच्या हृदयावर मणामणाचं ओझं होतं.

एक दिवस चारू माझ्या ऑफिसात आली. तिला पाहून मला आश्चर्य वाटलं, कारण ती सकाळी येऊन माझ्या कामात व्यत्यय कधीच आणत नसे. मला पाहताच तिच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू ओघळू लागले, तेव्हाच मला समजलं, काहीतरी घडलंय.

"मॅडम," ती म्हणाली, "माझ्या पतीची निवड माझी मीच केली होती, त्यामुळे आपण आता सुखात राहू, असं मी समजून चालले होते."

पण तसं घडायचं नव्हतं. लग्नानंतर पहिले काही दिवस गोडीगुलाबीत, प्रेमात गेले. पण नंतर मात्र तिच्या सासूनं आणि नवऱ्यानं तिचा छळ करायला सुरुवात केली. बँकेची नोकरी करून घरी आलं की तिला ते घरकामाला जुंपत. आपला सर्वच्या सर्व पगार तिला आपल्या नवऱ्याच्या हवाली करावा लागत असे. तिला कधीही लहानसहान रकमेची अगदी दहा रुपयांचीसुद्धा गरज पडली, तरी त्यासाठी तिला आपल्या नवऱ्याकडे हात पसरावा लागे.

"आमचं लग्न माझ्या सासूबाईंच्या मर्जीविरुद्ध झालंय ना, त्यामुळे मी काहीही केलं तरी त्यांना ते चूकच वाटतं." चारू म्हणाली, "माझा नवरा सुरेश हा आधी आपल्या आईचा मुलगा आहे. माझा नवरा नंतर. ते दोघं जे काही सांगतील ते मुकाट्यानं, विनातक्रार मी करते. त्यांना खुष करण्याचा सारखा प्रयत्न करते.



पण तरीही ते कायम असमाधानीच."

अशा कोट्यावधी चारू आपल्या देशात आहेत. त्या सुशिक्षित असतात. त्यांना चांगली नोकरी असते पण एकदा का लग्न झालं की त्यांना या ना त्या कारणाने काही ना काही त्रास सहन करावा लागतो.

जर स्त्रियांना शिक्षण देण्याने त्या सक्षम बनतात असं मानलं जातं, तर मग इतक्या स्त्रियांवर अशी रडण्याची पाळी का बरं येत असावी ? जर आर्थिक स्वातंत्र्य हेच खरं स्वातंत्र्य असेल, तर मग या स्त्रिया एवढी दु:खे का भोगत आहेत ? हा प्रश्न मला नेहमीच बुचकळ्यात टाकत आलेला आहे. स्त्रीला आत्मविश्वास कशामुळे प्राप्त होईल ?

या सर्व स्त्रिया सर्वार्थानं अत्यंत सक्षम, सबल अशा महिला आहेत. मग जर अशाच स्त्रियांनी दु:खे भोगली, अश्रू ढाळले तर मग खेडोपाड्यांतील ज्या स्त्रिया खरोखरच अशिक्षित, आर्थिक दृष्ट्या परतंत्र आहेत व ज्यांना आपल्या आयुष्याच्या संदर्भातील एकही निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य नाही, स्वत:चे कपडे स्वत: निवडण्याचे किंवा स्वत:चा जोडीदार स्वत: निवडण्याचे स्वातंत्र्य नाही, अशा स्त्रियांचं काय होणार ?

एक अध्यापिका म्हणून मला असं वाटतं की शालेय, महाविद्यालयीन शिक्षणाबरोबरच विद्यार्थी-विद्यार्थिनींना जीवनविषयक काही तत्त्वे व नियम शिकवलेच पाहिजेत. अनेक वेळा माझ्या विद्यार्थिनी विवाह, पैसा, करियर या गोष्टींची चर्चा करत असतात. मुलींसाठी, विशेषत: आपल्या देशातल्या मुलींसाठी तर आत्मविश्वास या गुणाची आज फार गरज आहे. काहीही झालं तरी एखाद्या स्त्रीच्या जीवनाचं केवळ लग्न करणं, मुलांचा सांभाळ करणं हे एकमेव उद्दिष्ट काही असू शकत नाही. शिक्षणाने आपल्याला उत्तम नोकरी मिळू शकेल हे खरं आहे. पण त्याहूनही अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे माणसाला जीवनाला सामोरं जाता आलं पाहिजे, जीवनातील वास्तवाला सामोर जाता आलं पाहिजे आणि समाजाला समजून घेता आलं पाहिजे.

चारूने या प्रश्नावर मोकळेपणाने आपल्या नवऱ्याशी व सासूशी चर्चा करायला हवी होती. आपल्या न्याय्य हक्कांचा उच्चार करायला हवा होता. कोणत्याही कायमस्वरूपी नाते संबंधांमध्ये आपल्या मनातील गोष्टी खुलेपणानं बोलणं हे केव्हाही शहाणपणाचं असतं. आपण किती बदलू शकतो व कोणत्या बाबतींत बदलणं आपल्याला शक्य नाही हे दाखवून द्यावं लागतं.

नुकतंच काही दिवसांपूर्वी मला दिल्लीला एका समारंभासाठी बोलावणं आलं. त्याचा मुख्य विषय होता 'महिलांचे सबलीकरण'. त्याच वेळी पारितोषिक

वितरणही होते. त्या कार्यक्रमातील एक महत्त्वपूर्ण वक्त्या होत्या किरण बेदी.

किरणविषयी मला अत्यंत कौतुक, आणि आदरभाव वाटत आलेला आहे; कारण स्त्रीच्या अंतर्यामी असणाऱ्या शक्तीचं ती एक प्रतीक आहे व ते तेज तिच्या चेहऱ्यावरही दिसतं. तिने अंत:करणापासून उत्स्फूर्तपणे व अत्यंत तळमळीने भाषण केले व त्यात हे एक उदाहरण सांगितले.

बिझिनेस मॅनेजमेंट या विषयात पदव्युत्तर डिग्री घेतलेली एक तरुणी आपल्याच वर्गातील एक मुलाच्या प्रेमात पडली आणि तिने त्याच्याबरोबर पळून जाऊन एका देवळात लग्न केले. तिच्या गळ्यातील मंगळसूत्र एवढाच त्या लग्नाचा एकमेव पुरावा होता. विवाहाची नोंदणी नाही, फोटो नाही. काही दिवस पती-पत्नींप्रमाणे राहिल्यानंतर तिचा पती तिला सोडून गेला व त्या मुलीला दारोदारी मदत मागत हिंडावे लागेल.

त्या मुलीला इतकं अज्ञानी असल्याबद्दल दोषी ठरवणं, त्या मुलाचा तपास लावणं या गोष्टी किरणनं भाषणात उपस्थित केलेल्या एका मूलभूत प्रश्नापेक्षा दुय्यम महत्त्वाच्या होत्या व त्या म्हणजे त्या मुलीला हे काय प्रकारचं शिक्षण मिळालं ? तिने शाळेत आणि महाविद्यालयात जाऊन अभ्यास करण्यात ही जी एवढी वर्षे वाया घालवली, त्याचा काय उपयोग झाला ? जी मुलगी सुशिक्षित होती, तिला खरं तर आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र आयुष्य घालवणं किती सहज शक्य होतं. पण आता मात्र ती इथे मदतीसाठी याचना करत फिरत होती. ही गोष्ट इतकी सहजासहजी दुर्लक्ष करण्यासारखी नाही, असं किरणचं म्हणणं होतं.

शिक्षण प्राप्त करणं याचा अर्थ परीक्षेत चांगले गुण मिळवणं किंवा प्रमाणपत्रे मिळवणं असा होत नाही. जीवन ही एक परीक्षाच आहे. पण इथे अभ्यासक्रम अनोळखी असतो. प्रश्नपत्रिका तर अजून तयारच झालेल्या नसतात. त्याचप्रमाणे त्या प्रश्नपत्रिकेची आदर्श उत्तरपत्रिकाही तयार नसते. अनेक दिशांहून अनेक प्रश्न येतात. आपण त्या वेळी पळून जायचं नसतं. कोणत्याही संकटाचा सामना करण्यासाठी शिक्षण आणि आर्थिक स्वावलंबन ही दोन शस्त्रे आहेत. पण त्यासाठी आयुष्यभर आत्मविश्वासानं जगता आलं पाहिजे.

आपला सर्वात जवळचा मित्र कोण तर आपणच आणि तुमचा सर्वात वाईट शत्रू कोण ? तर तोसुद्धा तुम्हीच, होय ना ?

०००



**३३**

# मत्सराचे फळ

जीवन मोठं विलक्षण आहे. नानाविध प्रकारच्या व्यक्तींचं ते मिश्रण आहे. काही लोक सतत दुसऱ्याविषयी वाईट बोलत असतात. आता लोकांनी एकमेकांच्या वागण्यातील चुका दाखवून देऊ नये, किंवा कधीच नकारात्मक मत मांडू नये, असं मी म्हणत नाही. पण अशी टीका आपण जेव्हा करतो, तेव्हा त्यामागचा हेतू शुद्ध असला पाहिजे. एखाद्या व्यक्तीच्या वर्तनात, व्यक्तिमत्त्वात चांगला बदल घडवून आणण्याच्या उद्देशाने ती टीका असली पाहिजे, विधायक असली पाहिजे, विघातक नव्हे. पण दुर्दैवाने लोक जेव्हा दुसऱ्यावर टीका करतात, तेव्हा बरेचदा ती अत्यंत बोचरी, संवेदनाशून्य अशी असते. दुसऱ्याविषयी केलेले वक्तव्य अनेकदा हीन दर्जाचे असते.

काही दिवसांपूर्वी एका समाजसुधारकाला पद्मश्री ही पदवी प्राप्त झाली. मूलत: हा माणूस अत्यंत नि:स्पृह असून निष्ठेने काम करणारा असाच आहे. त्यामुळे तो त्या सन्मानास निश्चितच पात्र होता. पण माझी मैत्रीण पार्वती हिचे त्यावरील वक्तव्य मात्र ऐकण्यासारखे होते.

"हो ! तो काय चांगला श्रीमंत आहे. भरपूर पैसे खर्च करून पदवी विकत घेतली असेल. नाही तर या एवढ्या पैशांचं काय करणार तो ? थोड्याफार देणग्या दिल्या असतील. म्हणून मिळतेच पद्मश्री. माझ्याकडे जर इतका पैसा असता, तर मला याहून आधीच मिळाली असती. 'पद्मश्री' म्हणजे नाही तरी असं काय मोठं लागून गेलंय ? आता गेल्या वर्षी कुणाकुणाला मिळाली होती ते आठवणार आहे का तरी आपल्याला ? दर वर्षी शेकडो लोकांना मिळते, तशी या वर्षी याला मिळाली." पार्वतीचा स्वर अत्यंत कुत्सित होता.

मी या पार्वतीला बरेच वर्षांपासून ओळखते. दुसऱ्या कोणालाही काहीही यश मिळालं तरी त्याचं तिला नेहमी दु:ख होतं. त्यांची पात्रता नसताना त्यांना ते

मिळालंय, अशीच तिची नेहमी धारणा असते. ती इतकी आत्मकेंद्रित आणि संवेदनाशून्य आहे, की इतरांना काय वाटेल हा विचार तिच्या मनात कधीच येत नाही.

दुसऱ्या एका मैत्रिणीचा मुलगा मनीष हा पदवीपरीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाला. अर्थातच तिचा आनंद गगनात मावेना. त्यांच्या पार्टीला पार्वती आली होती. तिचा चेहरा दु:खी होता. ती मला बाजूला बोलावून म्हणाली, "माझ्या मुलीशी मालाशी तुलना केली तर हा मनीष तिच्या मानाने अगदी सामान्य मुलगा. पेपर तपासण्यात नक्की काहीतरी गफलत झाली असणार आहे. तूही शिकवतेस ना... मग तुला काय वाटतं ?"

"तू म्हणतेस ते चुकीचं आहे. मनीष आणि माला हे दोघेही उत्तम विद्यार्थी आहेत. फक्त मनीषनं जास्त मेहनत केली असणार हे उघड आहे. त्यामुळेच त्याला चांगलं यश मिळालं." मी म्हणाले.

मी पार्वतीची बाजू घेतली नाही याचं तिला दु:ख झालं.

जेव्हा जेव्हा दुसऱ्या कोणालाही कोणतंही यश मिळतं, तेव्हा या पार्वतीची प्रतिक्रिया नकारात्मकच असते. त्याचं कारण म्हणजे असूया. मला ती काही दिवसांपूर्वी बाजारात भेटली.

"तुझ्यासाठी कोण लिहितं ?" तिनं विचारलं.

मला धक्काच बसला. "माझ्यासाठी दुसरं कोण कशाला लिहील ? मला स्वत:चं स्वत:ला लिहिता येतं."

"तसं नाही. तुला काही वेळ नसतो. त्यामुळे मला वाटलं तू एखाद्या लेखकाला पदरी ठेवून घेतलं असशील. आता आपण स्वयंपाकाला नाही का माणूस ठेवत ?" ती म्हणाली.

मला फार वाईट वाटलं, रागही आला. असं कसं बोलली असावी ती ? असं बोलावंसं कोणाला वाटेल ? पण मला काय वाटलंय याचा थोडासुद्धा विचार न करता जाता जाता तिनं शेवटचं वक्तव्य केलंच, 'हे बघ, सगळेच असं करतात, मला वाटलं तूही केलं असशील.'

काही लोक स्वत: सुशिक्षित असूनही नेहमी दुसऱ्याविषयीही अशी विधाने करत फिरत असतात. ही पार्वती अशा लोकांपैकीच एक. दुसऱ्यावर टीका करण्यातच त्यांची बुद्धिमत्ता वाया जात असते. प्रत्येक ठिकाणी काहीतरी पाणी मुरतंय, अशी त्यांची समजूत असते. आपण आयुष्यात खूप स्वप्ने पाहतो, पण ती सगळी काही पूर्ण होऊ शकत नाहीत. यश हे अनेक गोष्टींच्या एकत्रित परिणामाचं फलित आहे.



नुसत्या परिश्रमांचं नव्हे. आपल्याला योग्य संधी उपलब्ध हवी, बरोबरीनं काम करायला योग्य व्यक्ती हव्यात आणि योग्य काळवेळ हवी. शिवाय थोडाफार भाग नशिबाचाही असतो.

जो यशस्वी होतो त्याला अपार परिश्रम तर करावे लागतातच पण आपण जे काही काम करत आहोत त्याबद्दल श्रद्धाभाव, विश्वासही असला पाहिजे. अनेकदा लोक कठोर परिश्रम करतात, पण तरीही त्यांना यशप्राप्ती होत नाही. त्याचा अर्थ ते यशस्वी झालेल्या व्यक्तीपेक्षा कोणत्या बाबतीत कमी आहेत असा नाही. जर मला यश मिळू शकलं नाही आणि माझ्याबरोबरच्या दुसऱ्या व्यक्तीला यश मिळालं तर स्वत:बद्दल दु:खीकष्टी होण्यापेक्षा त्या व्यक्तीच्या यशात आपल्याला आनंद वाटला पाहिजे.

ज्या संस्कृतीमध्ये परस्परांनी मिळवलेल्या यश-कीर्तीमुळे सर्वांनाच आनंद मिळतो, ती संस्कृती सर्वोत्तम असते. यासाठी आपल्याकडे सकारात्मक दृष्टिकोन हवा. दुसऱ्या व्यक्तीच्या यशाबद्दल असूया किंवा मत्सर न वाटता आपल्याला आनंद वाटला पाहिजे.

आज पार्वती कोणालाच आवडत नाही. तिला कोणी मैत्रिणीसुद्धा नाहीत. चांगलं हे फक्त आपल्या स्वत:च्याच बाबतीत घडावं, दुसऱ्याच्या घडू नये, असं तिला वाटतं. तिच्या दृष्टीने तिची मुलगी, मुलगा आणि पती एवढंच तिचं जग आहे. त्याशिवाय इतर कुणी तिच्या लेखी अस्तित्वातसुद्धा नाही.

ही अशी माणसं आयुष्यात काय मिळवतात ? विशुद्ध मैत्री नाही, प्रेम नाही, परस्परांना देण्या-घेण्याची भावना नाही. या अशा प्रकारची असूया मनात बाळगून जगणं, हे काय जगणं म्हणायचं ?

आपल्याच देशाकडे पाहा असूया आणि मत्सर यांमुळे आपला संपूर्ण इतिहासच बदलून गेलाय. अनेक राजे-महाराजांनी, राण्यांनी केवळ या मत्सरापोटी आपल्या शत्रूंना आपल्या दरबारात बोलावून, त्यांना दगाफटका करून त्यांचा घात केलाय. त्यामुळे त्यांच्या राज्यांचा सर्वनाश झाला. या अशा प्रकारच्या मत्सराचा बाहेरचे लोक नेहमीच फायदा घेत असतात. आपण इतिहास फक्त वाचतो. पण त्यापासून आपण काहीच शिकत नाही आणि म्हणून इतिहासाची पुनरावृत्ती होते.

ooo

# स्त्रीचे स्थान काय ?

ज्या क्षणी भारतीय स्त्रियांना मतदानाचा अधिकार मिळाला तो क्षण म्हणजे समानतेचं आणि स्वातंत्र्याचं प्रतीक बनलं. पण वास्तव जगात मात्र स्त्रियांना समाजात विशेष स्थान नाही असंच दिसतं. म्हणूनच हुंडाबळी, नववधूंना जाळणे, स्त्री-गर्भाची हत्या आणि इतर अशाच स्वरूपाचे गुन्हे समाजात घडत असताना दिसतात. 'यत्र नार्यस्तु पूजन्ते, रमन्ते तत्र देवता:' असं आपल्या जुन्या धर्मग्रंथात सांगण्यात येतं.

पण खऱ्याखुऱ्या आयुष्यात तसं नसतं.

काही दिवसांपूर्वी मी एका चर्चासत्राला गेले होते. त्याचा केंद्रविषय होता 'स्त्रियांच्या समस्या'. चर्चासत्रात झालेल्या भाषणांतून एक फार चांगली माहिती पुढे आली. ज्या ज्या देशांमध्ये स्त्रियांना सर्वार्थानं पुरेपूर स्वातंत्र्य आहे, अशा देशांची एक यादी वाचून दाखवण्यात आली. हे स्वातंत्र्य आर्थिक, सामाजिक आणि राजकीय अशा सर्व बाबतींत होतं.

ज्या देशात स्त्री-मुक्तीची संकल्पना आघाडीवर आहे अशा देशांचं नाव या यादीत अर्थातच अग्रभागी होतं, तर ज्या देशात स्त्रियांच्या सबलीकरणाचे फारसे प्रयत्न झालेले नव्हते, त्यांचं नाव बरंच खाली होतं. भारताचं नाव साधारण मध्यभागी कुठेतरी असेल, अशी माझी समजूत होती. पण प्रत्यक्षात मात्र भारताचं नाव या यादीत शेवटून दुसरं होतं ते पाहून मला आश्चर्याचा जोरदार धक्का बसला आणि दुःखही झालं.

या यादीत अग्रभागाने कोणत्या देशांची नावे झळकत आहेत, हे मी उत्सुकतेने पाहू लागले. मला वाटलं इंग्लंड नाही तर अमेरिकेचं नाव पहिलं असणार. पण प्रत्यक्षात तसं नव्हतं. पहिल्या तीन क्रमांकांचे देश होते स्वीडन, नॉर्वे आणि डेन्मार्क हे स्कँडिनेव्हियन देश. त्या चर्चासत्राला उपस्थित असलेल्या आम्हां



सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसला. युरोपच्या एका कोपऱ्यात असणारे हे छोटेसे देश. पण त्यांच्या देशातील स्त्रियांना मात्र सर्वात आदराने वागवण्यात येते.

स्वीडनच्या राजघराण्यातील नियमानुसार त्या घराण्यात जन्माला आलेल्या पहिल्या अपत्याकडे राज्याधिकार येतो. मग ते अपत्य मुलगा असो की मुलगी. हे आजही घडतं. लवकरच हीच पद्धत नॉर्वेतसुद्धा प्रचलित होणार आहे. या देशांमध्ये स्त्रियांना पुरुषांपेक्षा वेगळी वागणूक देता येत नाही. तो गुन्हा ठरतो.

मी स्टॉकहोमला गेलेली असताना एका रात्री मला हॉटेलात परत येण्यास उशीर झाला. हॉटेल बरंच लांब होतं. त्यामुळे मी टॅक्सी केली. हॉटेलपर्यंतचे भाडे चाळीस क्रोना इतके होते. पण मला वाटलं एवढी रात्र झाली आहे, तेव्हा हा टॅक्सी ड्रायव्हर आपल्याकडून नक्कीच दुप्पट भाडं वसूल करणार म्हणून मी त्याला शंभर क्रोना दिले व तो उरलेले पैसे परत देईल, म्हणून थांबले. त्याने मला ऐंशी क्रोना परत दिले. मी त्याला कारण विचारले. त्यावर तो म्हणाला, "तुम्ही एक स्त्री आहात. रात्री प्रवास करत आहात. त्यामुळे आम्ही अर्धेच भाडे घेतो."

मला ते ऐकून आश्चर्य वाटले. आनंदही झाला. इकडे आपल्या देशात एवढ्या रात्री प्रवास करण्याचं माझं धारिष्ट्यसुद्धा होणार नाही आणि यदाकदाचित केलाच, तर टॅक्सी ड्रायव्हर जेवढे भाडे होईल त्याच्या कितीतरी पट जास्त भाडे वसूल केल्यावाचून राहणार नाही.

आपण व्यासपीठांवरून भाषणे देतो. आपण देवीची आराधना करतो. आपल्या राज्यघटनेने स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने अधिकार दिलेले आहेत, असं आपण मोठ्या अभिमानाने सांगतो. शंकराचं जे अर्धनारीनटेश्वर हे रूप आहे त्यातूनही हेच प्रतीत होतं, की शंकरानं स्त्री-पुरुष समानतेचा स्वीकार केलेला आहे. आपले जुने धर्मग्रंथ आणि आपल्या इतिहासात स्त्रियांचे गुणवर्णन केलेले असते. पण खरोखर आपल्या देशात स्त्रियांना सुरक्षित वाटते का ? स्वातंत्र्याचा आनंद खऱ्या अर्थाने त्यांना उपभोगायला मिळतो का ? समाजात त्यांना समानतेची वागणूक मिळते का ? कदाचित काही थोड्या स्त्रियांना मिळत असेल.

सर्वसाधारणपणे स्त्रियांची ओळख कशी करून देण्यात येते ? कोणाची तरी मुलगी, पत्नी किंवा माता म्हणून. बरेचदा भारतीय स्त्रियांना वैयक्तिक बाबतीतसुद्धा मत देण्याचा अधिकार नसतो. त्यांनी केलेल्या कामाचं त्यांना मोल मिळत नाही. त्यांनी केलेल्या कामाचं कोणालाही कौतुक वाटत नाही. पुरुषप्रधान समाजात त्यांना राहावं लागतं. अनेकदा स्त्रियाच स्त्रियांच्या शत्रू बनतात. पण या अशा वातावरणातसुद्धा स्त्रिया राहतात आणि आपापल्या क्षेत्रात यश मिळवतात ही खरोखर लक्षणीय गोष्ट

आहे, व त्याही सुखासमाधानाने.

याउलट त्या तीन स्कँडिनेव्हियन देशात स्त्रियांना अत्यंत सन्मानाची वागणूक मिळते. आपण फक्त बोलतो, पण ते मात्र कृती करतात. त्यामुळे 'यत्र नार्यस्तु पूजन्ते, रमन्ते तत्र देवता:' ही उक्ती या देशांमध्ये सार्थ ठरली आहे.

ooo



# ३५

# एक आदरणीय जीवन

जे चकाकतं ते सारं सोनं नसतं. जे पांढरं दिसतं ते सर्व काही दूध नसतं. भगवे कपडे घालणारी सर्वच माणसे साधुसंत नसतात. या उक्त्यांमधून चिरंतन सत्य सांगितलेलं आहे, विशेषत: शेवटच्या उक्तीतून.

भगवे कपडे घालून अनेक माणसे फिरतात. पण खऱ्याखुऱ्या अर्थाने ते सर्व काही संन्यासी नसतात. संन्यासी कोणाला म्हणावे ? जो आपल्या अनुयायांना योग्य मार्ग दाखवतो, तो.

काही दिवसांपूर्वी मी म्हैसूरला गेले होते. परित्यक्ता स्त्रियांसाठी उभारण्यात आलेल्या एका आश्रमाचा उद्‌घाटन समारंभ होता. तिथे असलेल्या बहुतांशी स्त्रियांचा त्यांच्या सासरच्या माणसांनी तरी छळ केला होता, नाहीतर दारुड्या नवऱ्याने त्यांच्यावर अत्याचार केलेले होते. शिवाय आर्थिक हालाखी व सामाजिक दु:स्थितीमुळे अशा स्त्रियांच्या माहेरच्या लोकांकडूनसुद्धा त्यांना कोणताच आधार मिळणे शक्य नव्हते. काही तर अशीही उदाहरणे होती, की तरुण मुली आईवडिलांच्या विरोधाला न जुमानता घरातून पळून गेल्या होत्या पण प्रियकराने 'हनीमून' झाल्यावर त्यांना टाकून दिले होते. साधारणपणे अशा ज्या मुली असतात, त्यांना नंतर आपल्या आईवडिलांकडे जाण्याचं धाडसही होत नाही.

या अशा परित्यक्ता स्त्रियांना मानसिक दृष्ट्या अत्यंत खंबीर असण्याची गरज असते, कारण त्यांना प्राप्त परिस्थितीला अत्यंत निर्धाराने सामोरे जावे लागते. कधीकधी स्वत:च्या उदरनिर्वाहासाठी स्वत:च प्रयत्न करून आपल्या पायांवर उभे राहावे लागते. त्यांच्यातील काही कमनशिबी स्त्रिया देहविक्रयाच्या भयानक दुष्टचक्रात सापडतात, किंवा दुसऱ्या कोणत्यातरी गैरमार्गाला लागतात, बेकायदेशीर कृत्यांच्या जाळ्यात नकळत अडकतात.

असं म्हणतात, 'यशावर हक्क सांगायला अनेक जण पुढे येतात. पण अपयशाचा

धनी होण्यास मात्र कोणीच तयार नसतो.' किती खरं आहे ते. आपल्याला पाहायला मिळतात त्या या अभागी स्त्रिया आणि त्यांची मुले. पण त्यांच्या त्या परिस्थितीला जबाबदार असणारे मात्र पडद्याआडच राहतात. त्याचमुळे आपल्याला नुसता परिस्थितीला बळी पडलेल्या या स्त्रियांना दोष देऊन चालणार नाही. खरं तर बरेचदा परिस्थितीच त्यांना गैर मार्गाचा अवलंब करण्यास भाग पाडते. पण तरीही त्यांना आपण मदत तर केलीच पाहिजे. काहीही झालं तरी माणसाच्या हातून चूक घडू शकते. To err is human.

या अशा परित्यक्ता स्त्रियांच्या उद्धारासाठी जे लोक काम करतात त्यांचा सन्मान करणं, गौरव करणं ही फार चांगली गोष्ट आहे. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्याचं पाऊल वाकडं पडलेलं आहे, अशांना मदत करणं. त्यासाठी आपल्याकडे यंत्रणा उपलब्ध आहे का ? या अशा व्यक्तींना आसरा देणाऱ्या किंवा त्यांचं पुनर्वसन करणाऱ्या अगदी हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या संस्था आहेत. त्या संस्थांमध्ये स्त्रियांना आपल्या पायांवर उभं राहण्यासाठी सक्षम बनवलं जातं. त्यांना समाजात मानाने जगता यावे यासाठी प्रयत्न केले जातात.

म्हैसूरमध्ये अशा प्रकारची संस्था काढण्याची कल्पना सर्वात प्रथम ज्यांच्या मनात आली ते कोणत्याही राजकीय पक्षाचे पुढारी नव्हते. ना त्यांना प्रसिद्धीची हौस होती. ते तेथील सुत्तूर मठाचे मठाधिपती आहेत. स्वामीजी विद्वान आहेत. दया, करुणा व अनुकंपेचा खरा अर्थ त्यांनी जागला आहे व म्हणूनच पददलित अशा परित्यक्तांना साहाय्य करण्याची कल्पना त्यांच्या मनात आली.

खरं तर त्यांना पूजाअर्चा करत, ईश्वराची आराधना करत, आपल्या मठाची देखभाल करत अगदी शांत, निवांत आयुष्य जगता आलं असतं. पण त्यांनी वेगळा विचार केला. स्वामीजींच्या मठाची दीड एकर जमीन होती. त्याची किंमत सुमारे एक करोड होती. ही सर्व जमीन त्यांनी दान केली आहे. एखादा सच्चा नेता कसा असावा हे त्यांनी आपल्या वागण्यातून जगाला दाखवून दिलं आहे. एक गोष्ट येथे नक्कीच नमूद करण्यासारखी आहे, आणि ती म्हणजे, त्यांनी हे जे काही केलं आहे ते कोणत्याही स्वरूपाच्या परतफेडीची अपेक्षा न करता. आपल्यासारख्या सामान्य लोकांनी या अशा व्यक्तींकडे मार्गदर्शक म्हणून पाहिले पाहिजे आणि त्यांनी दाखवलेल्या मार्गाने गेले पाहिजे.

आपले पूर्वज म्हणत 'आचार्य देवो भव'. म्हणजेच भक्तिभाव आणि आदरभाव दाखवण्याच्या मालिकेत गुरुचे स्थान तिसरे महत्त्वाचे असून गुरुरूपाने देवच आपल्या भेटीला येत असतो. सत्तूर मठाच्या स्वामीजींच्या बाबतीत हे उद्‌गार किती यथार्थ आहेत !

ooo



३६

# स्तंभलेखनाविषयी...

जेव्हा कधीही मी स्तंभलेखन करते, तेव्हा मी मुद्दाम माझा ई मेलचा पत्ता माझ्या वाचकांसाठी त्यात देते. हेतू असा, की त्या लेखाविषयीच्या त्यांच्या प्रतिक्रिया माझ्यापर्यंत पोचाव्या. त्यांनी मला पाठवलेली ई-मेल्स ही फक्त माझ्या स्तंभलेखनाच्या संदर्भातच असावी, अशीही मी पुष्टी जोडते. पण तरीही मला अनेक ई-मेल्स येतात, जी दुसऱ्याच विषयांच्या संदर्भात असतात. काही ई-मेल्समधून माझ्या स्तंभलेखनाचं कौतुक केलेलं असतं, तर काही सरळसरळ कुत्सित, उपहासगर्भ असतात.

'लास्ट वर्ड' या स्तंभासाठी मी जे काही लेखन करते ते पूर्णपणे माझं वैयक्तिक मत असतं. माझ्या मनात जे काही विचार असतील ते थेट तसेच्या तसे वाचकांपर्यंत पोहोचवण्याचा माझा प्रयत्न असतो. हुंडाबळीचा जो भयानक प्रकार आहे, त्याचं वर्णन करणं, भ्रष्टाचाराची कारणमीमांसा करणं, प्रामाणिकपणाविषयी नीतिपाठ देणं या गोष्टी तशा फार कठीण नसतात.

पण माझे अनेक वाचक मला अशी विनंती करतात, की मी माझ्या स्वतःच्या वैयक्तिक आयुष्यात किंवा माझ्या जवळच्या मित्रमैत्रिणींच्या आयुष्यात घडलेल्या प्रसंगांविषयी काहीतरी लिहावं. मीपण एक शिक्षिका आहे, त्यामुळे रूपके आणि उदाहरणे यांच्या साहाय्याने विषय जास्त सुस्पष्ट होतो, याची मलासुद्धा कल्पना आहे. त्यामुळेच लिहिताना मी माझ्या स्वतःच्या काही अनुभवांविषयीसुद्धा लिहिते. मी लिहिलेले प्रसंग माझ्या स्वतःच्या घरात किंवा माझ्या मित्रपरिवारापैकी कोणाच्याही बाबतीत घडलेले असू शकतात. पण त्याचा अर्थ माझा मुलगा काय म्हणाला, माझा मित्र किंवा मैत्रीण कसे बोलले, हे वर्णन करण्याचा काही माझा उद्देश नसतो. केवळ ते काही क्षण वाचकांपुढे ठेवावे एवढाच हेतू असतो माझा. कारण ते क्षण, ते अनुभव वाचकांना आपल्या अनुभवांशी मिळते-जुळते वाटू

शकतात. पण अनेकदा वाचक ते वाचून स्वत:चा गैरसमज करून घेतात आणि मग लागट, बोचऱ्या भाषेत टीका करणारी ई-मेल्स मला पाठवून देतात.

माझा एक लेख प्रकाशित झाला ''नॉट ऑल इज राँग विथ द नेक्स्ट जनरेशन''. त्या लेखात मी माझ्या मुलाबरोबर झालेलं एक संभाषण दिलं होतं. ते लिहिण्याचा उद्देश माझा मुलगा किती श्रेष्ठ आहे; मी किती मोठी आहे वगैरे दाखवून देण्याचा अर्थातच नव्हता. दोन पिढ्यांच्या प्रतिनिधींमध्ये घडलेलं ते एक संभाषण होतं. मी जुन्या पिढीची प्रतिनिधी आणि माझा मुलगा नव्या पिढीचा प्रतिनिधी. हेच संभाषण मला 'अ' नावाचा मुलगा आणि 'ब' नावाची बाई यांच्यात घडलं असं लिहिता आलं असतं, मग त्यामध्ये कुठेही वैयक्तिक माझा संबंध न येता दोन पिढ्यांमधील फरकाविषयीचं सर्वसाधारण विधान मला करता आलं असतं. पण त्याऐवजी प्रत्यक्षात घडलेल्या एखाद्या घटनेचा आधार घेऊन लिहिणं, हे मला जास्त योग्य वाटलं. पण त्यावर मला ऐकावी लागलेली प्रतिक्रिया अशी 'तुम्ही तुमच्या मुलाविषयी लिहिता.'

एकदा मी सामाजिक संवेदनाशून्यतेबद्दल लिहिलं होतं. आपल्या संवेदना कशा बोथट झाल्या आहेत, आपण आपल्या स्वत:च्या विश्वात राहतो व आपल्या सभोवताली जे काही घडतं त्याची आपण कशी पर्वा करत नाही, हे दाखवून देण्याचा माझा उद्देश होता. आपण आपल्या कुटुंबाची काळजी तर घेतलीच पाहिजे. ती गोष्ट मीही अमान्य करत नाही. कुटुंब तर अत्यंत महत्त्वाचं आहे. माणसानं आपल्या कुटुंबाची हेळसांड करून मानवजातीवर प्रेम वगैरे करावं, असं नाही. माझं म्हणणं एवढंच होतं, की निदान आपण इतरांचा विचार करायला शिकलं तरी पाहिजे, पैसे दिले पाहिजेत, असंही माझं काही म्हणणं नव्हतं. मी फक्त माझ्या अनुभवातून एक छोटंसं उदाहरण दिलं. लोकांनी मला लगेच टीका करणारी पत्रे पाठवली. मी भगवान बुद्धाच्या बाबतीत घडलेली एक कथा सांगून बुद्धाविषयी काही आदरपूर्वक उद्गार काढले होते. ज्या व्यक्तीला दुसऱ्यांना मदत करण्याची इच्छा आहे अशा एका व्यक्तीच्या सर्वोच्च स्वार्थत्यागाचं भगवान बुद्ध हे प्रतीक आहे, असं मी त्यात म्हटलं होतं. प्रत्येकाला तर बुद्ध होणं काही शक्य नाही. पण निदान अशा थोर महात्म्यांकडून आपण काहीतरी शिकू शकतो.

माझ्या लेखाचा शेवट आशावादी, सकारात्मक असतो तेव्हा तो लेख वाचक डोक्यावर घेतात. पण जर क्वचित एखादा लेखाचा सूर जरा निराशावादी, नकारात्मक असेल तर लगेच मला पत्रे येतात : 'तुमच्याकडून आमची ही अपेक्षा नव्हती. किंवा तुम्ही नेहमी चांगल्या गोष्टींबद्दलच लिहिलं पाहिजे.' खरं तर आपल्या



खऱ्याखुऱ्या आयुष्यात अगदी सर्वगुणसंपन्न अशी एकसुद्धा व्यक्ती नसते. अगदी प्रत्येक क्षेत्रात यशस्वी झालेली एकही व्यक्ती नसते. कोणत्याही यंत्रणेत काहीतरी दोष असतातच. खरं तर आयुष्य म्हणजे अधिक व उणे, हसू आणि आसू, उन्नती आणि अवनती यांचं मिश्रण आहे. नकारात्मक गोष्टी, घटना हासुद्धा मानवी आयुष्याचाच भाग असून त्यांचंसुद्धा चित्रण साहित्यातून करणं ही प्रत्येक साहित्यिकाची जबाबदारी आहे. त्या सर्व गोष्टींचा आपण स्वीकार करूनसुद्धा सकारात्मक दृष्टिकोन कसा ठेवला पाहिजे, हे आपल्याला त्या साहित्यिकांनी सांगितलं पाहिजे.

कोणत्याही घटनेकडे दोन वेगळीवेगळी माणसे दोन भिन्न भिन्न दृष्टिकोनातून पाहू शकतात. माझ्या स्तंभालेखनामधून मी नेहमीच जनसामान्यांच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या बाबींविषयी माझ्या खऱ्याखुऱ्या, प्रामाणिक भावना काय, ते मांडण्याचा आटोकाट प्रयत्न करते. त्यामध्ये कोणत्याही स्वरूपाची बढाई मारणे किंवा काही खाजगी गोष्टींविषयी मुद्दाम बोलणे, असा माझा मुळीच हेतू नसतो. मला फक्त घडलेली घटना वाचकांना सांगायची असते व वाचकांनी आपल्या आयुष्याच्या संदर्भात त्या घटनेचा विचार करावा, एवढीच फक्त माझी इच्छा असते. वाचकांनी पूर्वग्रहविरहित दृष्टिकोन ठेवून जर माझ्या स्तंभलेखनावर आपल्या प्रतिक्रिया नोंदवल्या तर मला पुढील लेखनात सुधारणा करण्यासाठी, काही नवीन पद्धतीचा विचार करण्यासाठी नक्कीच उपयोग होतो.

मी माझ्या लेखनातून काही पैसा मिळवत नाही. मी काही कीर्ती मिळवण्यासाठी नक्कीच लिहीत नाही. मला विविध लोकांच्या भेटीतून आलेल्या अनुभवांचा खजिना खुला करून वाचकांपुढे ठेवावा, त्या लोकांना समजून घेण्याचा प्रयत्न करावा व एकंदरीतच आयुष्य म्हणजे काय ते समजून घ्यावं, म्हणून मी लिहिते. अनेकदा लोक हाव, मत्सर, असूया अशा भावनांना बळी पडून वागतात. त्याचा अर्थ ती माणसेच वाईट आहेत, असा नसतो. माणसाच्या ठायी असलेले हे काही गुण आहेत.

आणि म्हणूनच माझे वाचकच मला लेखनासाठी प्रेरणा देतात, असा माझा ठाम विश्वास आहे.

०००

# ३७

# द नोबेल प्राईझ

काही दिवसांपूर्वी मी एक लेख लिहिला होता. या शतकातील सर्वश्रेष्ठ अशी संकल्पना कोणती ? तर आपल्या महात्मा गांधींनी मांडलेली अहिंसेची संकल्पना. या अहिंसा तत्त्वावर आधारित एकूण तीन व्यक्तींना शांतीसाठीचा नोबेल पुरस्कार प्रदान करण्यात आला. त्या व्यक्ती म्हणजे मार्टिन ल्यूथर किंग ज्युनियर, नेल्सन मंडेला आणि म्यानमारचे अनुग सॅन स्यू काई. नॉर्वे येथील ऑस्लो या ठिकाणी आपल्या नोबेल पुरस्काराचा स्वीकार करताना मार्टिन ल्यूथर किंग यांनी आपल्या भाषणात महात्मा गांधीविषयी आपल्या आदरभावना व्यक्त केल्या, व आपण अमेरिकेसारख्या हिंसक देशामध्ये गांधीजींनी दाखवून दिलेल्या अहिंसेच्या मार्गाचा अवलंब करणार असल्याचेही सांगितले. मात्र गांधीजींना कधीही नोबेल पुरस्कार मिळाला नाही.

मी हा लेख जेव्हा लिहिला तेव्हा एका वाचकाने उपहासगर्भ असे पत्र मला लिहिले. "बरं झालं श्री. एम. के. गांधी यांना नोबेल पुरस्कार देण्यात आला नाही ते. अखेर डायनामाईट बनवणाऱ्या एका माणसाने 'डायनामाईट किंग'ने त्या पुरस्काराची सुरुवात केली !"

अल्फ्रेड नोबेल यांच्याविषयी किती चुकीचे उद्‌गार काढले आहेत हे ! ही संपूर्ण पृथ्वी आपली आहे असा विचार करणारा हा पहिला मानव असेल. मानवजातीवर प्रेम करणारा हा माणूस खऱ्या अर्थाने आंतरराष्ट्रीय माणूस होता. तोही एका शतकापूर्वी होऊन गेलेला.

१८९६मध्ये त्यांनी जेव्हा स्वत:चे मृत्युपत्र लिहिले, तेव्हा आपण मानवकल्याणकारी अशा एका अत्यंत अभिनव संकल्पनेला जन्म देत आहोत, याची त्यांना कल्पना तरी असेल का ? या पुरस्काराचे मानकरी हे कोणत्याही देशाचे असू शकतात. गेल्या शंभर वर्षांत एकूण सातशे नोबेल पुरस्कार देण्यात



आले आहेत. त्यांनी आपले मृत्युपत्र जरी १८९६मध्ये लिहिले असले, तरी १९०१ सालापासून हे पुरस्कार देण्यास सरुवात झाली. या शतकात फारच थोडे स्वीडिश नागरिक नोबेल पुरस्काराचे मानकरी झाले. नोबेल यांनी स्वत: हयात असताना हे नोबेल पुरस्कार कधीच दिले नाहीत. पण ज्या काही लोकांना हा नोबेल पुरस्कार प्रदान करण्यात येतो, त्यांच्याकडे साऱ्या जगातील लोक आदराने पाहतात.

एका वाचकाने लिहिले होते : "नोबेल यांची थोरवी कशात आहे ?" त्याच्या त्या प्रश्नामुळे आज मला हा लेख लिहावासा वाटला.

त्या काळात सुमारे तीन दशलक्ष डॉलर्सची आपली मालमत्ता दान करून टाकावी, असं अल्फ्रेड नोबेल यांना का वाटलं ? आपली प्रचंड संपत्ती त्यांना आपल्या नातेवाईकांच्या नावे ठेवता आली असती, एखाद्या धार्मिक संस्थेला देता आली असती किंवा आपल्या देशबांधवांना देता आली असती. साहित्य, शांती, भौतिकशास्त्र, रसयायनशास्त्र आणि वैद्यकशास्त्र यांसाठी त्यांनी पुरस्कार का ठेवले ? त्यांनी डायनामाईटमधून आपली ही संपत्ती जरी मिळवली असली तरी त्याचा अर्थ त्यांना युद्ध प्रिय होतं, असा मात्र मुळीच होत नाही.

स्वयंपाकघरात सुरी ही एक आवश्यक गोष्ट आहे. पण हीच सुरी एक जीवघेणे शस्त्रसुद्धा बनू शकते. ती कोणी हातात धरली आहे त्यावर ते अवलंबून असते. नोबेल यांनी डायनामाईटचा शोध लावला म्हणून पाश्चात्य युरोप व अमेरिका त्यांचे ऋणी आहेत. पर्वतांचा वेध घेऊन त्यातून रेल्वेचे रस्ते बांधण्यात डायनामाईटने मदत केली. बोगदे बांधण्यासाठी डायनामाईटचा उपयोग झाला. रेल्वेने माणसे जोडली गेली. याच रेल्वेचा उपयोग जर कोणी युद्धासाठी केला, तर तो दोष नोबेल यांचा नव्हता.

असं म्हणतात, नोबेल यांना प्रचारकीपणा, किंवा जाहिरातबाजी मुळीच आवडत नसे. नोबेल म्युझियममध्ये त्यांचे खूपच थोडे फोटो बघायला मिळतात. त्यांनी उत्तुंग यश मिळवले. त्यांनी जे काही हाती घेतले, ते त्यांनी उत्कृष्ट रीतीने पार पाडले. मग तो व्यवसाय असो नाही तर मानवतेच्या कल्याणाचे काम असो.

स्वत: नोबेल हे अत्यंत अबोल, लाजाळू व शांतताप्रेमी होते. त्यांच्या मृत्युपत्रातूनही हेच दिसून येतं. त्यांनी स्पष्टपणे लिहिलंय, "मानवजातीच्या कल्याणासाठी जे काही कार्य करण्यात येईल, त्याचा सन्मान झाला पाहिजे. त्याला पुरस्कार दिलाच पाहिजे. म्हणजे त्या व्यक्तीला आपण अंगिकारलेले कार्य पार पाडताना कोणतीही आर्थिक अडचण भासणार नाही."

एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. नोबेल पुरस्काराचा मानकरी झालेल्या फार

थोड्या स्त्रिया आहेत, विशेषतः विज्ञान क्षेत्रात. त्यापाठीमागचं कारण हेच असावं, की फारच थोड्या देशांमध्ये स्त्री-शिक्षणाला उत्तेजन देण्यात येते अनेक वेळा अमेरिकन-युरोपियन व्यक्तींनाच हा पुरस्कार प्राप्त होतो. याचं कारणसुद्धा वैज्ञानिक क्षेत्रात संशोधन करण्यासाठी लागणारी महागडी, अत्याधुनिक सुसज्ज यंत्रणा येथील देशांमध्येच उपलब्ध असते.

दर वर्षी काही विशिष्ट क्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तींना नोबेल पुरस्कार दिला जातोच, असंही नाही. जर एखाद्या वर्षी एखाद्या विशिष्ट क्षेत्रात पुरस्काराला पात्र असं काम घडलेलं कमिटीला आढळलं नाही तर त्या क्षेत्रातील नोबेल पुरस्कार दिलाच जात नाही. जीन पॉल सार्त्र या सुप्रसिद्ध लेखकाने नोबेल पुरस्कार नाकारला होता. मादाम क्यूरी यांना दोनदा तो मिळाला तर त्यांची मुलगी इरीन हिला तो रसायनशास्त्र या विषयासाठी देण्यात आला. त्यांची दुसरी मुलगी इव्हा ही युनेस्कोची प्रतिनिधी होती. तिलासुद्धा हा पुरस्कार प्राप्त झाला.

मानवतेच्या कल्याणाच्या कार्याचे बीज आल्फ्रेड नोबेल यांनी पेरले. त्यानंतर १९१० सालाच्या सुमारास आधी रॉक फेलर यांनी व नंतर फोर्ड यांनी आपल्या विश्वस्त संस्था स्थापन केल्या.

आज जगभर विविध कार्यांसाठी विविध प्रकारचे पुरस्कार ठेवण्यात आले आहेत पण नोबेल हे मात्र आपल्या कार्याच्या रूपाने हिमालयासारखे समर्थपणे आपल्या आठवणीत आहेत व मानवतेविषयीचे प्रेम व शांती यांचे प्रतीक बनून अजरामर झाले आहेत.

०००



# ३८

# कुमारी माता

काही वर्षांपूर्वी मी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्याचं काम करत असे. त्या वेळी विशीच्या आतल्या तरुणतरुणींच्या विशेषतः मुलींच्या समस्या काय असतात, त्याची मला जाणीव झाली. साधारपणपणे मुली लाजाळू, अबोल असतात आणि त्यांनी आपल्या आज्ञा शंभर टक्के पाळाव्या अशी त्यांच्या पालकांची अपेक्षा असते.

माझी एक विद्यार्थिनी कुसुम हिला लग्नाआधी दिवस गेले होते. मुलगा तिच्या वर्गातलाच होता. पण तिच्याशी लग्न करण्याची मात्र त्याची हिंमत नव्हती. तिच्या आईवडिलांना जेव्हा हे समजलं, तेव्हा ते अत्यंत संतापले. ते जेव्हा मला भेटायला आले तेव्हा त्यांचा पहिला प्रश्न होता : "लोक काय म्हणतील ? आम्ही समाजाला कसं तोंड देऊ ?" पण मुलाकडच्यांचा मात्र त्या लग्नाला विरोध होता. अखेरीस त्या मुलीनं आत्महत्या केली.

मला आत्यंतिक दुःख झालं. अतिशय असहाय वाटलं. कुमारी मातेच्या आपल्या समाजात काय समस्या असतात, याची मला त्या वेळी पहिल्यांदा जाणीव झाली. मोठमोठी भाषणं देणं फार सोपं असतं. पण खऱ्याखुऱ्या आयुष्यात मात्र त्या मुलीवर आणि तिच्या कुटुंबीयांवर फार प्रचंड दडपण असतं.

काही दिवसांपूर्वी मी नॉर्वेला गेले होते. तेथील रहिवासी माझी मैत्रीण मार्था ही मला आपल्या घरी जेवायला घेऊन गेली. एक साधंसुधं मध्यमवर्गीय कुटुंब. मार्था एकुलती एक मुलगी. तिचे आईवडील शिक्षक होते. स्वतः मार्थासुद्धा एका शाळेत शिक्षिका होती.

उन्हाळ्याचे दिवस होते. रात्री आठचा सुमार असावा. पण जणू काही दुपारचे दोन वाजले असावे, असं ऊन होतं. त्यामुळेच तर नॉर्वे या देशाला मध्यरात्रीच्या सूर्याचा देश म्हणत नसावेत ना ? घर स्वच्छ आणि सुंदर होतं.

चमकत होतं. सर्वांनाच इंग्रजी येत असल्यामुळे माझ्या दृष्टीनं सोयीचं होतं.

आम्ही जेवायला बसलो. जेवण साधंसंच, शाकाहारी होतं. एवढ्यात पाच वर्षांचा एक लहान मुलगा पळत आला आणि त्यानं मार्थाला मिठी मारली. तो अतिशय खोडकर आणि मिस्किल होता. हवाहवासा वाटण्यासारखा, गोड होता. तो उंच खुर्चीत माझ्या शेजारी बसला. थोड्या वेळाने मार्थाची चुलत बहीण मेरीपण येऊन आमच्याबरोबर जेवायला बसली. संभाषण नेहमीसारखं चालू होतं.

मेरी राज्यशास्त्रात पदव्युत्तर अभ्यासक्रम शिकत होती. नॉर्वे देशातील राजकीय परिस्थितीविषयी मेरी आणि मी गप्पा मारत होतो. इतक्यात तो छोटा मुलगा मेरीचा स्कर्ट ओढून म्हणाला, 'मॉम, मला अजून ब्रेड हवा.'

ते ऐकून मला आश्चर्य वाटलं. मेरी जेमतेम चोवीस वर्षांची तरुण मुलगी तिला इतका मोठा मुलगा असेल ? ती तर किती लहान दिसत होती. बोलता बोलता मी मेरीपाशी तिच्या नवऱ्याची चौकशी केली. तो कुठे असतो, काय काम करतो... वगैरे. त्यावर कोणत्याही प्रकारची अपराधी भावना न बाळगता, न संकोचता ती म्हणाली, 'माझं लग्न झालेलं नाही. पण जॉन माझा मुलगा आहे. मी कुमारी माता आहे.'

जेवण झाल्यावर मार्था मला पोचवायला आली. आता मात्र मला विषय काढल्याशिवाय राहवेना.

मी म्हटलं, 'मार्था, मी एक विचारू ? मेरी खूश आहे ? तिच्या आईवडिलांना काय वाटतं ? त्या छोट्या मुलाचे वडील कुठे आहेत ? मी हे तुला विचारते आहे, कारण तिकडे भारतात एका विद्यार्थिनीचंही हे असंच आहे.'

मग मी कुसुमची कहाणी मार्थाला ऐकवली. ती ऐकताच मार्थाच्या मनाला यातना झाल्या. ती म्हणाली, 'मेरी आणि डॅनिएल यांची एका समर कॅम्पमध्ये गाठ पडली. दोघेही तेव्हा फक्त अठरा वर्षांचे होते. डॅनिएल आमच्या घरी नेहमी येऊ लागला. दोघे प्रेमात पडले आणि मेरीला चुकीने दिवस राहिले. तसं आम्हांला शाळेत लैंगिक शिक्षण देण्यात येतं. पण तरीही कधीही चुका घडतातच. मेरीला दिवस गेले, पण त्या वेळी डॅनिएल कॉलेजातच होता, त्यामुळे त्याची तिच्याशी लग्न करण्याची तयारी नव्हती. शिवाय आपले स्वभाव बरेच भिन्न असल्याचं एव्हाना दोघांना कळून चुकलं होतं. जरी त्यांनी लग्न केलं असतं, तरीही त्याची परिणती घटस्फोटात झाली असती. मग त्यांनी वेगळं व्हायचं ठरवलं. आपण बाळाला जन्म द्यायचाच, असं मेरीनं ठरवलं. तिला गर्भपात करून घ्यायचा नव्हता. त्यामुळे तिनं बाळाला जन्म दिला. वर्षभर त्याला पाजलं, त्याचं पालनपोषण केलं. आता ती परत



कॉलेजात जाऊ लागली आहे. कदाचित पुढच्या वर्षी ती व तिचा नवा मित्र विवाहबद्ध होतील.'

ते ऐकल्यावर माझ्या मनात हजारो प्रश्न उपस्थित झाले. मेरीच्या आईवडिलांची त्यावर काय प्रतिक्रिया होती ? जॉनला आपल्या वडिलांविषयी काही माहिती होती का ? हा डॅनिएल कुठे होता ? वगैरे, वगैरे..

माझ्या मनातील उत्सुकता मार्थाच्या लक्षात आली असावी. ''माझ्या काका-काकूंनी अजिबात चिंता केली नाही, कारण लग्न न करण्याचा निर्णय मेरीचा होता. आमच्या देशात कुमारी माता पुष्कळ असतात. डॅनिएल जॉनला वर्षातून दोन वेळा भेटतो. त्याला चांगली नोकरी आहे. डॅनिएल जॉनच्या पालनपोषणासाठी पैसे पाठवतो. कदाचित पुढच्या वर्षी तोसुद्धा आपल्या नव्या मैत्रिणीशी लग्न करेल. जॉनलाही हे माहीत आहे. मेरीच्या मनात डॅनिएलविषयी राग नाही.''

माझा माझ्या कानांवर विश्वासच बसेना. येथे एक स्त्री कुमारी माता असूनही उजळ माथ्याने राहात होती. सर्व जगासमोर ती गोष्ट उघड करून सांगत होती. तिच्या कुटुंबीयांनी तिच्या मुलाचा स्वीकार केला होता. माझ्या मनात माझ्या विद्यार्थिनीचा, कुसुमचा आणि तिच्या मृत्यूचा विचार आला. परिस्थिती तीच. बहुधा वयही तेवढंच. पण संपूर्ण चित्रच वेगळं होतं. मेरीचा चेहरा आत्मविश्वासानं, समाधानानं चमकतो. बिचारी कुसुम मात्र हयात नाही.

ooo

# ३९

# वर पाहिजे

काळ आणि भरतीची लाट कोणासाठी थांबत नाही. सुमारे पंचवीस वर्षांपूर्वी मित्रमैत्रिणींच्या लग्नाला जायचा प्रसंग येत होता, आणि आता त्यांच्या मुलाबाळांच्या लग्नाला जायचा प्रसंग येतो.

मी वाणीच्या लग्नाला गेले होते. तिची आई वनिता ही माझी मैत्रीण. मला तर वनिताचं लग्नसुद्धा अगदी स्पष्टपणे आठवतं. तीस वर्षांपूर्वी 'द हिंदू' नावाच्या वर्तमानपत्रात तिच्या वडिलांनी 'वर पाहिजे' अशी जाहिरात दिली होती, व त्यातूनच तिचं लग्न जमलं.

त्या काळात 'वधू पाहिजे', 'वर पाहिजे' अशा जाहिराती देणं ही गोष्ट तशी नवीनच होती. त्या काळी ओळखीतून स्थळे सुचवून लग्ने जमवली जात. लग्न जमण्याचे सगळे मार्ग खुंटले की शेवटचा उपाय म्हणून वृतपत्रात जाहिरात दिली जायची. वनिता बरीच उंच होती. आमच्या छोट्याशा वर्तुळात तिच्यापेक्षा उंच नवरा सापडणं इतकं काही सोपं नव्हतं. अखेर तिच्या वडिलांना वृत्तपत्रात जाहिरात द्यावी लागली.

मला ती जाहिरात अजून आठवते : "वर पाहिजे. उंच, चोवीस वर्षांच्या, खानदानी घराण्यातील, स्मार्त, अत्रेय गोत्राच्या, अश्विनी नक्षत्र, प्रथम चरणाच्या, कॉमर्स ग्रॅज्युएट व बँकेत नोकरी करणाऱ्या मुलीसाठी. गृहकृत्यदक्ष. एकत्र कुटुंबात राहण्याची आवड, लग्नानंतर नोकरी करण्याची अथवा घरात राहण्याची तयारी. भरतकाम, विणकामात निपुण. वर एकोणतीस ते चौतीस वर्षांचा असावा, सुमारे पाच फूट आठ इंच, याच जातीचा. पत्रिका बघायची आहे. खानदानी घराण्यातील असावा. किमान पदवीधर, बँकेत नोकरी, सरकारी नोकरी अथवा पब्लिक सेक्टरमध्ये नोकरी असावी. आईवडिलांनी लिहावे. उत्तम लग्न करून देऊ. पोस्ट बॉक्स नंबर XXX इ. इ."

वनिताला इंजिनीअर नवरा मिळाला. त्याला पब्लिक सेक्टरमध्ये उत्तम



नोकरी होती. तो वनिताच्याच जातीचा आणि एकत्र कुटुंबात राहणारा होता. वनिताच्या सासऱ्यांनी वीस तोळे सोने, पाच गर्भरेशमी साड्या, मुलासाठी सूट, संपूर्ण वऱ्हाडाच्या येण्याजाण्याचा खर्च आणि दोन्ही अंगी लग्न करून मागितले. लग्न तीन दिवस चालले होते. वनिताच्या आईवडिलांना तो खर्च जरा अंगाबाहेरच होता, पण तरी त्यांनी सर्व काही मान्य केले.

लग्नाची तयारी जोरदार चालली होती. बरेच दिवस चालली होती. आमच्या ग्रुपमध्ये पहिल्यांदा तिचंच लग्न ठरलं, त्यामुळे आम्हीपण लग्नाच्या तयारीत सहभागी झालो होतो. साड्या आणि दागिन्यांच्या खरेदीला आम्ही तिच्या बरोबर गेलो होतो. घरची वडीलधारी माणसे स्वयंपाकी शोधणे, मेजवानीची तयारी इत्यादी कामांत गुंतली होती.

आज अनेक वर्षांनंतर, वनिताच्या मुलीच्या लग्नाच्या जेवणावळीच्या वेळी मी नवपरिणित जोडप्याकडे पाहात होते. वाणी आणि तिच्या नवऱ्याचं वागणं, गप्पा मारणं असं होतं, जणू काही ते वर्षानुवर्षे एकमेकांना ओळखत असावेत. केटरर जेवणाची तयारी करत होते. वनिता बरीच थकलेली दिसत होती, पण खूप आनंदात होती. ती माझ्या शेजारी येऊन बसली.

माझ्या मनात मात्र वनिताच्याच लग्नाचे विचार चालले होते. तिच्या लग्नाविषयीचे सगळेच तपशील मला माहीत होते. पण तिच्या मुलीचं लग्न मात्र अचानक ठरलं त्यामुळे मला त्याविषयी जाणून घेण्याची उत्सुकता होती म्हणून मी तिलाच विचारलं.

वनिता हसून म्हणाली, "अग ! बाकी सगळं माझ्या लग्नासारखंच होतं. 'द हिंदू' मध्ये 'वर पाहिजे' म्हणून जाहिरात दिली होती. फक्त त्यात वरासंबंधीच्या अपेक्षा मात्र पूर्णपणे वेगळ्या दिल्या होत्या."

तो मे महिन्याचा काळ होता. प्रचंड उकडत होतं. वनितानं रेशमी साडीच्या पदराने घाम पुसला आणि हातातील पर्स उघडून एक कात्रण बाहेर काढून माझ्या हातात ठेवलं. ते त्या जाहिरातीचंच कात्रण होतं. ती म्हणाली, "वाणीच्या लग्नाच्या अल्बममधे मी हे कात्रण लावणार आहे."

मी तो मजकूर वाचला. "वर पाहिजे. स्मार्ट, सडपातळ, गोऱ्या, बावीस वर्षांच्या, आधुनिक घराण्यातील सॉफ्टवेअर इंजिनीअर, परदेशी जाण्यास उत्सुक मुलीसाठी. मुलगी कॉनव्हेंटमध्ये शिकली असून तिला विभक्त कुटुंबात राहण्याची इच्छा आहे. मुलगी मनमोकळ्या स्वभावाची आहे. कराटेचे प्रशिक्षण घेतले आहे. (ब्लॅक बेल्ट आहे.) पाश्चात्त्य संगीताची व प्रवासाची आवड आहे. मुलगा देखणा, बावीस ते पंचवीस वर्षांचा, समाजात उत्तम स्थान असलेला, वेल सेटल्ड, शक्यतो सॉफ्टवेअर क्षेत्रातील लहान कुटुंबातील असावा. मुलाने स्वतःच लिहिले तरी

चालेल. पत्रिकेची अट नाही. जातीची अट नाही.''

आपल्या मुलीचं लग्न कसं एका आठवड्याच्या आत ठरलं ते वनितानं सांगितलं.

लग्न ठरवताना कोणत्याही प्रकारचा ताणतणाव नव्हता. वाणीला सुमारे १०० पत्रे आली, पण त्यांतील पाच पत्रे विचार करण्यासारखी होती. ती वेगळी काढली. वाणी सर्व पाचही मुलांना वेगवेगळ्या वेळी भेटली. त्यांच्यातील दोघांना ती पसंत पडली नाही व दोघे तिला आवडले नाहीत. अखेरीस राहिलेला मुलगा वाणीला पसंत पडला व त्यालाही ती आवडली. मुलगा अमेरिकेत सॉफ्टवेअर इंजिनीअरची नोकरी करत होता. वाणी कॉलेजच्या शेवटच्या वर्षाला असतानाच तिचा पासपोर्ट काढलेला होता. ती केमिकल इंजिनीअर होती. पण सॉफ्टवेअर इंजिनीअर्सना केवढी मागणी आहे हे तिला पुरते ठाऊक असल्याने तिने तेही प्रशिक्षण घेतलेले होते. पुढे तिला एका सॉफ्टवेअर कंपनीत नोकरी मिळाली. आता लवकरच आपले लग्न होईल याची तिला कल्पना असल्याने तिने घाईने ड्रायव्हिंग, पोहोणे, एरोबिक्स, डाएट व न्यूट्रिशन इत्यादी शिकून घेतले.

''तिला स्वयंपाक येतो का ?'' मी विचारलं. वाणी परदेशी जाणार होती.

''त्याची काही गरज नाही. पण तिला पास्ता, सूप, नूडल्स आणि पिझ्झा येतो. शिवाय बाजारात सगळी रेडीमेड पाकिटं मिळतात. तिला स्वयंपाकघरात सर्व काही निभावून नेता येईल.''

''तू बरेच दागदागिने, साड्या वगैरेंची खरेदी केलीस का नाही ?''

''छे ग आजकाल सासरचे लोक दागदागिने किंवा हुंडा मागत नाहीत. ते आपल्या सुनेचं विमानाचं तिकिट मागतात. माझ्या मुलीचीही फार साड्या खरेदीची इच्छा नाही. ती तर साडी नेसतच नाही. फुकट खर्च. म्हणून तिनं दोन साड्या, सहा सलवार कमीज आणि दहा वेस्टर्न कपड्यांचे सेट घेतले. नाही तरी पुढे तिला तेच उपयोगी पडणार आहेत ना. आणि आम्ही वजनाने हलकेच दागिने केले आहेत.''

काळ कसा बदललाय, ते पाहून मी थक्क झाले. 'वधू पाहिजे-वर पाहिजे' जाहिराती वाचल्या तरी जुन्या जमान्यापेक्षा आज ठरवून लग्न करण्याच्या बाबतीतही किती फरक पडत गेलाय, ते जाणवतं. नाही तर बदल हा आयुष्यात फारच महत्त्वाचा आहे. अत्यावश्यक आहे. परिस्थितीप्रमाणे चालीरीती बदलतात, लोक बदलतात. नाही तर जीवनामध्ये परिवर्तनाइतकी निश्चिती दुसऱ्या कशाचीच नाही असं म्हणतात ना, तेच खरं.

○○○



४०

# असा असावा उमेदवार.....

काही दिवसांपूर्वीची गोष्ट. एका लहान कंपनीला सॉफ्टवेअर इंजिनीअरची भरती करायची होती. इंटरव्ह्यू घेणाऱ्यांमध्ये मीपण होते. मुलाखतीला कधी बोलावणे येते त्याची वाट बघत बाहेर अनेक मुले व मुली बसल्या होत्या. सर्व जण २१ ते २४ या वयोगटातील होते. बऱ्याच मुलांचा हा पहिलाच इंटरव्ह्यू होता, त्यामुळे ती एक प्रकारच्या दडपणाखाली असल्यासारखी दिसत होती. सर्व जण कॉम्प्युटर या विषयात पदवीधर होते, त्यामुळे त्यांचं त्या विषयाचं ज्ञान चांगलं सखोल असणार अशी माझी अपेक्षा होती.

इंटरव्ह्यूसाठी एक तरुण मुलगा आत आला. त्याचे मॅनर्स वगैरे उत्तम होते. आत आल्याआल्याच त्याने आपली प्रमाणपत्रे सादर केली. सर्व प्रमाणपत्रांच्या वर जावा, जी डब्ल्यू बेसिक, सी प्लस प्लस इत्यादीचे त्याला ज्ञान असल्याचे सिद्ध करणारी प्रमाणपत्रे लावलेली होती.

मी सहज त्याला विचारले, 'एखादी नवी कॉम्प्युटर लँग्वेज शिकायला तुम्हाला किती वेळ लागेल ?'

''सहा महिन्यांहून जास्त नाही,'' त्याने उत्तर दिले.

अचानक माझे मन पंचवीस वर्षे मागे गेले. मी तेव्हा याच वयाच्या एका तरुणाचा इंटरव्ह्यू घेत होते. त्यालासुद्धा मी असाच प्रश्न विचारला होता. पण त्याने मला जे काही उत्तर दिले होते, ते या उत्तरापेक्षा बरेच वेगळे होते.

त्या मुलाने अत्यंत आत्मविश्वासाने मला उत्तर दिले होते, ''मला कॉम्प्युटर या विषयातील किंवा त्याच्या लँग्वेजविषयी काहीही माहीत नाही. पण मला तुम्ही चार महिन्यांचा कालावधी द्या. मी कॉम्प्युटर समजावून घेण्याचा प्रयत्न करीन आणि मला लँग्वेज शिकायला किती वेळ लागतो, ते मी तुम्हाला स्वत: येऊन सांगेन.''

त्याचा तो आत्मविश्वास आणि उत्तर देण्यामागचा प्रांजळपणा पाहून मी

थक्क झाले होते. मला अजूनही तो प्रसंग अगदी जसाच्या तसा आठवतो.

ही गोष्ट मुंबईत घडली होती. मी इंटरव्ह्यू पॅनेलवर होते. हा तरुण मुलगा मुळात सिव्हिल इंजिनीअर होता, व तो इंटरव्ह्यूसाठी आला होता. सॉफ्टवेअर इंजिनीअरची जागा भरायची होती. आधीच्या बऱ्याच लोकांचे इंटरव्ह्यू चांगले झाले होते, व हा शेवटचा उमेदवार होता. पण इंटरव्ह्यू देण्यासाठी तो जेव्हा आत आला तेव्हा त्याने अत्यंत मनमोकळेपणे, निर्भीडपणे उत्तरे दिली. मग त्याला एक लॉजिकवर (तर्क-शास्त्रावर) आधारित टेस्ट देण्यात आली. ती कॉम्प्युटर विषयाशी संबंधित नव्हती. पण त्याने ती टेस्ट अत्यंत झटपट सोडवली. आपल्याला कॉम्प्युटर विषयातील काहीही ज्ञान नसल्याची गोष्ट त्याने प्रांजळपणे कबूल केली. पण तो विषय शिकण्याची मात्र त्याची पूर्णपणे तयारी होती व आपल्याला तो विषय नीट जमल्यास आपल्याला हा जॉब मिळेल, अशीही त्याला आशा वाटत होती.

त्याला तो जॉब मिळाला. त्याने नंतर अथकपणे परिश्रम केले व परत सांगत आला. "आता मला कोणतीही कॉम्प्युटर लँग्वेज द्या. मी ती दहा दिवसांत शिकेन. त्यात पारंगत होईन. कॉम्प्युटर लँग्वेज हे तर नुसते साधन आहे. प्रोग्रॅमिंगचा गाभा म्हणजे लॉजिक विषय उत्तम समजला पाहिजे. त्यात पारंगत होता आले पाहिजे."

थोड्याच काळात त्याने अनेक कॉम्प्युटर लँग्वेजेस शिकून घेतल्या. आज माझ्या माहितीतील काही अत्यंत यशस्वी प्रोग्रॅमर्सपैकी तो एक आहे.

तो खरं तर वयाने लहान, ऑफिसात ज्युनियर पण कितीतरी वरिष्ठ त्याला वेगवेगळ्या बाबतीत मत विचारायचे. अगदी मीसुद्धा आपले काम सुरू करण्याआधी तो खूप अभ्यास करायचा, मेहनत घ्यायचा, विषय समजून घ्यायचा, आणि मग त्याने एकदा का प्रोग्रॅम लिहायला सुरुवात केली, की मात्र त्यात काहीही चूक नसायची.

आजही जेव्हा एखादा तरुण कॉम्प्युटर विषयात बोलू लागतो तेव्हा या बुद्धिमान तरुणाची मला आठवण होते. त्याची ज्ञानार्जनाची तयारी आणि त्याचा स्तिमित करणारा प्रांजळपणा आजही मला आठवतो. आज आमच्या कॉलेजांमधून अशाच प्रकारचे विद्यार्थी निर्माण व्हावे, यासाठी मी देवाची प्रार्थना करते.

ooo



४१

# सॉरी... द लाईन ईज बिझी

राकेश हा माझा वर्गमित्र. आम्ही एकाच शाळेत शिकलो आणि पुढे कॉलेजातही एकत्रच होतो. एव्हाना तो आमच्या कुटुंबाचाच एक भाग बनून गेला होता आणि मी त्यांच्या. पुढे जसे वय मोठे झाले तशी आमची क्षेत्रे बदलली. व्यवसाय वेगळे झाले. आम्ही दूर गेलो आणि स्थिरस्थावर झालो. आम्ही आपापल्या कुटुंबीयांमध्ये, आपापल्या जगामध्ये व्यस्त झालो. एकाच शहरात राहूनसुद्धा आमची गाठभेट होईना. खरं तर आम्हांला एकमेकांना भेटण्याची नेहमी इच्छा होई.

राकेशचा वाढदिवस होता. मला त्या दिवशी त्याची आठवण झाली. त्याला फोन करून शुभेच्छा द्यायच्या, असं मी ठरवलं. पण सकाळपासून त्याचा टेलिफोन काही केल्या लागत नव्हता. कदाचित असंही असेल की त्याचा वाढदिवस असल्याने सकाळपासून त्याला शुभेच्छांचे पुष्कळ फोन येत असतील. त्यामुळे मग आपण त्याला जरा उशिराने, दुपारीच फोन करावा, असं मी ठरवलं. पण तेव्हाही फोन लागण्याचे नाव नाही. सतत आपली लाईन बिझी. आता मात्र मला वाटलं, यानं घरातले फोनच खाली काढून ठेवलेले दिसतायत.

रात्री खूप उशिराने परत एकदा प्रयत्न करून पाहिला, तरी फोन लागेना. कदाचित त्याच्या घरचे फोन बिघडले असतील, मी मनात म्हणाले.

सुमारे महिन्यानंतर माझी आणि राकेशची एका पार्टीत गाठ पडली.

मी फारच 'बिझी' झाल्यामुळे मला आपल्या मित्राच्या वाढदिवसाला साधा एक फोन करायलाही अलीकडे जमत नाही, असं राकेश उपरोधाने माझ्याकडे बघत म्हणाला. तो बराच रागात होता.

मी खूप वेळा फोन करण्याचा प्रयत्न केला, पण फोन लागत नव्हता, असं सांगून मी त्याचा प्रतिकार केला. ते ऐकून त्याला धक्का बसला.

"आजकाल नाहीतरी फोन इतके बेभरवशाचे झाले आहेत. सारख्या काही

ना काही दुरुस्त्या, सारखे लाईनमधे काही बिघाड. लाईन आऊट ऑफ ऑर्डर... !''

असं आमचं बोलणं चालू होतं, तेवढ्यात तारानं, राकेशच्या पत्नीनं आम्हांला थांबवलं. तारा अत्यंत संवेदनशील पण रोखठोक स्वभावाची.

''हे बघा, उगीच त्या टेलिफोन खात्याच्या डोक्यावर कशाला खापर फोडताय ? सगळी चूक तर आपल्या घरच्यांचीच आहे.''

तिचं ते बोलणं ऐकून मला आश्चर्य वाटलं. ''घरी काही घडलं का ?'' मी विचारलं.

''हो. आमच्या घरी माझी दोन तरुण मुलं आहेत. विशीच्या आतली. जेव्हा कधी आम्हांला फोन करायचा असतो तेव्हा या दोघांनी आमच्या घरचे दोन्ही फोन अडवलेले असतात.''

''पण दिवसभर तर नसतील ना ?'' मी म्हणाले. माझा काही तिच्या बोलण्यावर विश्वास बसेना.

''होय. दिवसभर. त्या दोघांच्याही खोलीत पॅरलल लाईन्स आहेत. आर्थिक समृद्धीमुळे आमचं दैनंदिन जीवन सगळं बिनसलं आहे.''

ती अत्यंत रागात होती, हे तिच्या स्वरावरून मी जाणलं.

''आपल्याला सगळ्यांनाच आजकाल एक नाही तर दोन मुलं असतात आणि आपण त्यांचे नसते लाड करतो,'' ती पुढे म्हणाली, ''आता माझ्याच मुली पाहा. दोघींना दोन वेगवेगळ्या खोल्या आहेत. घरात दोन फोन आहेत. आणि या दोघी मुली अक्षरशः पाण्यासारखे फोन वापरतात.''

''मग तुमची टेलिफोनची बिलं किती येतात ?'' माझ्या गणिती डोक्यात लगेच प्रश्न उत्पन्न झाला.

''बिलाची काळजी इथे कुणाला आहे ? सगळ्या मुलांना माहीत असतं, की मोठमोठ्या कंपन्यांमध्ये काम करणाऱ्या अधिकाऱ्यांना फोनची सुविधा 'पर्क' म्हणून दिलेली असते. टेलिफोनची बिलं कंपनी भरते. शिवाय त्यांना या गोष्टीचं महत्त्व नसतं. मला काळजी वाटते ती, त्यांचं सतत मित्रमैत्रिणींबरोबर जे संभाषण चाललेलं असतं ना, त्याची. ही मुलं फोनवरून गणितं सोडवतात. फोनवर एकमेकांना विनोदी चुटके सांगतात. इतकंच काय, फोनवरून पुस्तकं वाचून दाखवतात.''

''खरंच ? मी हे कधीच ऐकलं नव्हतं'' आपल्या घरात काय चाललेलं असतं त्याविषयीचं राकेशचं अज्ञान उघड झालं.

''होय'', तारा म्हणाली, ''नेहमी बोलतानाचा त्यांचा आवाज ऐकावा... चांगला खणखणीत असतो. पण फोनवर बोलायला लागली.... की नुसती कुजबुजत असतात. अगदी कान देऊन ऐकल्याशिवाय, काय बोलतायत ते कळतही नाही.''

''पण तुम्ही जर फोनला कुलूप घातलं, तर काय होईल ?'' मी सुचवलं.

''त्याचा काहीही उपयोग नाही. त्यांच्या मित्रांचे आमच्याकडे फोन येतातच. फोनच्या लाईन्स बिझी राहणार त्या राहणारच.''

''आणि मग ही मुलं रात्री काय करतात ?''

''उरलेला वेळ त्यांचं कॉम्प्युटरवर चॅट चालू असतं. त्यामुळे मग इंटरनेटला फोन जोडतात. मग तर काही बघायलाच नको. तुम्ही काहीही बोलायला गेलात, तरी त्यांच्या डोक्यातच शिरत नाही ते.''

''कोणत्याही गोष्टीचा अतिरेक झाला की तो वाईटच,'' तारा बोलतच राहिली. ''टेलिफोन हे खरं तर दळणवळणाचं साधन. संपर्क साधण्यासाठी ते वापरायचं. पण आपल्याला ते आणीबाणीच्या परिस्थितीतसुद्धा वापरायला मिळेनासं झालं, तर मग करायचं तरी काय ? मला तर अतिशय नैराश्य येतं. आजच्या सोयी आणि सुविधा मुलांसाठी उपलब्ध आहेत, त्यांचा ही मुलं गैरवापर करतात. एखादी गोष्ट हवीशी वाटल्याची आपली इच्छा कशी दाबून ठेवावी, मन कसं मारावं, याची त्यांना काही सवयच नाही मुळी !'' तारा सुस्कारा टाकून दुःखानं म्हणाली.

अशा कितीक तारा आपल्यामधे असतील, याची मला खात्रीच आहे. दिवस पालटले आहेत. पण तारा जे काही म्हणते त्यात तथ्य आहे. आपली वडीलधारी माणसं त्यांच्या अनुभवातूनच आपल्याला चार शब्द सांगत आहेत हे या मुलांना समजत नाही. कदाचित ही मुलं स्वतः जेव्हा मोठी होतील, आईवडील बनतील व त्यांची मुलं त्यांचं ऐकणार नाहीत, तेव्हा त्यांना चांगल्या उपदेशाचं महत्त्व समजेल.

ooo

## ४२

# इतरांचाही विचार करा

एकदा माझ्या आत्याने मला तिच्या महिला मंडळात एका कार्यक्रमाची अध्यक्षा म्हणून नेले. कधीकधी समोरच्या श्रोत्यांना आपण कोणत्या विषयावर बोललं तर त्यात रस वाटेल हे मला समजत नाही. त्यामुळे जराशी पंचाईत होते.

संयोजकांमध्ये एकामेकांच्यात काहीतरी गैरसमजामुळे वेळेच्या बाबतीत थोडी गडबड झाली होती. त्यामुळे त्यांनी कार्यक्रम जिथे होता त्या हॉलला लागून असलेल्या खोलीत मला बसवलं होतं. तिथे बसून आजूबाजूच्या इतरांचं निरीक्षण करण्यावाचून मला दुसरं काहीच काम नव्हतं. नाही तरी एखादं पुस्तक घेऊन वाचत बसण्यापेक्षा लोकांच्या वागण्याचं निरीक्षण करणं कितीतरी मजेशीर असतं.

हे महिला मंडळ बंगलोरच्या उच्चभ्रू वस्तीत आहे. त्या मंडळाचा समाजात चांगला नावलौकिक आहे. त्याच्या सर्व सभासद महिला उच्चमध्यमवर्गीय गटातील असून त्यांनी भरपूर प्रवास केलेला आहे, आयुष्यात चांगल्या स्थिरस्थावर झालेल्या आहेत. त्या सर्वांची आपापसांत वेगवेगळ्या विषयांवर चर्चा चालू होती - सिल्कच्या साड्यांचा सेल, गावात चालू असलेला नवा इंग्रजी चित्रपट इत्यादी इत्यादी.

माझी आत्या आपल्या मैत्रिणीशी - शांताशी बोलत होती. दोघी संभाषणात गर्क होऊन गेल्या होत्या. माझ्या आत्याचा आवाज चांगला खणखणीत होता. त्यामुळे मी त्यांच्यापासून बरीच लांब बसले असूनसुद्धा मला त्यांचं संभाषण नीट ऐकू येत होतं.

"पण तुझ्या सुनेचं हे चुकलंच," माझ्या आत्यानं सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधीशांच्या थाटात निर्णय देऊन टाकला. आपला निर्णय अगदी शंभर टक्के बरोबर असल्याची तिची खात्रीच होती, तरी पण तिनं मला त्या संभाषणात ओढलं, माझं मत जाणून घेण्यासाठी !

"जरा विचार कर. तिनं तरी असं वागणं योग्य आहे का ?"



"पण ती म्हणजे कोण ?"

"शांताची सून, रश्मी. तिला सुखासीन आयुष्य जगायचं असतं. मुलांच्या शाळांना सुट्ट्या लागल्या की कुठेतरी खूप लांबच्या ठिकाणी जाऊन आराम करावा, अशी तिची इच्छा असते."

माझ्या चेहऱ्यावरचे गोंधळल्याचे भाव पाहून माझ्या आत्यानं मला सगळं नीट समजावून सांगायचं ठरवलं.

"रश्मीच्या सासरची माणसं, म्हणजे या शांताच्या घरचे लोक चांगले श्रीमंत आहेत. पण ते कष्ट करून, मेहनतीच्या जोरावर श्रीमंत झाले आहेत. ही रश्मी अगदी बेताच्या परिस्थितीतील मध्यमवर्गीय कुटुंबातील आहे. आणि तिनं हा पैसा स्वत: मिळवला नसला, तरी तो तिला उडवायला आवडतो. तिला दर महिन्याला नवे कपडे घ्यायचे असतात. नवरा घरी आला की लगेच त्याच्या बरोबर सिनेमाला नाही तर कुठेतरी बाहेर जायचं असतं. सकाळीसुद्धा ती खूप उशिरा उठते..." तक्रारींची यादी संपत नव्हती.

मला ते ऐकताच माझ्या आतेबहिणीची, याच आत्याची मुलगी राधिका, हिची आठवण आली.

राधिकाचंही लग्न एका सधन घरातील उद्योगपती कुटुंबातील मुलाशी झालं होतं. राधिका लग्नाआधी एका शाळेत शिक्षिका होती व तिला कामाची चांगलीच सवय होती. तिच्या लग्नानंतर एकदा ती आमच्या घरी मला भेटायला आली होती. तिला पाहून माझा तर माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. ती एखाद्या फुग्याप्रमाणे फुगली होती. तिच्या अंगावर महागडी साडी होती, भरपूर दागिने होते.

राधिकाने मला तिचा नेहमीचा दिनक्रम सांगितला. "मी रोज सकाळी नऊच्या सुमाराला उठते."

"इतकं उशिरा का ?"

"अग घरात इतके नोकरचाकर आहेत, सगळं काम तेच करतात. मग मी उगाच कशाला लवकर उठू ? मी लग्नाआधी पुष्कळ कष्टाची कामं केली आहेत. महेश त्याच्या कामात गर्क असतो. त्यामुळे तो ऑफिसातून घरी येईपर्यंत मी त्याची वाट पाहात बसून असते. तो घरी आला की मला सिनेमला नाही तर फिरायला जावंसं वाटतंच. मी फारसं जग हिंडलेली नाहीये. वर्षभर दोघा मुलांना सांभाळायचं म्हणजे चांगलंच थकायला होतं. म्हणून मी महेशला सांगूनच टाकलंय - दर वर्षी आपण कुठेतरी परदेशात सुटीला जायचं. मग नेपाळ असो नाही तर श्रीलंका. पण शाळांना सुटी लागली की परदेशी जायचंच."

राधिकाचं त्या वेळचं ते बोलणं मला आत्ता आठवलं व मी माझ्या आत्याला म्हणाले, "खरंच. राधिका कशी आहे ?"

"ती बरी आहे. बिचारी. तिची सासू फार कटकटी आहे. ती प्रत्येक बाबतीत बोलते. खरं तर आमच्या राधिकासारखी सून मिळाली, म्हणजे ती किती नशीबवान आहे, बघा. तिला या रश्मीसारखी सून मिळाली असती ना, म्हणजे मग माझ्या मुलीची किंमत कळली असती."

ते ऐकून मला अस्वस्थ वाटलं. या वयानं इतक्या मोठ्या स्त्रिया, चांगल्या शिकलेल्या सवरलेल्या, पण इथे शाळकरी मुलांसारख्या वागत होत्या. आपली मुलगी जे काही वागेल ते सगळं बरोबर पण तसंच जर सून वागली तर ते मात्र चूक. एक आपली मुलगी आणि दुसरी सून म्हटल्यावर लगेच दोघींना वेगवेगळ्या मापानं मोजायचं, ही कुठली रीत ?

आज जमलेल्या महिलांपुढे कोणत्या विषयावर बोलायचं हा प्रश्न मला आत्तापर्यंत पडला होता. पण तो आता चुटकीसरशी सुटला. सारं काही स्पष्ट झालं. माझा विषय ठरला. 'दुसऱ्याचाही जरा विचार करा.' आपण आयुष्यात फार काही मिळवलं नाही तरी चालेल. पण दुसऱ्याचा विचार करणं हा फार मोठा गुण आहे; हे आपण समजून घेतलं पाहिजे.

००० 



## ४३

# बॉंडेड बाय बिसलरी

सव्वीस जानेवारी रोजी गुजरातेतील कच्छ येथे झालेला प्रलयंकारी भूकंप सर्वांना माहीतच आहे. पृथ्वीमातेने अचानक आपला जबडा उघडला आणि माणसांना त्यांच्या मालमत्तेसह, साधनसंपत्तीसह गिळंकृत करून टाकलं. एका रात्रीत रावाचा रंक बनला. पण कच्छी लोकांचं नीतिधैर्य अफाट. खरोखर वाखाणण्याजोगं. त्यांनी या संकटाचा धीरोदात्तपणे सामना केला. विस्कटलेलं आयुष्य पूर्ववत आणण्यासाठी त्यांची अजूनही धडपड चालूच आहे.

भूकंपग्रस्तांच्या सुटकेसाठी आणि मदतीसाठी चाललेल्या प्रयत्नांमध्ये प्रसार माध्यमांनी अत्यंत महत्त्वाची भूमिका बजावली व त्याबद्दल ते खरोखरच अभिनंदनास पात्र आहेत. भूकंपाची ती दुर्घटना घडल्यानंतर केवळ काही तासांतच सर्व वृत्तपत्रांचे आणि दूरदर्शन वाहिन्यांचे प्रतिनिधी घटनास्थळी पोचले आणि त्यांनी दुर्घटनेचे सविस्तर वृत्त जगभर प्रसारित केले. भारताबरोबरच जगभरातून या दुर्दैवी माणसांकडे मदतीचा ओघ सुरू झाला.

टी. व्ही. बातमीदारांच्या व प्रसारमाध्यमांच्या प्रतिनिधींच्या पाठोपाठ शेकडो बिगरसरकारी संस्थाचे कार्यकर्ते आणि सरकारी अधिकारी कच्छला येऊन दाखल झाले. लोकांनी आपलं उद्ध्वस्त झालेलं आयुष्य पुनश्च एकवार सावरण्याचा प्रयत्न सुरू केला. हळूहळू जीवन पूर्ववत सुरू होऊ लागलं.

घटनेनंतर काही दिवसांनी मीही आपद्ग्रस्त भागाच्या भेटीसाठी गेले. एव्हाना प्रचाराची धूळ खाली बसली होती, त्यामुळे तेथील वास्तव, तेथील खरंखुरं जीवन पाहण्यासाठी मी गेले. अखेर भावनांचा आवेग ओसरला होता आणि सत्याला, खऱ्याखुऱ्या वास्तवाला प्राधान्य मिळू लागलं होतं.

या भूकंपामुळे कच्छच्या अंतर्भागात असलेली अनेक लहान लहान खेडी, अहमदाबाद-भूज या मेनरोडपासून बरीच आत असणारी खेडी उद्ध्वस्त झाली

होती. बाहेरच्या लोकांना फारशा माहीत नसलेल्या या खेड्यांमध्ये भेटीला जाण्यासाठी मी निघाले होते. वाटेत माझ्या जीपचे टायर पंक्चर झाले. आता त्याची दुरुस्ती करून घेण्यात थोडा तरी वेळ मोडणार होता. त्या कामासाठी माझा ड्रायव्हर गेला.

गुजरातमध्ये विशेषत: कच्छमध्ये स्त्रियांच्या सुरक्षिततेची कधी चिंता नसते. त्यासाठी तो भाग प्रसिद्ध आहे. मी एकटीच होते, जरा कंटाळले होते. इकडेतिकडे पाहिलं तर काही छावण्या दिसल्या. निळ्या रंगाच्या प्लॅस्टिकच्या कापडाने आच्छादलेल्या त्या तात्पुरत्या उभारलेल्या छावण्या होत्या. त्या भागात राहणाऱ्या लोकांसाठी तात्पुरती घरे, शाळा आणि आरोग्य केंद्रे त्या छावण्यांमधे होती. नंतर मी ऐकलं, की काही तंबूंमध्ये हॉटेल्सपण होती.

आयुष्य धावपळीत चाललं होतं. लोक आपली दैनंदिन कामे उरकत होते. पावसाळा तोंडावर आला होता त्यामुळे स्त्री-पुरुष शेतीची कामे करत होते. किती चमत्कारिक परिस्थिती. गेल्या काही वर्षांमध्ये कच्छमधे पुरेसा पाऊस पडला नव्हता. पण नेमका या वर्षी चांगला पाऊस झाला होत. जोरदार पीक आलं होतं. कदाचित निसर्गाचा हा स्वत:चा न्याय असावा. एका हातानं ही निसर्गदेवता खरंच काही काढून घेते तर दुसऱ्या हातानं त्या मोबदल्यात काहीतरी परत देते. लहान मुलं मजेत खेळत होती.

मी जवळच्या एका तंबूत डोकावले. सुमारे चौदा वर्षांची एक मुलगी धान्य निवडत बसली होती. बहुधा स्वयंपाकाची तयारी चालली असावी. मला पाहताच ती उठून उभी राहिली आणि हसून म्हणाली, ''या...ना... आत या. बसा ना.''

ही माणसं कशी राहात आहेत, ते मला बघायचं होतं, त्यामुळे मी आत शिरले. तिने मला बसायला एक चारपाई दिली. तंबूच्या आत स्वच्छता व टापटीप दिसून येत होती. मधोमध एक साडी टांगून तंबूचे दोन भाग केले होते. त्या मुलीशी बोलल्यावर मला कळलं - त्यांचं कुटुंब कच्छमधलं नव्हतं.

ती मुलगी ग्लासभर पाणी घेऊन बाहेर आली. पावसाळा असला तरी खूप गरम होत होतं. पाणी प्यावं का नाही... अशा विचारात मी पडले. जरा घुटमळले. मनात खूप विचार चमकून गेले. पाणी जर स्वच्छ नसलं तर अतिसार, कावीळ इत्यादी रोगांची लागण होण्याचा धोका. पण जर पाणी प्यायला नको म्हटलं, तर या बिचाऱ्या मुलीला वाईट वाटायचं. त्यामुळे मग मी तिच्या हातातून ग्लास घेतला खरा, पण पाणी प्यायले नाही.

त्या मुलीला एक लहान बहीण होती. असेल साधारण १२ वर्षांची. बाजूला एक झोळी टांगली होती. त्यात एक लहान मुलगा झोपला होता. बाहेरच्या बाजूला



तात्पुरतं स्वयंपाकघर उघड्यावरच थाटलेलं होतं. चुलीवर भाजी शिजत होती. मोठी मुलगी कणीक मळत होती.

मी उत्सुकतेनं विचारलं, ''तुमच्या भाषेवरून तर तुम्ही गुजरातमधले वाटत नाही. तुम्ही कुणीकडचे ?''

छोटी मुलगी हसून म्हणाली, ''आम्ही गुजरातमधले नाहीच आहोत, आम्ही मुंबईचे आहोत.''

''मग तुम्ही इथे तुमच्या नातेवाईकांना भेटायला आला आहात का ?''

''नाही. आमचे कुणी नातेवाईक नाहीत इकडे. हे आमचंच घर आहे. आम्ही आमच्या आईवडिलांबरोबर इकडे आलोय.''

त्यांचं ते उत्तर ऐकून मी चकित झाले. वास्तविक असा दुर्घटनाग्रस्त भाग सोडून निघून जाण्याची लोकांची प्रवृत्ती असते, आणि इथे हे लोक तर मुद्दाम इकडे राहायला आले होते.

''मग तुमचे वडील इथे काय करतात ?''

दोघीही मला माहिती पुरवण्यासाठी उतावीळ दिसत होत्या. मोठी म्हणाली, ''माझे वडील मुंबईला माहीमच्या खाडीपाशी, चर्चच्या जवळ भीक मागायचे. चर्चच्या दारात माझी आई मेणबत्त्या विकायची.''

''मग तुम्ही इकडे कशामुळे आलात ?''

''एक दिवस टी. व्ही.वर बातम्यांमध्ये कळलं या भागात भूकंप झालाय असं. कोपऱ्यावरच्या दुकानातल्या टी.व्ही.वर दर तासातासाला बातम्या दाखवत होते. माझे वडील म्हणाले, 'चला, आपण तिकडं जाऊ.' मग आम्ही इकडे आलो.''

''पण तुमच्या तिकिटांचे पैसे कोणी दिले ?''

''कुणीच नाही. आम्ही बिगरतिकिटच इकडे आलो. सगळी गाडी माणसांनी भरली होती. आमच्यासारखी खूप माणसं इकडे आली आहेत. आख्खं स्टेशन माणसांनी भरलेलं होतं. एवढी गर्दी होती. तिकिटं कोणी तपासलीच नाहीत.''

''मग तुम्ही या भागात कसे काय आलात ?''

''आमच्या ओळखीचं कोणीच नव्हतं. पण स्टेशनवरून भूजकडे जायला खूप बसेस होत्या. परदेशातून कितीतरी स्वयंसेवक आले होते. बस खच्चून भरल्या होत्या. मग आम्हीपण एका बसमधे शिरलो आणि मेनरोडवर उतरलो.''

ही कहाणी खरी होती पण किती विलक्षण होती. ''पण तुम्ही या विशिष्ट भागात कसे येऊन पोचलात ?''

''मेन रोडवरून आतल्या भागी असणाऱ्या खेड्यांपर्यंत जाणाऱ्या अनेक

जीपगाड्या होत्या. मेनरोडवर ट्रक्सचा एक मोठाच्या मोठा ताफा उभा होता. त्यांच्यात खूप सामानसुमान भरलेलं होतं. ते लोक रस्त्याच्या कडेला ते सामान उतरवून ठेवत होते. ज्या लोकांकडे काहीच नव्हतं, ते त्या सामानातून आपल्याला पाहिजे त्या गोष्टी उचलून नेत होते. आम्ही पण काही गोष्टी घेतल्या.''

''रस्त्याच्या कडेला नक्की काय काय सामान होतं ?''

''खाण्याच्या खूप गोष्टी होत्या. सफरचंद, बिस्किटांचे पुडे, कपडे, गरम पांघरुणे, आणखी खूप काही होतं. आमच्यापैकी प्रत्येकाने जमेल तेवढं घ्यावं असं आमच्या वडिलांनी सांगितलं. आम्ही भरपूर गोष्टी उचलून आणल्या. मुंबईत कधी जन्मात एवढ्या गोष्टी आम्हांला बघायला मिळाल्या नव्हत्या. आणि सगळं भरपूर होतं.''

लहान मुलं निर्व्याज असतात. ती नेहमी खरं बोलतात. पुढे मोठी झाली की मात्र त्यांच्या आयुष्यात असत्य चोरपावलानं शिरतं. आपण जे काही नसू ते दाखवण्यासाठी, खोटा आव आणून घमेंड मारण्यासाठी माणसं खोटं बोलतात. पण लहान मुलांच्या ठायी भरपूर आत्मविश्वास असतो. त्यामुळे त्यांना कोणतंही ढोंग करता येत नाही. त्यामुळे मुंबईच्या त्या भिकाऱ्याच्या मुलींनी तो सर्वच प्रसंग अगदी मनापासून रंगवून सांगितला. जशी काही आठवण काढत राहण्यासारखी गोष्ट असल्यासारखा.

मोठी मुलगी तर याहूनही बरंच काही बोलून गेली. ''खूप लोक रडत होते. काही वेदनांनी तळमळत होते. कोणाची मुलं हरवली होती, तर कोणाचे आईवडील. ते बघून खूप वाईट वाटत होतं. पण मदतीलासुद्धा खूप लोक धावून आले होते. डॉक्टर्स तर रात्रभर काम करत होते. काही स्वामीजी साध्या माणसांप्रमाणे कामाला लागले होते, औषधे वाटत होते. आर्मीचे लोक राहुट्या उभारण्यासाठी जमीन खणत होते. रात्रीत आणि दिवसात फरक नव्हता, श्रीमंतांच्यात आणि गरीबांच्यात फरक नव्हता.

''त्या मानानं आमची स्थिती खूप चांगली होती. आमचं कोणी हरवलं नव्हतं, आमचं सामानसुमान गेलं नव्हतं. कारण मुळात आमच्याकडे काहीच नव्हतं. ज्यांच्याकडे काही असतं, त्यांना ते हरवण्याची भीती असते. पण ज्यांच्याकडे काहीच नसतं, त्यांना कशाची भीती ? माझ्या आईवडिलांनी बऱ्याच लोकांना मदत केली. कोणीतरी म्हणालं : तिकडे खेड्यात मदत करायला फारशी माणसे नाहीत. मेनरोडपासून त्या खेड्यांपर्यंत जीपगाड्यांची सारखी ये-जा चालू होती. मग आम्ही एका जीपमध्ये चढलो आणि या गावात आलो. कुठलीतरी संस्था बांबू, तंबू उभारायचं सामानसुमान फुकट देत होती, ज्यांची घरं गेली होती, त्या सगळ्यांना.



आम्हांलाही घर नव्हतं. मग आम्ही पण त्यांच्याकडून सामान आणलं.

''कधी कधी तर माझी आई एका रांगेत उभी राहायची आणि माझे वडील एका रांगेत. मग आम्हांला दुप्पट सामान मिळायचं.''

''तुमच्याकडे काय काय आहे ?''

''खाण्याचं सामान पुष्कळ आहे. आम्ही रोज पोटभर जेवतो. काही काही लोकांना रांगेत उभं राहायला जमलं नव्हतं. त्यांनासुद्धा आम्ही आमच्यातलं देतो. उपाशी पोटी राहणं किती कठीण असतं, ते माहीत आहे आम्हांला.''

''तुम्ही याच ठिकाणी येऊन का बरं स्थायिक झालात ?''

''मुंबईत माझ्या वडिलांना दम्याचा त्रास होता. त्यांना अनेकदा श्वासही घेणं कठीण व्हायचं. आमच्यावर उपाशी राहण्याची पाळी यायची. दूषित हवेमुळे तसं होतं, असं कुणीतरी म्हणालं होतं. ते खरंच असावं. कारण इथे आल्यापासून त्यांची प्रकृती व्यवस्थित आहे, कारण येथील हवा दूषित नाही ना. शिवाय आता आम्ही इथे आमचं घरही बांधलंय त्यामुळे मग आम्ही कायमचं इथेच राहायचं ठरवलं.

''तुमचे वडील इथे काय करतात ? अजूनही भीक मागतात ?''

''नाही. आता आम्ही आमच्या पायांवर उभे आहोत. जवळच्या शेतात ते मजुरी करतात. त्यांना दिवसाला शंभर रुपये मिळतात. आईपण तेच काम करते. दोघांचे मिळून दुप्पट पैसे येतात. आम्ही सुखात आहोत. हा भूकंप म्हणजे आमच्या दृष्टीनं वरदानच ठरलं.''

मग तिने तिच्या बहिणीला चहा करून आणायला सांगितलं. बरोबर बिस्किटंही आणायला सांगितली. मला कोणत्या कंपनीचा चहा आवडतो असं जरी तिनं विचारलं नसलं तरी 'कोणती बिस्किटं आवडतात ?' असं मात्र विचारलं.

''तुमच्याकडे वेगळ्यावेगळ्या प्रकारची बिस्कटं आहेत ?''

मी आश्चर्यानं थक्क होऊन विचारलं.

तिने पडदा बाजूला सारला. आतमधे विविध प्रकारच्या बिस्किटांचे पुडे आणि बिसलरीच्या बाटल्यांची खोकी, भांडीकुंडी, स्टीलच्या ट्रंका आणि कितीतरी गोष्टी होत्या.

''भूकंप झाला त्या दिवसापासून इथे आम्ही बरेच जण बिसलरीचंच पाणी पितो. बहुतेक कुठून तरी परदेशातून जहाज भरून बिसलरीच्या बाटल्या इकडे आल्या आहेत. मी तुम्हाला मगाशी प्यायला पाणी आणलं ना, ते पण बिसलरीचं आहे.''

मी ते पाणी समाधानानं प्यायलं.

ooo

## ४४

# कुछ भी होता है...

एक रविवारची सकाळ. अचानकपणे एक अनपेक्षित पाहुणा घरी आला. तो माझा लहानपणाचा मित्र. तेव्हा आम्ही एकमेकांच्या शेजारीच राहात होतो. पण गेल्या पस्तीस वर्षांत आमची एकमेकांशी गाठभेट झाली नव्हती. आज अचानक, काही न कळवता सवरता आपल्या मुलाला घेऊन तो असतो. आम्ही शेवटचं भेटलो त्यानंतर बरंच काही घडलं होतं. एके काळचा देखणा विशीच्या आतला तरुण असलेला तो माझा मित्र आता बुटका, थकलेला दिसत होता. डोक्याचे केस विरळ झालेले, पोट सुटलेलं. तेव्हा केवढ्या आत्मविश्वासानं तो बोलायचा, गप्पा मारायचा पण आता जरा घाबरत, घुटमळत बोलत होता. मी त्याला कशी काय दिसले असेन, कोण जाणे.

त्याला भेटून मला खूप आनंद झाला. लहानपणी आम्ही एकत्र घालवलेला तो काळ फार छान होता, मनाच्या कोपऱ्यात कुठेतरी स्वच्छंदी दिवस मला आठवत होते. चित्रा आणि जगजित सिंग यांनी गायलेली ती गझल... 'ओ कागज़ की कश्ती और ओ बारिश का पानी...' त्या गाण्याचे शब्द ऐकून आजही कधीतरी डोळे पाणावतात...

माझ्या मित्रानं आपल्या मुलाशी माझी ओळख करून दिली. तो मुलगा बावीस वर्षांचा होता. बी. ई. इलेक्ट्रिकल इंजिनीयर. तो बेफिकीर दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावरून त्याला आमच्या बोलण्यात काही खास रस असेल असं वाटत नव्हतं.

"तू सध्या काय करतोस ?" मी त्या तरुण मुलाला सहज विचारलं.

तो एकदम खुलला. "मला एखादी सॉफ्टवेअर कंपनी जॉईन करून नंतर अमेरिकेला जायचंय. तिथे मला पाच वर्षे राहून नंतर परत येऊन माझी स्वत:ची कंपनी काढायची आहे आणि खूप मोठ्ठं व्हायचंय. मी ऐकलंय केवळ दहा हजार



रुपयांमधे माणूस एखादं मोठं साम्राज्यसुद्धा उभं करू शकतो. खरं आहे ना, आंटी ?"

त्यावर काय उत्तर द्यावं तेच मला कळेना. कारण एखादी कंपनी सुरू करायची म्हणजे त्यासाठी अपार मेहनत, परिश्रम, संघर्ष करावा लागतो. पुन्हा यश मिळेल याची काही खात्री नाहीच.

"तू आत्ता कुठं काम करतोयस ?"

"मी आत्ता कुठंच काम करत नाहीये. मला एखाद्या चांगल्या सॉफ्टवेअर कंपनीत जॉईन व्हायचंय."

"तुला प्रोग्रॅमिंगची काही पार्श्वभूमी - काही अनुभव आहे ?"

"नाही. पण मी झटपट शिकेन ते, माझी खात्री आहे. आत्ताच मला दुसरा कुठला जॉब घ्यायचा नाहीये. कारण जर आत्ता सॉफ्टवेअर सोडून दुसरा कुठला जॉब घेतला तर मला फार तर फार पाच-सहा हजार रुपयेच पगार मिळेल. शिवाय मला साईटवर जावं लागेल ते वेगळंच. पैसाही काही फार मिळणार नाही. त्यामुळे मी सध्या नोकरी धरलेलीच नाही."

आता माझ्या मित्राचा चेहरा इतका विवर्ण, चिंताग्रस्त का दिसत होता ते मला कळलं. तो लवकरच निवृत्त होणार होता आणि इथे त्याचा हा असला मुलगा - सुशिक्षित बेकार, नुसती मोठमोठी स्वप्नं पाहणारा. स्वप्नं पाहणं नेहमीच चांगलं पण त्या स्वप्नांना प्रत्यक्षात उतरवणं जास्त महत्त्वाचं असतं.

टिस्कोचे चेअरमन मि. जे. जे. इराणी यांचे शब्द मला आठवले : "कृतीविना नुसत्या कल्पना म्हणजे तर केवळ स्वप्नच, कल्पनेविना केलेली नुसती कृती म्हणजे केवळ वेळ घालवणं पण कल्पना आणि कृती यांचा संगम झाला की त्याने जगात परिवर्तन घडू शकते."

एक शिक्षिका या नात्याने मला उपदेश देण्याची सवय आहे. त्यामुळे त्याला आवडो अथवा न आवडो, त्याने मला सल्ला विचारो अथवा न विचारो, मी माझ्या मनातलं बोलून सरळ-मोकळी झाले. आपल्या वडिलांबरोबर तो परत जायला निघाला तेव्हा त्याचा चेहरा उतरला होता.

आपला देश नैसर्गिक संपत्तीने इतका समृद्ध आहे, भारताच्या उत्कृष्ट परंपरेच्या साक्षी असलेल्या वास्तू येथे आहेत. खरं तर इतकी सांस्कृतिक व भौगोलिक विविधता जगात इतरत्र फारच थोड्या ठिकाणी पाहायला मिळते. ओरिसा हे एक राज्य असं आहे, जिथे निसर्गसौंदर्य व त्याचबरोबर आपली सांस्कृतिक परंपरा पाहायला मिळते. जरा कोणार्कची आठवण काढा. ओडिसी नृत्य, पुरीची

रथयात्रा, पटचित्र रंगकृती ! त्यांच्यापुढे इतर सर्व फिकं आहे.

आपल्यापैकी बऱ्याच लोकांची अशी समजूत असते, की त्या राज्यात पर्यटकांचं आकर्षण ठरावी अशी केवळ तेवढीच स्थळं आहेत. पण त्या राज्यात एक स्थळ असंही आहे, जे अत्यंत सुंदर, रमणीय आहे, पण ते विशेष कोणाला माहीत नाही. एक छोटंसं, झोपाळलेलं गाव आहे - चंदीपूर. बंगालच्या उपसागराकडे तोंड करून उभं असलेलं. इथे समुद्र प्रवाशांशी पाठशिवणीचा खेळ खेळत असतो.

इथे दिसून येणारी एक विलक्षण गोष्ट म्हणजे समुद्र जवळपास पाच किलोमीटर आत जातो आणि पाणी सरल्यावर चांगली सपाट जमीन दृष्टीस पडते. या जमिनीवर आपण चालू शकतो, खेळू शकतो इतकंच काय पण जीपसुद्धा चालवू शकतो. काही तासानंतर परत भरती येते, जणू काही इथे काही घडलंच नव्हतं.

प्रवासी समुद्रकिनारी बसून हा अभूतपूर्व चमत्कार पाहतात. भरती - ओहोटीचा हा खेळ पाहणं हा एक रोमांचकारी अनुभव असतो.

चंदीपूर हे भुवनेश्वरपासून दोनशे किलोमीटरवर आहे. तिथे एक छोटेसे गेस्ट हाऊस आहे. फारच थोडे बाहेरचे लोक तिथे येतात. इथे बहुतांशी कोळ्यांचीच वस्ती आहे. एकदा मी अशीच समुद्रकिनारी बसून ओहोटी कधी सुरू होते, याची वाट बघत होते. मला लाट ओसरल्यावर त्या जमिनीवरून चालायचं होतं. मी समुद्राकडे बघत राहिले. आता लाटा ओसरत चालल्या होत्या, पण तरीही अजून चालत जाण्याइतकी जमीन दिसत नव्हती.

कोळी लोक आपापल्या कामात व्यग्र होते. कधीही ओहोटी सुरू झाली की लाल रंगाचे खेकडे रेतीवर चालत येतात. जरा मोठ्या वयाची मुले खेकडे पकडत होती व लहान मुले शंखशिंपले वेचत होती. साड्या नेसलेल्या सावळ्या, कणखर, सडपातळ, कोळी स्त्रिया मासे पकडण्यासाठी जाळी अंथरत होत्या. समुद्राकाठी अनेक लोक होते.

तिथे मला एक लहान मुलगा भेटला. सुमारे बारा वर्षांचा असावा. तो आपल्या आईला जाळं अंथरायला मदत करत होता. ती दमली की तो पुढे होऊन तिला मदत करायचा, आणि तिला जेव्हा त्याच्या मदतीची गरज नसेल तेव्हा तो एकीकडे खेकडे पकडायचा. त्याच्या एकंदर हालचालींवरून तो अगदी मजेत असल्याचं जाणवत होतं. तो किनाऱ्यावर हिंडता हिंडता माझ्याजवळ आला व मी त्याचे खेकडे विकत घेईन असं त्याला वाटल्यामुळे तो थांबला. 'ताजे खेकडे घेणार का ?' तो म्हणाला. 'मी खेकडे खात नाही, पण मला तुझ्याशी बोलायचंय,' मी



म्हणाले.

मग तो माझ्याजवळ येऊन पायरीवर बसला. या पायऱ्या खास प्रवाशांसाठीच बांधलेल्या होत्या. मी त्या मुलाकडे नीट निरखून पाहिलं. तो किडकिडीत आणि सावळा होता. पण त्याचे डोळे हिऱ्यांसारखे चमकदार होते. त्याचा तो उत्साह संसर्गजन्य होता. त्याच्या अंगात एक छोटीशी विजार होती. तो भिजून चिंब झालेला होता. पण त्याच्या वागण्यात कुठेही बुजरेपणा, अवघडलेपणा नव्हता. एखाद्या ताज्या टवटवीत फुलासारखं सहज स्वाभाविक असं व्यक्तिमत्त्व होतं त्याचं. त्याचं ते हसूसुद्धा संसर्गजन्य होतं.

मी त्याला त्याच्या कुटुंबाविषयी विचारलं. त्याच्याकडूनच मला समजलं - त्याचे वडील रिक्षा चालवायचे. त्यांना त्यातून रोजचे पन्नास रुपये मिळत. त्याची आई मासे, खेकडे इत्यादी पकडून कुटुंबाला हातभार लावायची. त्या मुलाचं नाव जावेद. तो शाळेत जायचा आणि वर्गात नेहमी पहिला असायचा. घरी त्याची एक लहान बहीण होती.

या जावेदला रोजचे किती पैसे मिळत असतील बरं ? - मला उत्सुकता वाटली. शिवाय त्याचा रोजचा दिनक्रम काय असेल, हेही मला जाणून घ्यायचं होतं.

तो म्हणाला, 'सकाळी जेव्हा समुद्राला ओहोटी असते, तेव्हा मी खेकडे पकडतो. आईला मदत करतो आणि मग घरी जातो. आंघोळ करतो, स्वयंपाकघरात थोडं काम करतो. तेवढीच आईला मदत, तिचं काम तेवढंच कमी होतं. मग मी शाळेला जातो. संध्याकाळी घरचा अभ्यास. मग रात्री परत ओहोटी सुरू झाली की खेकडे पकडायला जातो. अल्लाची आमच्या या भागावर चांगली मेहरबानी आहे. मी तर संपूर्ण देशात फक्त या आमच्याच जमिनीवरून समुद्र पूर्णपणे आत जातो, तोही दिवसातून दोन वेळा. त्यामुळे फार श्रम न करता आम्हांला खेकडे पकडता येतात.''

त्याला बहुधा दिवसाकाठी पाच नाही तर दहा रुपये मिळत असतील. हे इतकं मेहनतीचं काम करून त्याला इतके कमी पैसे मिळत असणार, या कल्पनेने मला फार दुःख झालं.

मी त्याला विचारलं : 'केवळ पाच नाही तर दहा रुपये, जावेद ? त्यानं काय होणार आहे ? आणि ते मिळवण्यासाठी तू पहाटे पाचला उठतोस आणि रात्री अकराला झोपतोस ?''

माझा प्रश्न ऐकून त्याचा उत्साह मुळीच कमी झाला नाही. तो हसून

म्हणाला : "मॅडम, काहीच न मिळवण्यापेक्षा पाच रुपये मिळवणं म्हणजे खूप जास्त नाही का ? पाँच रुपये में कुछ भी तो होता है ! आपण मीठ आणू शकतो, मिरच्या आणू शकतो. पण जर आपण काही न करता बसलो, तर तेही आणता नाही येणार. इथे शंभर आणि हजार रुपये कोण देणार आम्हांला ? प्रत्येक थेंबापासून समुद्र बनतो, एकेका धान्याच्या दाण्यातूनच कोठार बनते."

जावेदचं उत्तर ऐकून मी थक्क झाले. एक गरीब कोळ्याचा मुलगा, जावेद. त्यानंच मला या सुप्रसिद्ध उक्तीची आठवण करून दिली. "अंधाराला दूषणे देण्यापेक्षा एक तरी मेणबत्ती पेटवणं चांगलं."

त्यानंतर मला माझ्या मित्राच्या मुलाची आठवण झाली. उत्तम सॉफ्टवेअर कंपनीत चांगला भरभक्कम जॉब मिळण्याची वाट बघत तो आपला वेळ वाया घालवत बसला होता.

ooo



४५

# तस्मै श्री गुरवे नमः

एक काळ असा होता - जेव्हा शिक्षकाचं महत्त्व एखाद्या राजापेक्षाही जास्त होतं. शिक्षक विद्यार्थ्यांवर नितांत प्रेम करत आणि विद्यार्थ्यांचं काही चुकलं तर त्याला शिक्षा करायलासुद्धा मागेपुढे पाहात नसत. विद्यार्थी शिक्षकांच्या सान्निध्यात सतत राहात - १० ते १२ वर्षे - त्यांना सर्व कामांत मदत करत. शिक्षकही त्या मुलांचा आपल्या स्वतःच्या मुलांसारखा सांभाळ करीत. यालाच 'गुरुकुल पद्धती' असं म्हणत.

पूर्वीच्या काळी या गुरुकुल पद्धतीमध्ये राजा आणि रंक यांच्यात काहीही फरक नसे. सगळेच सारखे. यातील एकच दोष असा होता, की शिक्षण सर्वांसाठी उपलब्ध नव्हतं. काही निवडक लोकांपुरतंच ते होतं. ही मुलं शिकून जेव्हा मोठी होत तेव्हा ती आपले गुरु आणि गुरुपत्नी यांना जन्मभर विसरत नसत. असा एक अलिखित नियम होता की पुढे ते विद्यार्थी आयुष्यात जे काही मिळवत त्यातील काही भाग ते गुरुदक्षिणा म्हणून आपल्या गुरुंना अर्पण करत. आपल्या विद्यार्थ्यांचं यश पाहून गुरुजींना आनंद होई.

त्यांचे विद्यार्थी हीच त्यांची संपत्ती होती.

ज्ञानार्जनामध्ये आपल्या शिष्याने आपल्याला मागे टाकून पुढे जावे अशी प्रत्येक गुरुची ईश्वरचरणी प्रार्थना असे. तोच त्यांच्या आयुष्यातला सर्वोच्च आनंद होता. "शिष्यात् इच्छेत् पराजयम्' विद्यार्थ्याने गुरुपेक्षा श्रेष्ठ बनले पाहिजे.

विद्यार्थी आपल्या गुरुजींचा कसा आदर करीत हे दाखवणारी एक फार सुरेख कथा आहे.

एकदा एका सम्राटाला कुणीतरी प्रश्न केला : "महाराज, आपण इतके सर्वशक्तिमान आहात, एवढी धनसंपत्ती आपल्यापाशी आहे, इतकं मोठं राज्य आहे, मोठी सेना आहे. आपले गुरुजी इतके गरीब आहेत. त्यांच्याकडे छोटासा

जमिनीचा तुकडासुद्धा नाही. असं असूनसुद्धा तुम्ही जेव्हा त्यांना भेटता तेव्हा त्यांच्यापुढे नतमस्तक होता. त्यांच्या धूळभरल्या चरणांना स्पर्श करता. त्यांच्या समोर खाली जमिनीवर बसता आणि त्याचं म्हणणं लक्षपूर्वक ऐकता. खरं तर तुम्ही त्यांना तुमच्या दरबारात बोलावून घेऊ शकत असताना, तुम्ही तसं का नाही करत ?''

त्यावर तो सम्राट हसून म्हणाला; ''किती मूर्खपणाचं बोलणं आहे हे. माझे गुरु हे जगातल्या सर्वात श्रीमंत लोकांपैकी एक आहेत. ज्या जमिनीविषयी तुम्ही बोलताय, ती तर युद्धात कधीही जिंकता येते किंवा माणूस ती हरू शकतो. सम्राट हा जोपर्यंत तरुण, सशक्त असतो, तोपर्यंतच त्याचा दरारा असतो. त्याच्या जवळची धनसंपत्ती खर्च होऊ शकते, कोणी दरोडा घालून हिरावू शकते अथवा नष्ट होऊ शकते. त्यामुळे सम्राटाला सर्वशक्तिमान म्हणणे बरोबर नाही. तेच माझ्या गुरुकडे पाहा. त्यांच्याजवळ ज्ञान आहे आणि दर वर्षी ते हे ज्ञान आपल्या विद्यार्थ्यांना देत असतात. ते जेवढं जास्त देतात तेवढी त्यांची जास्त प्रगती होते. त्यांचं ज्ञान कोणीच हिरावू शकत नाही. दर वर्षी अधिकाधिक ज्ञानाने ते संपन्न होत असतात. मग तेच थोर नाहीत का ? त्यांचे सर्व विद्यार्थी ही त्यांची स्वत:चीच मुले असतात, आणि ज्या वडिलांच्या मुलांची भरभराट होते ते वडील श्रीमंत नाहीत का ?''

या कथेतून गुरुविषयीची आदरभावना व्यक्त होते. त्याचप्रमाणे गुरुची ज्ञानाविषयीची आसक्ती व आपल्या विद्यार्थ्यांवर असलेले प्रेम प्रकट होते. त्याचमुळे आपल्या भारतीयांच्या दृष्टीनं - मातृ देवो भव, पितृ देवो भव, आचार्य देवो भव - समाजातील गुरुचं स्थान तिसऱ्या क्रमांकाचं असतं.

आपल्या विद्यार्थ्यांचं समाजात काहीही स्थान असलं तरी त्यांच्या हातून कधीही चूक झाली की त्यांना वळणावर आणण्याची, ती चूक दाखवून देण्याची जबाबदारी नेहमी गुरुची असते.

पण आजच्या काळात ही गुरुकुल पद्धती अस्तित्वात राहिलेली नाही, कोणीच त्याचा अवलंब करत नाही. आपल्या सरकारने बरेच प्रयत्न करून गावागावातून, खेड्याखेड्यातून आधुनिक पद्धतीचे शिक्षण देणाऱ्या शाळा स्थापन केल्या आहेत. हजारो प्रशिक्षित शिक्षकांची नीतिमत्तेचे पाठ देण्यासाठी नेमणूक झाली आहे. त्यांना उत्तम पगार दिले जातात. उद्याचे उत्तम नागरिक घडवणं, हे त्यांचं मुख्य काम असतं.

मला अजूनही आठवतं, मी जेव्हा लहान होते तेव्हा आम्ही जिल्हा पातळीवरच्या



किंवा राज्य पातळीवरच्या विविध स्पर्धांमधे भाग घ्यायचो. त्यासाठी आम्हांला आमच्या गावाहून वेगवेगळ्या गावी जावं लागे. आमचे शिक्षक त्या वेळी आमच्या बरोबर येत. आम्ही कधीच हॉटेलात उतरलो नाही. शिक्षक आम्हांला त्यांच्या बहिणीच्या घरी घेऊन जायचे. आम्ही सर्व जण तिथे उतरायचो. या सगळ्या प्रकारात खरं तर आमच्या शिक्षकांचा काहीही फायदा नसे.

पण ते आम्हांला त्यांच्या कुटुंबीयांपैकीच एक समजत. त्यांची बहीणसुद्धा आनंदाने आमचं आगत-स्वागत करायची, आम्हांला खाऊ-पिऊ घालायची. मी जेव्हा आज त्याचा विचार करते, तेव्हा वाटतं, ती पद्धत किती महान होती.

अलीकडेच मी कामानिमित्त ओरिसाला गेले होते. आपल्या देशात विविध भागांत नैसर्गिक आपत्ती कोसळण्याचा प्रसंग येतो. १९९९ सालच्या ऑक्टोबर महिन्यात ओरिसाला वादळाचा जोरदार तडाखा बसला होता. तसं होईल अशी आधी कोणालाच कल्पना आली नाही. वादळाने झाडे मुळापासून उखडली गेली. घरांची छपरे उडून गेली, इमारती उद्ध्वस्त झाल्या.

दर वर्षी पूर येतात. छोट्या ओढ्यांची प्रचंड मोठी नदी होते, दुथडी भरून वाहू लागते. दर वर्षी अनेक लोकांना आपले घरदार, गाईगुरे आणि मालमत्ता गमवावी लागते. अशा प्रकारच्या प्रत्येक आपत्तीनंतर देशातील अनाथ-अपंगांची, मतिमंद मुलांची संख्या वाढलेली दिसते, असं संख्याशास्त्रानं सिद्ध झालं आहे. ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे.

अनाथालयं भरून जातात. अनेकदा तर असं आढळून येतं की आईवडील आपल्या अपंग किंवा मतिमंद मुलांना सोडून देतात. आपल्या गरिबीवर या अशा मुलांचं आणखी एक ओझं कशाला, असं त्यांना वाटत असतं. दूषित पाण्यावाटे पसरणाऱ्या साथीच्या रोगांनी सरकारी इस्पितळं भरून जातात. जेवढ्या रुग्णांची त्या ठिकाणी सोय होणार असेल त्याच्या तिप्पट संख्येने रुग्ण तिथे दाखल होतात. नैसर्गिक आपत्तीच्या काळात बिगर सरकारी संस्थांचे कार्यकर्ते, सरकारी अधिकारी, डॉक्टर्स मनापासून काम करतात, पण तरीसुद्धा अनेकदा परिस्थिती इतकी हाताबाहेर जाते की त्यांचे प्रयत्न पुरे पडत नाहीत.

कोणत्याही सरकारला शाळा काही दर वर्षी दुरुस्त करणं शक्य नसतं. किती प्रचंड मोठं काम आहे ते. त्यामुळेच आमच्या फौंडेशनने एक निर्णय घेतला - आम्ही नदीजवळच्या भागात ज्या काही शाळा बांधणार होतो त्या शाळा मुद्दामच आम्ही जरा उंचीवर बांधायच्या ठरवल्या. म्हणजे पूरपरिस्थितीत त्या शाळांचा निवाऱ्यासाठीही उपयोग करता आला असता.

आम्ही शाळाशिक्षकांना या कामात सहभागी करून घेतलं. त्यांनीही अत्यंत अभिमानाने आमच्या कामात भाग घेतला, कारण अखेर ती त्यांचीच शाळा होती. शिक्षकांच्या सहभागामुळेच आमचं काम सुरळीत झालं.

ओरिसाच्या अंतर्भागात असलेल्या अशा निवारा शाळेच्या उद्‌घाटनासाठी मी गेले होते. पहाटेची वेळ होती. संपूर्ण वातावरण उत्साहाने भरलेलं होतं. समारंभ असल्यासारखं. ज्या शिक्षकांनी आम्हांला या शाळेच्या उभारणीत मोलाची मदत केली होती, त्यांची जवळच्या गावाला बदली झाली हाती. पण तरीही ते आज या समारंभासाठी खास उपस्थित होते.

उद्‌घाटन सोहळ्यापूर्वी मी त्या शाळेतील काही विद्यार्थ्यांशी बोलत होते. मी वर्गात गेले तेव्हा मला आश्चर्य वाटलं. वर्ग भरला होता. अनेक मुलं जमिनीवर बसली होती. मी शेजारच्या वर्गात डोकावले. तिथेसुद्धा हीच स्थिती. मी वर्गाच्या बाहेर आले. बाहेरच्या बाजूला निंबाच्या झाडाखाली एक वर्ग चालू होता. याचा अर्थच शाळेत खोल्यांची संख्या कमी होती.

मी ठरल्या वेळेपेक्षा जरा आधीच पोचले होते. शाळेच्या नवीन मुख्याध्यापिका आल्या आणि त्यांनी मला भेटताच माझी माफी मागितली. त्या मध्यमवयीन होत्या, पण त्यांची प्रकृती चांगली खणखणीत होती. त्या कडक शिस्तीच्या असाव्या असं वाटत होतं. पण पुष्कळदा वरवरच्या दिसल्यावरून काही सांगता येत नाही. त्या म्हणाल्या, "आजच्या दिवसभराच्या समारंभाचं खूप काम आहे." त्यांच्याशी बोलत असताना माझं लक्ष गेलं, तर त्या शाळेच्या आवारातील एका कोपऱ्यात एक लहानशी इमारत होती. इमारतीच्या समोरच्या बाजूला काही कपडे, साड्या वगैरे वाळत घातलेले दिसत होते.

मी स्वत:सुद्धा एक शिक्षिका आहे. शिक्षक एकदा बोलायला लागले की पुष्कळ बोलतात. म्हणून तिला मधे थांबवून मी म्हणाले, "ती साडी वाळत घातली आहे, तिथे कोण राहतं ?"

त्या मुख्याध्यापिका एकदम गडबडल्या आणि पुटपुटल्या, "आपत्कालीन परिस्थितीत वापरण्यासाठी निवारा म्हणून ती इमारत बांधलेली आहे."

"पण शाळेच्या आवारात कशासाठी ?"

"तुमच्या शाळांमधे तुम्ही करता, तसंच. कधीही कोणती नैसर्गिक आपत्ती आली की तेवढ्यापुरता निवारा म्हणून त्याचा उपयोग होतो. एरवी तिथे शाळेचे वर्ग भरतात."

"पण मग आत्ता कोणती नैसर्गिक आपत्ती ओढवली आहे ?"



"वादळ झालं होतं."

"पण ते तर दोन वर्षांपूर्वी झालं होतं. लोक अजूनही तिथे राहतायत ?"

मग त्यांनी वेगळाच सूर लावला. त्या म्हणाल्या, "नाही, पण काही पूरग्रस्त तिथे राहतायत ?"

पण हेही खरं नव्हतं, कारण पुरानंतर एव्हाना सर्व परिस्थिती पूर्ववत झालेली होती.

या चर्चेत जास्त वेळ घालवायला नको कारण उद्‌घाटन समारंभाला उशीर होत आहे, असं त्या मुख्याध्यापिका वारंवार सांगू लागल्या.

पण त्या इमारतीत कोण राहात होतं, याचा काहीही करून मला छडा लावायचाच होता. मी तसा आग्रह धरला. अखेर मुख्याध्यापिका बाईंचाही नाईलाज झाला व त्या माझ्याबरोबर त्या दिशेने चालू लागल्या.

इमारत उत्तम स्थितीत होती. आत बरेच बाक होते. ते एकत्र जुळवून त्यांची खाट केली होती. आत भांडीकुंडी व ट्रंका होत्या. एका कोपऱ्यात लाकूडफाटा रचून ठेवला होता. याचा अर्थ तिथे स्वयंपाकही होत असणार.

'इथे कोण राहतं ?' मी परत विचारलं.

आता मुख्याध्यापिका बाई जराशा चिडल्या होत्या. अर्थात त्यांनी चेहऱ्यावर ते दाखवलं नाही. "काही आदिवासी विद्यार्थी राहतात. त्यांचं हे वसतिगृह आहे."

परत एकदा खोटं. सरळसरळ खोटं. मुलांच्या शाळेत, मुलांच्या वसतिगृहात स्त्रीचे कपडे वाळत घातलेले दिसत होते. एवढंच काय पण ती खोली वसतिगृहाच्या खोलीसारखी दिसतही नव्हती. मी जेव्हा माझं खरं काय ते मत सांगितलं, तेव्हा त्या मुख्याध्यापिका बाईंचा अगदीच नाईलाज झाला.

त्या म्हणाल्या, "ही इमारत काही तितकीशी चांगली नाहीये. आमच्या शाळेत शिकवणारे अनेक शिक्षक अत्यंत गरीब परिस्थितीतले आहेत. त्यांना खूप लांबून शाळेत यावं लागतं, म्हणून मी त्यांना इथे राहायला जागा दिली आहे."

पण तरीही माझा काही तिच्या सांगण्यावर विश्वास बसला नाही.

"शिक्षकांना पगार चांगला असतो. शिवाय त्यांना घरभाड्यापोटीसुद्धा ठराविक रक्कम मिळते. त्यांनी काय म्हणून शाळेच्या आवारात राहायचं ?'

मला पाठीमागच्या बाजूने जराशी कुजबुज ऐकू आली. लहान मुलं विस्फारलेल्या डोळ्यांनी माझ्याचकडे बघत होती. खरं तर खरी बाजू ऐकायची असेल तर मुलांनाच विचारावं. मुलं नेहमी खरं बोलतात. कुणाला खूश करण्यासाठी कधी खोटं बोलत नाहीत.

त्यामुळे मी एका लहान मुलाला हाक मारली आणि विचारलं; "बाबा, इथे कोण राहतं ?"

त्या मुलाने मुख्याध्यापिका बाईंकडे बोट दाखवलं.

बाईंनी शरमेनं मान खाली घातली.

मी बाईंच्या जवळ जाऊन म्हणाले, "तुम्ही माझ्याशी खोटं का बोललात ? तेही चार वेळा ? प्रत्येक वेळा वेगळं खोटं सांगितलंत तुम्ही. तुम्हीच जर खोटं बोललात, तर मुलंसुद्धा तेच शिकतील तुमच्याकडून. तीसुद्धा खोटं बोलतील. तुमचा आदर्श त्यांच्यापुढे असला पाहिजे. आपल्या वागण्यातून आपण उदाहरण घालून दिलं पाहिजे. तुम्ही एक स्त्री आहात. एका स्त्रीला दुसऱ्यांविषयी, ममता, अनुकंपा वाटली पाहिजे. तुमची गरीब बिचारी मुलं त्या छोट्याशा वर्गात मेंढरांसारखी कोंबून बसत असताना त्यांच्यासाठी बांधलेल्या वर्गांचं तुम्ही घर कसं काय केलं ? ती इमारत त्यांची आहे. एका आईच्या मनात जे विचार येतील, ते कसे तुमच्या मनात येत नाहीत ? जर तुमचं मूल त्या वर्गात असतं, तर तुम्हाला ते वाईट लागलं नसतं ? शिवाय तुम्ही शिक्षिकापण आहात. एका आदर्श शिक्षकांचे गुण कोणते, तर आपल्या विद्यार्थ्यांविषयी प्रेम, काळजी... हे आपण पुरातन काळापासून ऐकत आलोय. मीपण एक शिक्षिका आहे. आपल्या विद्यार्थ्यांच्या फायद्याची चिंता आपण केली पाहिजे. आपल्या स्वतःच्या नव्हे. ही शाळा म्हणजे काही उद्योग भवन नाही. भावी पिढ्यांना प्रशिक्षण देणारी ही संस्था आहे. मुलांचा वर्ग राहण्यासाठी वापरून तुम्ही स्वतःचं घरभाडं वाचवलंत... का ? कारण लहान मुलं अन्यायाविरुद्ध आवाज उठवणार नाहीत, म्हणून ? त्या मुलांना रोज होत असलेले कष्ट तुम्ही पाहू तरी कसे शकला ? या इथे दूरवर कोणीही सरकारी अधिकारी येऊन कधीच शाळेची तपासणी करत नाही, म्हणून ? ही मुलं जेव्हा मोठी होतील, तेव्हा तुमच्याविषयी काय आठवण काढतील ? आपला देश हा थोर गुरुंचा, आदर्श शिक्षकांचा देश नव्हे का ?"

पण माझ्या प्रश्नावर काहीच उत्तर आलं नाही.

ooo



# ४६

# मीही माणूसच आहे...

नुकतीच मी एका एक वर्षाच्या मुलाच्या वाढदिवसाच्या पार्टीला गेले होते. पार्टी एका पंचतारांकित हॉटेलात आयोजित केली होती. मी माझ्या एका मैत्रिणीबरोबर गेले होते. त्या इतक्या लहान बाळाला काय भेट वस्तू घ्यायची, तेच मला कळेना.

आजकाल भेटी देणे आणि स्वीकारणे हा फार मोठा व्यवसाय झाला आहे. मला वाटतं सधन परिस्थितीचं हे एक नवीन गुणोत्तर बनलं आहे. तुमची मिळकत जी काही असेल, त्या मानानं तुम्ही दिलेली भेट असली पाहिजे. भेटीमागे असलेली प्रेमभावना वगैरे शब्दांना काही अर्थच उरलेला नाही.

गुजराती भाषेत एक अतिशय सुंदर उक्ती आहे :

"हिशोब करवादी मा, बक्शीस लाख मा." याचा अर्थ एवढाच की कोणाचा हिशोब चुकता करायचा असेल तर, अगदी नव्या पैशाचाही हिशोब चुकता करावा. काही बारीकसारीक देणं-सुद्धा ठेवू नये. पण तुम्ही जेव्हा एखाद्याला एखादी भेटवस्तू देत असाल, त्या वेळी मात्र त्या वस्तूच्या किंमतीचा विचार करू नये. पण त्यापाठीमागची भावना जरूर पाहावी. एखाद्या व्यक्तीने अगदी महागडी भेटवस्तू दिली, तरी कदाचित त्यापाठीमागे प्रेमाचा ओलावा नसेल. तर याउलट एखाद्या छोट्याशा भेटीमागे प्रचंड प्रेम असेल.

एका एक वर्षाच्या मुलाला देणार तरी काय ? मला वाटले, त्याला खाऊ खायला एक मोठासा वाडगा आणि चमचा दिला तर उपयोगी होईल. मी त्या दोन्ही गोष्टी दुकानातून विकत घेत असताना माझी मैत्रीण हसू लागली. ती म्हणाली, "तू मोठ्या अडचणीत येणार आहेस. तुझ्याकडून लोकांची यापेक्षा कितीतरी मोठ्या भेटवस्तूची अपेक्षा असेल. खरेदी करण्यापूर्वी परत नीट विचार कर."

मग मी ती गुजराती उक्ती तिला ऐकवली व जी भेटवस्तू पसंत केली होती, तीच घेतली.

आम्ही हॉटेलात पोचलो. शहरातील बड्या बड्या व्यक्ती तिथे उपस्थित होत्या. लहान मुले, मोठी माणसे, वृद्ध माणसे; उच्चभ्रू वर्तुळात वावरणाऱ्या महिला होत्या, उद्योगपती होते. कांजीवरम, पटोला, शिफॉन, त्याच्याशी रंगसंगती जुळणारे हिऱ्यांचे दागिने सर्वत्र दिसत होते. त्या संपूर्ण पार्टीत स्त्रियांनी घातलेले दागिने जर एकत्र केले असते तर मुंबईतल्या त्रिभुवनदास भीमजी झवेऱ्याचे दुकानसुद्धा पुरे पडले नसते !

सर्व रीतिरिवाज नेहमीप्रमाणेच होते. आईवडिलांनी केक कापला, वडिलांनी मेणबत्ती फुंकली, आईने बाळाला केक भरवला. संपूर्ण प्रसंगाचे व्हीडिओचित्रण झाले. फुगे फोडण्यात आले. सर्वांनी 'हॅपी बर्थ डे'चे गाणे म्हटले. मग लोक पुढे होऊन आपापल्या भेटवस्तू देऊ लागले. त्यानंतर भोजन होते.

सूटबूट घातलेली माणसे नवीन नवीन कॉंट्रॅक्ट्सचा विचार करत होती. स्त्रियांमध्ये फॅशन्सची चर्चा चालली होती. तरुण मुलेमुली मेटॅलिका ऐकत डान्स करण्याच्या तयारीत होती. वृद्ध स्त्री-पुरुष तक्रारीच्या सुरात एकमेकांना प्रकृतीची गाऱ्हाणी सांगत होते. जुन्या, गेलेल्या दिवसांच्या आठवणी काढत होते. तरुण आया आपापल्या मुलांना भरवत होत्या.

ज्या बाळाचा वाढदिवस होता, ते रडू लागले. त्याचे कपडे, दागिने त्याला टोचत असणार. त्यात तो कंटाळून गेला होता. दिव्यांच्या लखलखाटाने तो घाबरलाही होता.

त्या बाळाला मिळालेल्या एकेक भेटवस्तू मी पाहिल्या. उंची चांदीच्या वस्तू, सोन्याच्या साखळ्या, रोख रक्कम, चक्क लॅपटॉप कॉम्प्युटर ! माझ्याकडे अनेक अनोळखी व्यक्ती आल्या आणि त्यांनी माझ्यापुढे आपापल्या संस्थेतील अडचणींचा पाढा वाचायला सुरुवात केली. प्रत्येकाच्या मुखी प्रश्न एकच : "तुम्हाला कधी वेळ आहे ? मी तुम्हाला येऊन भेटू का ? मला तुमचा पैसा नको, पण तुमचा सल्ला मात्र हवाय."

एव्हाना मला एक गोष्ट कळून चुकली आहे. प्रथम भेटीत पैशांचा विषय कोणीच काढत नाही. लोक सर्वसाधारणपणे काही महत्त्वाच्या बाबतीत 'मार्गदर्शन द्याल का ?' असं विचारायला, सल्ला विचारायला येतात. आणि तोही अशा बाबतीत, ज्याचा माझ्याशी काहीच संबंध नसतो. आमच्या मुलीसाठी योग्य वर शोधायचा आहे... किंवा आमच्या मुलासाठी चांगली नोकरी बघायची आहे.... मग ते वेगवेगळ्या प्रकारे मदत मागतात. त्यांच्या संस्थांसाठी कधी रोख रक्कम मागतात तर कधी त्यांना वस्तुरूप देणगी हवी असते. अगदी दुसरं काहीच नसेल तर मी



एखाद्या सभेत येऊन भाषण करावं, अशी त्यांची इच्छा असते.

अशा वेळी अनेकदा मला ओरडून म्हणावंसं वाटतं, "मला एखाद्या यंत्रासारखं वागवू नका. तुमच्या फायद्यासाठी वापरू नका. मला माणूस म्हणून वागवा."

मी काही कामासाठी अहमदाबादला गेले होते. तिथे 'लॉ गार्डन रोड' आहे. त्याला अलीकडे 'लव्ह गार्डन रोड' म्हणतात. त्या रस्त्यावर बरीच छोटी छोटी दुकानं आहेत. ती सायंकाळी उशिरा उघडतात आणि रात्री अकरा वाजेपर्यंत चालूच असतात. फूटपाथवर ओपन एअर रेस्टॉरंटस् असतात. उघड्यावर टेबल-खुर्च्या मांडलेल्या असतात. ते पाहून प्रवाशांचे नंदनवन मानल्या गेलेल्या पॅरिसचीच आठवण येते. अनेकदा तरुण प्रवासी उशिरा या ठिकाणी येतात.

दुकाने छोटी असली तरी रंगीबेरंगी असतात. त्यांत गुजरातेतील कलाकुसरीच्या वस्तू विक्रीसाठी मांडलेल्या असतात. भरतकाम, कच्छी वर्क, चनियाचोली, बेडशीट्स, उशांचे अभ्रे इत्यादी गोष्टींसाठी गुजरात राज्य प्रसिद्ध आहे. या दुकानांमध्ये स्वस्त दराची चांदीची पदके आणि ग्रामीण नक्षीकाम असलेले इतर चांदीचे दागिनेही असतात. हे दागिने अतिशय सुंदर असतात. इतक्या नाजूक आणि सुंदर वस्तू या दुकानांमधे असतात की लोकांना काही ना काहीतरी वस्तू विकत घ्यावीशीच वाटते. मग ती वस्तू पुढे कधी वापरली जावो, अथवा न जावो.

एका सायंकाळी मी माझ्या मैत्रिणींबरोबर त्या भागात अशीच सहज 'विंडो शॉपिंग' करायला गेले होते. रस्त्यावरून उगीचच हिंडत असताना आरसेकाम केलेली एक नक्षीदार पर्स माझ्या डोळ्यांत भरली. मला ती आवडली म्हणून मी दुकानदाराला त्याची किंमत विचारली.

ते दुकान चालवणारे पतीपत्नी तसे तरुणच होते. त्यांच्या लग्नाला फार फार तर दोन-तीन वर्षे झाली असतील. ती तरुणी गोड होती, तब्येतीने चांगली सुदृढ होती. तिचं हसू फार छान होतं. तिच्या अंगात साधीच सुती साडी होती. गळ्यात नुसती ओवलेली काळी पोत आणि हातात काचेच्या बांगड्या होत्या, इतर काहीही दागिना नव्हता. पण एखाद्या स्त्रीची प्रकृती सुदृढ असेल, ती हसरी असेल तर तिला दुसऱ्या काही दागिन्यांची गरज पडतच नाही. दागिने न घालताच ती अधिक सुंदर दिसते.

तिचा नवरा तिच्याहून वयाने थोडासा मोठा असावा. तो असेल पंचवीस वर्षांचा. तो उंच व सडपातळ होता. त्याने त्या पर्सची किंमत १०० रुपये सांगितली.

माझी मैत्रीण अहमदाबादचीच होती. तिला ती किंमत जास्त वाटली. तिची घासाघीस करण्याची इच्छा होती. इतक्यात मला काही वेगळंच दृश्य दिसलं.

दुकानाच्या जवळ फूटपाथवर एक पाळणा होता व त्या पाळण्यात एक बाळ खेळत होतं. त्याच्या अंगातही साधं सुती झबलं होतं आणि ते बाळ एका लाकडी खेळण्याशी खेळत होतं. ते बाळही छान गुटगुटीत आणि हसरं होतं. पण त्याचे आईवडील कुठे दिसत नव्हते.

मग मी त्या तरुणीला त्या बाळाविषयी विचारलं.

ती अभिमानाने म्हणाली, "ते आमचंच बाळ आहे." तिच्या चेहऱ्यावर इतकं प्रसन्न हसू त्या वेळी उमटलं होतं, की मला तिच्याशी आणखी बोलत राहावंसं वाटलं.

"तू या बाळाला इथे बाजारात कशाला घेऊन येतेस ? त्याला घरी कोणाजवळ नाही तर शेजाऱ्यांकडे ठेवून का नाही येत ?"

मग ती जरा घुटमळली आणि म्हणाली, "आमच्या घरी त्याला सांभाळायला कोणीही नाही, आणि माझ्या सगळ्याच शेजाऱ्यांची याच ओळीत वेगवेगळी दुकाने आहेत."

या अशा बायकांशी बोलणं, त्यांची जीवनशैली जाणून घेणं मला नेहमीच आवडतं. आता ती सुंदर कच्छी पर्स माझ्या मनातून केव्हाच निघून गेली होती आणि माझ्या मनात त्या बाळाचे विचार येत होते.

"या बाळाला सांभाळणं आणि काम हे दोन्ही कसं काय जमतं ?"

"मी पहाटे उठते, भरतकाम आणि घरकाम असं सगळं करते. तेव्हा माझा नवरा बाळाला सांभाळतो. दुपारी तो भरतकाम करतो व मी बाळाकडे बघते. संध्याकाळी आम्ही दोघं मिळून दुकान बघतो आणि बाळाला सांभाळतो."

"तुम्ही वर्तमानपत्र वाचता ? किंवा टी. व्ही. बघता ?" खरं तर मी हे प्रश्न उगीचच विचारले होते, ते तसे निरर्थकच होते. पण मला काहीतरी बोलायचंच होतं.

"आमच्याकडे टी. व्ही. नाही. कधीतरी क्वचित आम्ही शेजाऱ्यांकडे टी. व्ही. बघायला जातो. आमच्या वस्तीत फक्त एकच गुजराती पेपर येतो. तो माझा नवरा वाचतो आणि मला बातम्या सांगतो. नाही तरी रोज अशा काही खास बातम्या नसतातच. कोणतातरी राजकीय पक्ष देशावर राज्य करतो, कोणाचातरी खून होतो नाही तर कुठेतरी काहीतरी नैसर्गिक आपत्ती ओढवलेली असते. पण या सगळ्याचा आमच्या आयुष्यावर काहीही परिणाम होत नाही. मी अगदी लहान मुलगी होते, तेव्हापासून हे असंच चाललं आहे. कच्छमधे माझे वडील जे करत होते तेच इथे आता माझा नवरा करतो."

"तुला लिहिता वाचता येतं ? तू शाळेत गेलेली आहेस ?"



"नाही. मी शाळेत कधी गेले नाही. माझी सावत्र आई आम्हांला शाळेत जाऊ द्यायची नाही. आम्ही मूळचे कच्छमधले. आम्ही अगदी लहान असल्यापासूनच शाळेत जाण्याऐवजी आम्हांला भरतकाम शिकवण्यात आलं. माझा नवरा चौथीपर्यंत शिकलेला आहे. त्याला गुजराती पेपर वाचता येतो."

"तुझं हे बाळ केवढं आहे ?"

"एक वर्षाचं. आजच त्याचा पहिला वाढदिवस आहे. आम्ही आता आणखी मुलं होऊ द्यायची नाही असं ठरवलंय. आम्ही शिकलो नाही. पण त्याला मात्र आम्ही शिकवणार आहोत. त्यासाठी पाहिजे तेवढे कष्ट आम्ही करू."

एव्हाना घासाघीस करून संपली होती. तो दुकानदार काही किंमत कमी करायला तयार नव्हता, त्यामुळे माझ्या मैत्रिणीनं पर्स काही विकत घेतली नाही आणि आम्ही जायला निघालो.

मी परत एकदा त्या बाळाकडे पाहिलं. किती हसरं, गुटगुटीत बाळ. आणि आज त्याचा वाढदिवस होता. मला अचानक त्या पंचतारांकित बर्थडे पार्टीची आठवण झाली. एखाद्या श्रीमंत कुटुंबात जन्म घेणं हे काही कोणाच्या कष्टाचं फळ नसतं. तो केवळ योगायोगाचा भाग असतो. हे मूल या घरात जन्माला आलं होतं. मला वाटलं, याला वाढदिवसाची भेट दिली पाहिजे. मी पर्स उघडली आणि शंभर रुपयांची नोट काढून त्याच्या बाळमुठीत ठेवली व चालू लागले.

त्या बाळाची आई तातडीने पळतच माझ्या मागे आली. "हे पाहा, प्लीज तुमचे पैसे परत घ्या. आम्ही काही भिकारी नाही. आमची - तुमची काही ओळख नाही, पाळख नाही. तुम्ही आम्हांला पैसे काय म्हणून द्यायचे ?"

तिच्या चेहऱ्यावर राग स्पष्ट दिसत होता.

मी म्हणाले, "अग, हे तुझ्यासाठी नाहीत. आज बाळाचा वाढदिवस आहे. आणि आमच्यात अशी पद्धत आहे. बाळाचा वर्षाचा वाढदिवस असला की आम्ही त्याला छोटीशी भेट देतो. मी गेली पाच मिनिटं तुझ्याशी बोलत होते. आपली ओळख झाली आहे. म्हणून मी आशीर्वाद म्हणून तुझ्या बाळाला ते पैसे दिले. नाही म्हणू नको."

एव्हाना तिचा राग निवळला होता. क्षणार्धात तिच्या डोळ्यांत चमक आली, ती परत हसू लागली. मी पाठ वळवून चालू लागणार तोच तिने माझा उजवा हात पकडून ती पर्स माझ्या हातात ठेवली. मला धक्का बसला. मी ती घेण्यास तयार होत नव्हते.

"मी तुझ्या बाळाला भेट म्हणून जे काही दिलं त्याची तू ही परतफेड करते

आहेस का ?''

''तसं नाही बेन. मला या सगळ्याच गोष्टीचं आश्चर्य वाटतंय. आमच्या दुकानात खूप गिऱ्हाईकं येतात, पण फक्त एक व्यवसायिक म्हणून आमच्याकडे बघतात. ते आधी किंमत विचारतात, मग घासाघीस करतात. पैसे दिल्यानंतर माल घेतात आणि मागे वळूनसुद्धा न बघता चालू लागतात. आजपर्यंत एक माणूस म्हणून आमच्याशी कोणीही बोललेलं नाही. ते आम्हांला व्यावसायिक याच नात्याने कायम वागवतात. आम्ही कसे जगतो, काय करतो हे कोणीच विचारत नाही. तुम्ही इथे जे काही पाहिलं, तेच सर्व हे लोकही बघतातच ना ? पण आज आम्हीसुद्धा एक माणूस आहोत हे जाणून घेऊन आमच्याशी वागलेल्या तुम्ही पहिल्या आहात. त्यामुळे फार बरं वाटलं. मी तुम्हाला ही पर्स दिली म्हणून तुम्ही रागावू नका. माझ्या बाळानं तुम्हाला ही दिली आहे, असं समजा. एखादी व्यक्ती आपल्या भागातील नाही, आपली भाषासुद्धा बोलत नाही, आपली व तिची काही ओळख नाही आणि ती व्यक्ती माझ्या बाळाच्या वाढदिवसाला त्याला आशीर्वाद देऊन जाते, हे पाहून मला खूप खूप बरं वाटलं. मग आपण त्या व्यक्तीविषयी, त्या स्त्रीविषयी आदरभाव दाखवावा, असं मलाही वाटलं. ते माझं कर्तव्यच नाही का ? ही पर्स रुपयांनी भरून तुम्हाला देण्याइतका पैसा काही देवानं मला दिला नाही. पण मी देवाची एवढीच प्रार्थना करते, की देव तुम्हाला इतका पैसा देवो की अशा कित्येक पर्सेस भरून जावोत.''

आपल्याला लोकांनी एक व्यक्ती म्हणून, माणूस म्हणून वागवावं असं तिला जे वाटत होतं, त्या भावनेशी मी सहमत झाले. कारण माझीही तीच भावना होती. मलाही चेहरामोहरा नसलेलं एक यंत्र म्हणून कोणी वागवू नये, हीच माझीही भावना होती. म्हणून ती पर्स मी आनंदाने स्वीकारली. ते बाळही खुशीत हसत होतं. त्यानं आपल्या बाळमुठीत ती नोट घट्ट पकडली होती.

ooo



# ४७

# चेन्नईचा तो अनामिक

अमेरिकेमध्ये निधी गोळा करण्याची संकल्पना खूप लोकप्रिय झाली आहे. केवळ या निधी उभारण्याच्या कामासाठी युनिव्हर्सिटीमधे किंवा धर्मादाय संस्थांमध्ये स्वतंत्र विभाग असतो. यात काम करणारे लोक वेगवेगळ्या मार्गांनी चांगला मोठा मासा गळाला लावतात व दानशूर लोकांकडून आपल्या युनिव्हर्सिटीला नाही तर संस्थेला देणगी मिळवतात. आता हीच संकल्पना हळूहळू भारतातही रुजत चालली आहे.

माझी मैत्रीण मैथिली ही एका बिगर सरकारी संस्थेमध्ये काम करते. तिचं काम म्हणजे निधी उभारणं. मैथिली चांगली तरतरीत आणि बोलकी आहे. ती एका मध्यमवर्गीय घरातली आहे. एक दिवस तिचा मला फोन आला. शहरातील एका अत्यंत सधन व प्रसिद्ध घराण्यातील महिलेची भेट घेण्यासाठी ती जाणार होती. मी तिच्या सोबत जावं अशी इच्छा होती म्हणून तिनं फोन केला होता.

या महिलेनं देणगी द्यावी म्हणून मैथिली तिचा बरेच दिवस पाठपुरावा करत होती. अखेर शहरापासून चाळीस किलोमीटर दूर असलेल्या आपल्या फार्म हाऊसमध्ये तिने मैथिलीला भेटायला बोलावलं. मैथिलीला एकटीला जाणं अवघडल्यासारखं होत होतं, म्हणून तिनं मला सोबत येण्याची विनंती केली होती.

आम्ही त्या स्त्रीच्या प्रासादासारख्या घरी पोचलो. पंचवीस एकरांच्या अवाढव्य प्लॉटवर ते बांधलं होतं. सभोवती मोठा बगीचा होता. एखाद्या जुन्या काळातील झोपडीसारखी त्या घराची रचना होती. आत कडक सुरक्षा व्यवस्था होती. आम्हांला आत सोडण्याआधी बरेच प्रश्न विचारण्यात आले. त्यानंतर गार्डनेे इंटरकॉमवरून मुख्य घरात विचारणा केली व मगच आम्हांला आत सोडले.

ते घर बाहेरून जरा जुनाट व ओबडधोबड असलं तरी आतून मात्र अत्याधुनिक सुखसोयींनी युक्त व भव्य होतं. सर्व भिंती फिकट रंगात रंगवलेल्या

होत्या. एकीकडे कारंजं होतं, त्यात सुवासिक पाणी उडत होतं. ते चमकत होतं. जणू काही निसर्गच त्या एवढ्या मोठ्या दिवाणखान्याच्या आत उतरून आला होता. जमीन लाकडाची होती. सर्वत्र जुन्या काळच्या उंची, अँटिक वस्तूंचं प्रदर्शन होतं. त्या वातावरणाच्या सौंदर्यात भर घालत होत्या. घराच्या गच्चीतसुद्धा एक बगीचा होता.

घराची मालकीण झोपाळ्यावर बसली होती. झोपाळ्याच्या कड्या लखलखत होत्या. त्या पितळेच्या होत्या की सोन्याच्या, तेही समजत नव्हतं. त्या स्त्रीने उंची शिफॉन साडी आणि प्लॅटिनमचे दागिने घातले होते, त्यात ती रुबाबदार दिसत होती. तिने लांबून आम्हांला येताना पाहून बसण्याची खूण केली. ती पंचेचाळिशीची असावी. पण वयाच्या मानाने बरीच तरुण दिसत होती. सर्वत्र चंदनाचा वास पसरला होता. फुलदाण्यांमधे ताजी फुले होती. दोन अत्यंत स्मार्ट सेक्रेटरी अवती भोवती घुटमळत होते. मैथिलीला आणि मला त्या वातावरणात अत्यंत अवघडल्यासारखं झालं. त्याचं मुख्य कारण असं की तिच्या चेहऱ्यावर हसू किंवा मनमोकळेपणा कुठेही नव्हता.

मी एक गोष्ट नेहमीच पाहात आले आहे. कोणत्याही घरी गेल्यानंतर तेथील विविध पदार्थ, यजमानाच्या अंगावरचे दागिने, घर या कशाहीपेक्षा त्या यजमानाच्या वागण्यातील आर्जव व चेहऱ्यावरचं हसू यांमुळेच माणसांना आपलेपणा वाटतो. मग तुमचं समाजातलं स्थान, वय, स्त्री किंवा पुरुष असणं, किंवा तुम्ही कोणती भाषा बोलता या सर्व गोष्टी गौण ठरतात आणि मैत्रीची कवाडं उघडतात.

मैथिलीने आपल्या कामाचे स्वरूप स्पष्ट केले. आपल्या संस्थेची तपशीलवार माहिती दिली, अर्थात संस्थेच्या कामाचे जरा अतिरंजित वाटावे इतके वर्णन केले. अखेर दुसऱ्याला आपलं म्हणणं पटवून देणं, हे तिचं कामच होतं. माझ्यासमोर कोणीही एखाद्या गोष्टीचं अवास्तव, अतिरंजित वर्णन करू लागलं, की मी लगेच सावध होते. यात कुठेतरी गोम असणार, असं माझ्या मनात येतं. पण ही महिला मात्र शांतपणे, निर्विकारपणे सगळं ऐकून घेत होती. जेव्हा लोक चेहऱ्यावरून काहीही भावना व्यक्त करत नाहीत, तेव्हा समोरची व्यक्ती एकदम गप्प होते. जी माणसे धूर्त असतात, ती समोरच्या व्यक्तीला आपल्या मनात काय चाललंय ते कधीच कळू देत नाहीत. जी माणसं सरळ, साधी असतात, ती भरभरून बोलतात, मन मोकळं करतात, त्यांचं आत-बाहेर असं काही नसतं, व मैथिलीपण तशीच भरभरून बोलत होती. ती स्त्री मात्र तिच्या मनातील एकही भावना चेहऱ्यावर दाखवत नव्हती.



बोलणं संपल्यावर दीर्घ काळ शांतता पसरली. नंतर ती स्त्री म्हणाली, "तुमची कागदपत्रे माझ्या सेक्रेटरीकडे द्या. मी सवडीने एकदा ती वाचीन आणि मग काय ते कळवीन."

तिच्या त्या करड्या उत्तराने सर्व उत्साहाचा फुगा फुटला. ही गोष्ट तर ती आम्हांला फोनवरसुद्धा सांगू शकली असती. तेवढ्यासाठी आम्हांला एवढ्या लांब गाडी घेऊन यावं लागलं आणि अर्धा दिवस वाया गेला.

त्यानंतर महिन्याभराने मैथिली मला एका समारंभात भेटली. एका शाळेच्या उद्घाटनाचा प्रसंग होता व हीच स्त्री प्रमुख अतिथी म्हणून उपस्थित होती. मग मी मैथिलीला त्या देणगीचं काय झालं, असं विचारलं.

मैथिलीनं मला एका बाजूला बोलावून घेतलं आणि कुजबुजत्या स्वरात म्हणाली, "त्यांच्याकडून पैसा काढणं हे महाकठीण काम आहे. स्वत:साठी कितीही पैसा खर्च करण्याची त्यांची तयारी असते. पण कुणाला देणगी द्यायची म्हटलं की दहा हजार वेळा विचार करणार. आता काय सांगू ? महिनाभर त्यांचा पाठपुरावा केला, तेव्हा अखेर त्यांनी दहा हजार रुपये देण्याचं कबूल केलं आणि तेही त्यांना आम्ही समारंभात प्रमुख पाहुणे म्हणून बोलवावं, त्यांचा फोटो आणि माहिती वृत्तपत्रात छापून आणावी, याच अटीवर."

"पण तुम्ही मुळात इतक्या कमी रकमेची मागणी केलीतच का ?"

"एक लक्षात घे. एखाद्या बिगर सरकारी संस्थेकरता निधी उभारणं ही गोष्ट अजिबात सोपी नाही. तुला त्याचा अनुभव नाही म्हणून. प्रत्येक पैसा न् पैसा महत्त्वाचा असतो. थेंबे थेंबे तळे साचे, असं उगीच नाही म्हणत. कशाचीच अपेक्षा न करता फुकट देणगी कोणीच देत नाही. निधी गोळा करण्याच्या या कामातून मी हे चांगलंच शिकले आहे."

मला निधी उभारण्याचा खरोखरच काहीही अनुभव नसल्यामुळे मैथिली जे काही म्हणेल, ते मला मान्य करावंच लागलं.

मी एक आठवड्याच्या रजेवर होते. आठवड्यानंतर ऑफिसात परत यायच्या नुसत्या कल्पनेनेच अंगावर काटा येत होता. मी गावाला गेलेली असताना ई-मेल्सचा आणि पत्रांचा नुसता ढीग साठलेला असणार होता. मी पत्रे वेगवेगळी काढण्यात गर्क असताना माझ्या सेक्रेटरीने त्यातून एक लहानसे पाकीट वेगळे काढले. तिच्या चेहऱ्यावर आश्चर्यचकित झाल्याचे भाव होते.

"त्या पाकिटात एवढं काय आहे ?" मी विचारलं.

सेक्रेटरीने मला एक लहानशी चिठ्ठी काढून दाखवली. मी ती पाहिली. त्यात

लिहिलं होतं : 'तुमची आणि माझी ओळख नाही, याची मला कल्पना आहे. मी तुमच्या कार्याविषयी वृत्तपत्रांमधून वाचलं. मी तुमचे लेखसुद्धा नेहमी वाचते. कोणताही लेखक जीवनाचा खराखुरा अनुभव घेतो, तेव्हाच त्याला त्याविषयी लिहिता येते. भाषा हे तर केवळ माध्यम आहे. पण जेव्हा उत्तम भाषेला व्यक्तिगत अनुभवाची जोड मिळते, तेव्हाच कोणताही लेख सुरस आणि वाचनीय होतो. तुमच्या अनुभवांविषयी वाचल्यावर तुम्ही काय प्रकारचं काम करता आणि ते केवढ्या विलक्षण आत्मीयतेने, उत्कटतेने करता...'

मी इतकी गडबडीत होते की एवढं वाचून मी ती चिठ्ठी माझ्या सेक्रेटरीच्या हातात परत ठेवली आणि म्हणाले : "नेहमीसारखं भरपूर स्तुतिसुमनं उधळणारं पत्र आहे. फायलीला लावून ठेव. या असल्या गोष्टी मला दाखवतसुद्धा जाऊ नकोस. माझा सकाळचा ऑफिसातला वेळ अत्यंत मोलाचा असतो."

मी जरा अधीर झाले होते.

"मॅडम, तुम्ही ती चिठ्ठी पूर्णपणे वाचली का ? ही नेहमीपेक्षा वेगळी आहे."

मग मी पुढे वाचू लागले. "मी एक वृद्ध असून मी तुमच्यासारखा प्रवास करू शकत नाही. मी काही पैसे साठवले आहेत. ते मी तुमच्याकडे सोपवू इच्छितो. म्हणजे तुम्ही त्याचा तुमच्या कार्यासाठी उपयोग करू शकाल. तुमच्याकडे आणखी बराच पैसा असेल, पण तुमच्या कामात हा माझा छोटासा वाटा. तुम्ही त्या पैशाचं काय करणार आहात, कोणाला देणार आहात, हे काहीही मी तुम्हाला विचारणार नाही. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे."

त्या चिठ्ठीसोबत चार लाख रुपयांचा ड्राफ्ट जोडला होता.

आता आश्चर्याने थक्क होण्याची पाळी माझी होती. सामाजिक कार्य करत असताना आजपर्यंत माझ्याकडे शेकडो विनंती अर्ज आले आहेत. एक तर देणगी मागण्यासाठी नाही तर माझ्याकडून मिळालेली देणगी अपुरी असल्याची तक्रार करणारी आणि इथे तो माणूस माझ्या कार्यासाठी मला देणगी देत होता. तो ड्राफ्ट उचलून मी सूर्यप्रकाशात धरला. निळ्या भोर आकाशात एखादा तारा चमकावा, तसा तो चमकत होता. त्या अनामिकाची काहीच मागणी नव्हती.

माझ्या सेक्रेटरीजवळ मी चौकशी केली तर तिलाही त्या माणसाची काही माहिती नव्हती. त्या दात्यानं स्वत:चं नाव लिहिलं नव्हतं, स्वत:ची काही माहिती लिहिली नव्हती, स्वत:चा पत्ता वगैरेही नव्हता. पोस्टाचा शिक्का पाहिल्यावर कळलं, की ते पत्र चेन्नईहून आलं होतं.



चेन्नईच्या त्या अनामिकापुढे मी आदराने नतमस्तक आहे. मला त्यावरून अबू बेन अदेम विषयीची कविता आठवते व म्हणावेसे वाटते, "मे हिज् ट्राईब इनक्रीज."

यामुळे मला परत एकदा मैथिलीच्या त्या श्रीमंत स्त्रीची आठवण झाली. दोन्ही देणगीदारांमध्ये केवढा फरक होता.

०००

# ४८

# जीवन ही एक कसोटी

मरण - एक छोटासा शब्द पण पृथ्वीतलावरील प्रत्येकाला घाबरवून सोडणारा शब्द. माणूस राजा असो, कोट्याधीश असो, रंक असो नाही तर भिकारी. पण मरणाच्या तावडीतून सुटेल, असा एकही माणूस नाही.

आपण कोणत्या कुटुंबात जन्म घेतो, यावरही आपलं काहीही नियंत्रण नसतं. तो केवळ एक अपघातच असतो. पण आपला जन्म कुठेही झालेला असला तरी एक ना एक दिवस आपण मरणार, हे निश्चितच असतं. आपल्या पूर्वजांना हे चांगलं समजलं होतं व त्याचमुळे मनुष्याचा जीवनप्रवास उत्तम पार पडावा म्हणून पुष्कळ नियम घालून ठेवले आहेत. त्यांनी आयुष्याचे चार भाग पाडले होते. त्यांपैकी शेवटचे दोन भाग म्हणजे वानप्रस्थाश्रम आणि संन्यास. हे दोन अत्यंत महत्त्वाचे असत. माणसाचं वय जसं वाढत जातं, तशी या गोष्टीची जाणीव अधिकाधिक होत जाते.

सुमित्रा आणि सुरेश हे दोघे माझे वर्गमित्र. सुमित्रा तिच्या तरुणपणी अत्यंत तरतरीत आणि बुद्धिमान होती. तिच्या अंगात अनेक गुण होते व तिला आयुष्यात पुढे जाण्याची जबरदस्त ओढ होती. वर्गात अभ्यासात तिचा नेहमी प्रथम क्रमांक असायचा. सुरेश मात्र सुमित्राइतका बुद्धिमान नव्हता. पण तो अत्यंत सुस्वभावी होता. दोघे प्रेमात पडले आणि त्यांचं लग्न झालं. सुरेशला त्याच्या धंद्यामधून बराच पैसा मिळू लागला. सुमित्राही त्याला त्या धंद्यात बरीच मदत करे.

त्यांची आर्थिक परिस्थिती इतकी उत्तम असूनही सुमित्रा उगीच कधी वायफळ खर्च करत नसे. तिला पैशाची किंमत आणि महत्त्व कळलं होतं.

माझी आणि त्या दोघांची अधूनमधून गाठभेट व्हायची. त्यांच्या घरी आम्ही कधीतरी एकत्र जमायचो. ते दोघंही उत्तम आदरातिथ्य करत. आम्ही सर्व जण त्यांच्या घराबाहेरच्या लॉनवर बसून जुन्या आठवणींमध्ये रमून जात असू.



बाह्यत: तरी दोघं आनंदात दिसत. अगदी जणू एकमेकांसाठीच बनलं असावं, असं जोडपं. पण तरीही कुठेतरी दु:खाची छटा दिसायची. त्या दोघांना मूल-बाळ नव्हतं. त्यामागेही त्यांचं काही कारण असावं, पण ते मला माहीत नव्हतं. आपण दुसऱ्याच्या खाजगी गोष्टीत कधीही जास्त लक्ष घालू नये अशा मताची मी आहे, कारण त्यामुळे उगीच गैरसमज होण्याची शक्यता असते.

एक दिवस सुमित्राचा निमंत्रण द्यायला फोन आला : "आज संध्याकाळी जेवायला येणं जमेल ?"

मला वाटलं नेहमीप्रमाणे जेवायला जायचं असेल. पण मी जेव्हा संध्याकाळी त्यांच्या घरी जाऊन पोचले तेव्हा वातावरणात जरासा ताण जाणवला. ते दोघेही चिंताग्रस्त आणि थकलेले दिसत होते.

मला पाहताच सुमित्राचा बांध फुटला व ती रडू लागली. "आज मी वैद्यकीय तपासणीसाठी गेले होते. नेहमीचीच तपासणी होती. म्हणजे मला तसं वाटलं होतं. पण डॉक्टर म्हणाले, मला किडनीचा काहीतरी आजार आहे. मला खूप भीती वाटते आहे."

त्यांना काळजी वाटणं स्वाभाविक होतं. गेल्याच वर्षी सुरेशला हार्टअ‍ॅटॅक येऊन गेला होता. दोघेही पूर्णपणे एकमेकांवर अवलंबून हाते. दोघेही एकमेकांची काळजी घ्यायचे आणि काळजी करायचे. पण आता मात्र आपण याला टिकाव देऊ शकू की नाही अशी शंका दोघांनाही सतावत होती.

आयुष्यात प्रकृतीइतकी महत्त्वाची दुसरी कोणतीच गोष्ट नाही. उत्तम प्रकृती हीच माणसाची सर्वात मोठी संपत्ती असते. पैशाने औषध विकत घेता येईल, सुखसोयी आणि सुविधा मिळवता येतील, पण सुख नाही. आपल्या चिंता माझ्यापुढे बोलून त्यांना मन मोकळं करायचं होतं. मीही अगदी मनापासून त्यांचं बोलणं ऐकलं.

सुरेशचा दृष्टिकोन एकदम व्यवहारी होता. "हे बघ आता उरलेली वर्षे पैसा कसा खर्च करायचा याचा व्यवस्थित विचार आत्तापासूनच करायला हवा. मला वाटतं आपण मृत्युपत्र करून ठेवावं, म्हणजे नंतर नातेवाईकांमधे काहीही प्रश्न उपस्थित होणार नाही. आजवर एकाही नातेवाईकाने संकटाच्या वेळी आपल्याला मदत केलेली नाही. तेव्हा मला वाटतं आपण कुणासाठी काहीही ठेवू नये."

सुरेशचं म्हणणं खरंच होतं. माणसानं जेव्हा स्वत: कष्ट करून पैसा मिळवलेला असतो, तेव्हा त्याचं व्यक्तिमत्त्वच वेगळं बनलेलं असतं. पण जर त्याला काहीही कष्ट न करताच वारसा हक्कानं पैसा मिळाला, तर तो स्वत: खंबीर कसा बनणार ?

त्यामुळेच सुरेशने ही योजना आखली होती.

पण सुमित्राचं मत वेगळं होतं. आजवर इतके वर्षांत पहिल्यांदाच सुमित्रानं आपल्या नवऱ्याच्या मताला विरोध केला होता. खरं तर त्या रात्री चांगली थंडी पडली होती. पण दोघा पती-पत्नींच्या वादविवादामुळे वातावरण तप्त झालं होतं. मी त्यांच्या वादामधे पडले नाही. मी तर तशी परकीच, मी मधे तरी कशी पडणार ? मला तर वाटलं, आपण तिथे थांबूसुद्धा नये.

मी जायला निघाले, पण सुमित्रानं मला थांबवलं. ती म्हणाली, "आम्ही तुला मुद्दाम बोलावून घेतलंय. तुझ्या काही सूचना असतील तर सांग. तू आमची खूप जवळची मैत्रीण आहेस, आणि नि:पक्षपातीसुद्धा आहेस. तेव्हा स्वत:ला परकी समजू नको."

त्यामुळे मग मला थांबून त्या दोघांचाही युक्तिवाद ऐकावाच लागला.

"मी स्वत:वर आजवर कधीच खर्च केलेला नाही. आता मी अजून किती दिवस जगेन, काही सांगता येत नाही. त्यामुळे मला आयुष्याचा आनंद लुटायचंय." असं सुमित्राचं म्हणणं होतं. त्या दिवशी कोणताच निर्णय होऊ शकला नाही.

असेच दिवस चालले होते. उभयतांमध्ये हळूहळू दुरावा वाढताना दिसत होता. मला सुरेशपेक्षा सुमित्राविषयी जास्त कानावर येऊ लागलं. ती जास्त वेळा भेटायची. तिने अचानक स्वत:साठी एकदम अत्याधुनिक फॅशनचे कपडे खरेदी करायला सुरुवात केली. मग ते स्वत:ला चांगले दिसतात का नाही, याची तिला क्षिती नव्हती. मासिकाच्या वृत्तपत्रांच्या 'सोसायटी पेजेस'मधे तिचे फोटो नजरेस पडू लागले.

एकदा मी मुंबईहून परत येत होते, तेव्हा ती मला विमानतळावर भेटली. माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. ही तीच सुमित्रा का ? लांब केसांची ? सुती साड्या नेसणारी ? आज तिच्या अंगांत पारदर्शक पाश्चात्य कपडे होते. हिऱ्यांचे दागिने होते — ब्रेसलेटस्, कर्णभूषणे, अंगठ्या, साखळ्या. चेहऱ्यावर अर्धा इंच जाडीचा रंगरंगोटीचा थर होता. परफ्यूमचा सुगंध नाकात शिरत होता.

आपण मुंबईला का आलो होतो, तेही तिने सांगितले. "मी मुंबईला रेस बघायला आले होते. मी आजवर कधी रेस पाहिली नव्हती. त्यामुळे हा एक अनुभव घेऊन पाहावा, असं मी ठरवलं. आणि आता मी चेन्नईला एका फिल्म प्रोड्यूसरच्या मुलीच्या लग्नासाठी चालले आहे."

"तू फिल्म प्रोड्यूसर वगैरे लोकांच्या वर्तुळात कधीपासून वावरायला लागलीस ?"



"काही दिवसांपासून मी चित्रपटांसाठी अर्थसाहाय्य करण्यास सुरुवात केली आहे. फार मोठं क्षेत्र आहे ते. मला तर त्याची काही कल्पनासुद्धा नव्हती. मी आजवरचं आयुष्य असंच घालवलं. कितीतरी गोष्टींच्या आनंदाला मुकले मी. आता मात्र मी पूर्वीपेक्षा खूप गडबडीत असते."

"सुरेश कसा आहे ?"

"माझा प्रश्न ऐकून तिला विशेष आनंद झाला नाही. तो नेहमीप्रमाणेच धंद्याच्या व्यापात बुडून गेला आहे."

आता मला एक गोष्ट कळून चुकली — दोघं आपापलं आयुष्य आपापल्या पद्धतीनं घालवत होते. सुरेशचा मधूनच कधीतरी फोन यायचा— या नाही तर त्या शिक्षणसंस्थेची माहिती विचारायला. माझ्या अनुभवामुळे मी त्याला माझं प्रांजळ मत देत असे.

काही दिवसांनंतर सुरेशच्या वकिलाचा फोन आला. "सुरेशनं त्याचं मृत्युपत्र बनवलं आहे आणि त्याचं विश्वस्त म्हणून तुम्हाला कार्यवाही करावी लागेल. हे तुम्हाला मान्य आहे ?"

सुरेशने घेतलेला हा निर्णय ऐकून मला धक्का बसला. माझं आणि त्याचं काही नातं नव्हतं की आमचे काही व्यावसायिक संबंध नव्हते. आपण जावं आणि त्याला भेटावं, असं माझ्या मनात आलं. आयुष्यात सर्वात मोठी जबाबदारी जर कोणती असेल, तर ती म्हणजे —दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचे पैशाचे व्यवहार सांभाळणं. आपले स्वत:चे पैसे असले, तर ते गमावले किंवा त्यात काही नुकसान झालं, तर चालू शकतं. पण आपण जर एखाद्या विश्वस्त निधीचे विश्वस्त असलो, तर आपली जबाबदारी हजार पटींनी वाढते. विश्वास ही एक गोष्ट अशी आहे, जी या जगात सहसा आढळत नाही.

मी सुरेशच्या घरी जाऊन त्याला भेटले. सुमित्रा त्या वेळी दिल्लीला गेलेली होती. तो एकटाच होता. आनंदात होता आणि आपल्या वकिलाशी बोलत होता. त्याचं मृत्युपत्र वाचून मी चकित झाले. त्याची अनेक शिष्यवृत्त्या सुरू करण्याची इच्छा होती. शिक्षणसंस्था, वाचनालये आणि कॉम्प्युटर संस्थांना देणग्या देण्याची इच्छा होती. पण त्या सर्वांत कुठेही स्वत:च्या नावाच उल्लेख असू नये, असं त्याचं म्हणणं होतं. सर्व देणग्या सुमित्राच्या नावाने द्यायच्या होत्या.

ते ऐकून माझ्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह उमटलं.

"होय," तो म्हणाला. "आमच्या कल्पना, आमचे विचार भिन्न असतील. पण तिच्या मदतीशिवाय मी माझ्या या व्यवसायाची उभारणी करू शकलो नसतो.

तिची स्वत:ची काही मते आहेत. पण माझा मात्र या सर्वांकडे बघण्याचा दृष्टिकोन हा असा आहे.''

''सुमित्रेला या मृत्युपत्राविषयी काही कल्पना आहे ?''

''नाही. आणि तिला यातलं काही कळूनसुद्धा द्यायचं नाही.''

त्यानंतर सुमारे एका आठवड्याने कळलं, सुमित्रेची प्रकृती चिंताजनक होती. मी हॉस्पिटलमधे जाऊन पोचेपर्यंत तिचं निधन झालेलं होतं. तिच्या बँकेत एक पैसाही शिल्लक नसल्याचं तेव्हा कळलं.

आपल्या पत्नीच्या निधनाचं दु:ख सुरेशनं पेललं. त्यांच्या लग्नाला बरीच वर्षं झाली होती. तिच्याशिवाय आयुष्य काढणं, किती कठीण जाणार होतं त्याला ! त्यानंतर एका वर्षाने सुरेशच्या वकिलाचा फोन आला — सुरेशचं झोपेत निधन झालं होतं.

माझ्या दोन जवळच्या लोकांचं जीवन एका वर्षाच्या कालावधीत संपलं होतं. आज कधीही 'सुमित्रा मेमोरियल प्राईझ'कडे पाहिलं की माझ्या मनात एक प्रश्न उभा राहतो — 'हे जीवन किती विलक्षण आहे, नाही ?' आपण आता मरणार आहोत. हे त्या दोघांनी जाणलं होतं. पण दोघांनी भिन्न भिन्न मार्ग अंगिकारले होते. सुमित्रा ही खरं तर सुरेशपेक्षा बुद्धिमान. पण सुरेशला जीवनाचा अर्थ जसा उमगला, तसा सुमित्राला नाही उमगला. तिनं उरलेलं आयुष्य मौजमजेत घालवायचं ठरवलं. सुरेशनं मात्र मानवजातीच्या कल्याणासाठी काम करायचं ठरवलं. दोघांची परिस्थिती सारखीच असूनसुद्धा दोन व्यक्तींनी किती वेगवेगळ्या गोष्टी केल्या.

ooo



## ४९

# माझा पैसा - तुझा पैसा

माझं स्वत:चं वय कितीही असलं तरी मला मनानं तरुण असल्यासारखं वाटतं. याचं कारण मी एक शिक्षिका आहे. मी नेहमी तरुण पिढीमधे मिसळते. त्यांचा आनंद संसर्गजन्य असतो. ती तरुण मुलं त्यांची गुपितं माझ्यापुढे उघडी करतात. ती मुलं ही माझी प्रेरणा आहे.

मी एका महाविद्यालयात शिकवते आणि प्रत्येक वर्गातील असंख्य मुलांची आणि माझी गाठभेट होत असते. काही दिवस लोटले की कदाचित त्यांची नावं नाही माझ्या लक्षात राहात. पण मुलं मात्र मला विसरत नाहीत. अनेक वेळा हॉटेलात नाही तर विमानतळावर माझ्याजवळ रिझर्वेशन नसताना माझे हे जुने विद्यार्थी माझ्या मदतीला धावून आलेले आहेत. मी त्यांची प्राध्यापिका होते ते त्यांच्या चांगलंच स्मरणात असतं आणि मला जास्तीत जास्त मदत करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. माझ्या जुन्या विद्यार्थ्यांना भेटून, त्यांच्याशी बोलून मला अत्यानंद होतो. जुनी वाईन, जुन्या आठवणी आणि जुने विद्यार्थी अनमोल असतात हेच खरं !

सुमारे १०-१२ वर्षांपूर्वीची गोष्ट असेल. मी पदव्युत्तर अभ्यासक्रम शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना कॉम्प्युटर सायन्स शिकवत असे. त्या विशिष्ट बॅचमधे अत्यंत बुद्धिमान असे काही विद्यार्थी होते. त्यांच्यातील दोघे म्हणजे अशोक आणि अनिता. ते दोघे मला खूप आवडत. दोघेही अत्यंत अभ्यासू आणि मेहनती होते. पदवीधर झाल्यावर दोघेही एक दिवस मला भेटायला आले. त्यांना पुढे प्राध्यापक व्हायचं होतं, शिक्षण क्षेत्रात पडायचं होतं. त्यांना माझं मत हवं होतं.

''जर तुम्हाला खरोखरच शिकवणं इतकं आवडत असेल, त्याविषयी अत्यंत प्रेम, उत्कटता असेल, तर जरूर शिक्षण क्षेत्रात शिरा. आज सॉफ्टवेअर इंडस्ट्रीमध्ये तुम्हांला दोघांनाही खूप मोठ्या पगाराच्या नोकऱ्या मिळू शकतील. एवढा पैसा

कोणत्याही कॉलेजात शिकवून तुम्हाला मिळणार नाही. पण काही झालं तरी कॉलेजात शिकवून जे मानसिक समाधान मिळतं त्याची तुलना पैशाशी करताच येणार नाही. पण जर तुम्हांला शिकवायला आवडत नसेल आणि तरीही तुम्ही शिकवायला सुरुवात केलीत, तर ती मात्र मोठीच चूक होईल. जर एखाद्या डॉक्टरच्या हातून चूक झाली तर त्याच्या रुग्णाला मूठमाती मिळते. जर एखाद्या न्यायाधीशांनी चूक केली तर एक माणूस वरती जातो. पण जर एखाद्या शिक्षकाने चूक केली तर मात्र त्याच्या संपूर्ण वर्गावरच त्याचा परिणाम होतो. त्या सर्व मुलांच्या भविष्यावर परिणाम होतो.''

तरीही अनिता आणि अशोक अध्यापनाच्या क्षेत्रातच शिरले. काही दिवसांनी त्या दोघांनी लग्न केलं. मी त्यांच्या लग्नाला जाऊन त्यांना मनापासून शुभाशीर्वाद दिले. आता ते दोघेसुद्धा माझ्यासारखे प्राध्यापक झाले होते.

काही दिवस लोटले आणि त्यांना मुलगी झाली. अशोकने स्कूटर घेतली. त्यांचं छोटंसं कुटुंब सुखी होतं. त्यांनी दोन बेडरूम्सचं घर भाड्यानं घेतलं होतं. कोणत्याही सुशिक्षित मध्यमवर्गीयांप्रमाणे त्यांचा संसार सुखानं चालला होता. अशोकची विधवा आई त्यांच्याकडेच राहात असे. एकंदर सगळं आयुष्य सुखासमाधानात चाललं होतं. आनंदात चाललं होतं.

आता अनिता आणि मी सह-अध्यापिका होतो. पण आमच्या दोघींच्या वेळा वेगवेगळ्या असल्याने आमची भेट क्वचितच होत असे. एक दिवस ती मला कॉम्प्युटर लॅबमधे भेटली. ती काळजीत दिसत होती. चेहऱ्यावर दु:खाची छटा होती. ''मॅडम, घरमालकाला आमचं घर परत हवं आहे. मला वाटतं दुसरं कुठलं घर आता भाड्यानं घ्यायचं म्हटलं, तरी दर वेळी हे असंच होणार. त्यापेक्षा स्वत:चं घर असलेलं बरं. आता माझी मुलगीसुद्धा मोठी झाली आहे. आता तिचं शाळेत नाव घालायला हवं. आमच्या दोघींच्या वेळा जमत नाहीत, त्यामुळे मला काही तिला स्कूटरनं सोडायला जाता येत नाही. माझ्या सासूबाईंचं वय झालंय. त्यांना संधिवाताचा त्रास आहे. घरात त्यांच्या मदतीसाठी एक बाई ठेवायला हवी. इतके खर्च सारखे पुढे येऊन उभे राहतात.''

मला तिची समस्या कळली. मी मान हलवली. अखेर माझ्या तरुणपणी या सर्व अडचणींना मलाही तोंड द्यावं लागलंच होतं.

ती पुढे म्हणाली, ''मी एका सॉफ्टवेअर कंपनीत जॉब घ्यायचं ठरवलंय. म्हणजे मला बराच जास्त पगार मिळेल. अशोकला शिकवताना खूप आनंद मिळतो. त्याला आपलं शिक्षणाचं क्षेत्र सोडायचं नाही आहे. पण आमच्या दोघांपैकी



एकाला तरी जास्त पगाराची नोकरी धरायलाच हवी ना ? मग ती दोघांपैकी कोण धरतो, हे काय महत्त्वाचं आहे का ? अशोकमधे आणि माझ्यात काय फरक आहे ? आम्ही दोघं एकच आहोत ना ? मग दोघांमधला कोण किती पैसा मिळवतो, याला काय महत्त्व आहे ? अशोकचाही मला पाठिंबा आहे. तो अत्यंत समजूतदार पती आहे. माझ्या सासूबाईसुद्धा खूप मोठ्या मनाच्या आहेत. मी सॉफ्टवेअर कंपन्यांकडे अर्ज लिहायला सुरुवात केली आहे. मी रेफरन्स म्हणून तुमचं नाव लिहू ?''

अनिताचे विचार तर्कसुसंगत, व्यवहारी होते. तिनं माझं नाव रेफरन्स म्हणून दिलं, तरी चालेल, असं मी तिला सांगितलं. तिला नोकरी मिळाली. तिनं मला फोन करून माझे आभारसुद्धा मानले.

तीन वर्षांनंतर तिनं मला ई-मेल पाठवून तिच्या घराच्या वास्तुशांतीसाठी बोलावलं. मला खूप आनंद झाला आणि मी कार्यक्रमाला गेले. तिचं घर छोटंसं, तीन बेडरूम्सचं पण सर्व अत्याधुनिक सोयींनी युक्त असं होतं. ती खूप आनंदात होती. आत्मविश्वासानं चेहरा उजळला होता. बाकीचे सर्व पाहुणे गेल्यावर माझ्यापाशी निवांत बोलण्यासाठी ती बसली.

''मॅडम, माझ्या मेहनतीचं हे फळ आहे. या घरासाठी पै पै करून मी पैसे जमवले आहेत. आज आता हे घर आमचं स्वत:च आहे. इथून आता कुणी आम्हांला जा म्हणून सांगणार नाही.''

''तुझी नोकरी कशी काय चालली आहे ?''

''फारच छान. कष्ट खूप पडतात. पण मला आवडतं माझं काम. तीन वर्षांत त्यांनी मला ग्रुप लीडर केलं आहे. माझ्या हाताखाली पाच माणसं आहेत. मला खूप वेळ काम करावं लागतं. कंपनीनं मला दोन वेळा अमेरिकेला पाठवलं. प्रत्येक वेळा तीन तीन महिन्यांसाठी.''

''पण तू तुझ्या मुलीला सांभाळून हे सारं कसं जमवतेस ?''

माझ्या सासूबाई आणि कामवाली मिळून मुलीचं सगळं करतात. माझी कामाची बाई फार चांगली आहे. शिवाय लक्ष ठेवायला अशोक असतोच ना.

काही दिवसांनंतर ती मला जयनगरमधे दिसली. ती ओपल अॅस्ट्रा गाडीतून चालली होती. बरोबर तिची कामाची बाईपण होती. बाईच्या अंगावर झकपक कपडे होते. ती अनिताच्या पाच वर्षांच्या मुलीचा हात हातात धरून बसली होती. मला पाहून अनिताला खूप आनंद झाला. पण तिचा एकूण अवतार पाहून मला फार आश्चर्य वाटलं. ती खूपच वेगळी दिसत होती. तिच्या अंगावर भारी साडी होती. कानांत हिरे चमकत होते. हातांत किमान डझनभर सोन्याच्या बांगड्या होत्या.

चेहऱ्यावर रंगरंगोटी तर होतीच पण त्यातूनही नव्याने उमटलेली उर्मटपणाची झाक लपत नव्हती. जरा आत्मविश्वास जास्तच वाढला होता की उद्धटपणा ? मला कळायला मार्ग नव्हता.

अनिता आनंदात होती. "मॅडम, मला माझ्या कंपनीनं एम्प्लॉयी स्टॉक ऑप्शन दिले होते. त्यांपैकी काही विकून मी ही गाडी घेतली. मी माझ्या संपूर्ण कुटुंबाला, या बाईलासुद्धा सुटीसाठी सिंगापूरला घेऊन गेले होते. आता पुढच्या वेळी जेव्हा मी अमेरिकेला जाईन तेव्हा माझ्याबरोबर चल असं अशोकला म्हणते आहे. मुलीलापण येऊन जायचा विचार आहे. कंपनी माझ्यावर अवलंबून असलेल्यांचा खर्च देईलच. छान झालं की नाही ?"

हो. फारच छान. पण कुठेतरी काहीतरी खटकलं मला.

"आणि अशोक कसा आहे ?"

आता तिचा आवाज जरा बदलला. कुठेतरी दुःखाची छटा उमटली. ती म्हणाली, "तो अजूनही कॉलेजातच आहे. तेच ते जुने पुराणे विषय शिकवतोय. नुकतीच त्याला बढती मिळाली. जेमतेम पाचशे रुपये वाढले. मॅडम, तुम्ही तरी या अशोकला काहीतरी सांगा. तो खरंच फुकट त्या कॉलेजात नोकरी करून आयुष्य वाया घालवतोय. त्याला तर माझ्यापेक्षासुद्धा कितीतरी चांगली नोकरी मिळेल. तो माझ्याहून कितीतरी बुद्धिमान आहे. पण तो मुळी माझं ऐकतच नाही. त्या शिक्षण क्षेत्रात काम करून त्याच्यातील स्पर्धात्मक भावनाच संपुष्टात आली आहे."

"अनिता, प्रत्येक जण सुजाण असतो. आपल्याला काय हवं, ते ज्याचं त्याला समजतं."

पण माझ्या उत्तरानं तिला मुळीच आनंद झाला नाही.

पुढे काही दिवसांनंतर प्राध्यापकांच्या एका कार्यशाळेत माझी व अशोकची गाठ पडली. जेवणाच्या सुट्टीत बोलायला जरा मोकळा वेळ मिळाला.

"माझ्या वैयक्तिक अडचणी तुम्हाला सांगायला सुरुवात करतो, त्याबद्दल सॉरी. पण अनिता आणि मी आमच्या दोघांना गेल्या कित्येक दिवसांपासून ओळखणाऱ्या अशा फक्त तुम्हीच आहात. आम्हांला विद्यार्थी असल्यापासून तुम्ही पाहात आलात. नंतरही प्राध्यापक म्हणून ओळखता. तेव्हा तुमचं मत माझ्या दृष्टीनं फार महत्त्वाचं आहे."

"अनितानं सांगितलं का- माझ्याशी बोलायला ?" मी विचारलं. कारण काही दिवसांपूर्वीच अनिताची आणि माझी गाठ झाली होती.

"नाही. मला वैवाहिक जीवनात काहीच समाधान वाटत नाही. कित्येकदा



वेगळं होण्याचा विचार मनात येतो."

"अशोक, वेडा आहेस का ? पती-पत्नींमधे मतभेद तर नेहमीच होतात. तरुणपणी तर नक्कीच होतात. जर कुणी असा दावा करत असेल, की आमच्यात मुळीच मतभेद होत नाहीत, तर मग ते नवरा-बायकोच नाहीत." मी विनोदाचा आधार घेत वातावरणातील ताण कमी करण्याचा प्रयत्न केला. पण अशोकवर मात्र त्याचा काही परिणाम झालेला दिसला नाही.

"नाही, मॅडम. अनिताला वाटतं, तिचा जॉब फार जास्त महत्त्वाचा आहे. श्रेष्ठ आहे. ती इतरांकडे तुच्छतेनं बघते. आजकाल 'मी'पणा फार वाढलाय तिचा. 'हे घर मी माझ्या पैशांनी घेतलं, माझे एम्प्लॉयी स्टॉक ऑप्शनचे शेअर्स विकून त्या पैशातून काय वाटेल ते विकत घेता येईल.' सॉफ्टवेअर कंपन्यांची आजकाल चलती आहे त्यामुळे एम्प्लॉयी स्टॉक ऑप्शन ज्यांना मिळाले त्यांचं भलंच होणार, हे तर उघडच आहे. पण त्यामुळे आमच्या घरातलं वातावरण बिघडत चाललं आहे. आजकाल ती माझ्या आईशीसुद्धा पूर्वीसारखी आदरानं वागत नाही."

"का ?" मी वेड्यासारखा प्रश्न केला.

"कारण एखाद्या तरतरीत कामसू बाईला तिची जागा कधीही घेता येईल. अनिताला वाटतं मी वर्षभर घासून जेवढे पैसे कमावतो, तेवढे तर तिला तिच्या शेअर्समधले अगदी थोडेसे विकूनसुद्धा कधीही मिळवता येतील. ती माझ्याहून कितीतरी वरच्या दर्जाची आहे, असं ती मला सारखं सांगत असते. ज्या पत्नीचा हा असा दृष्टिकोन असेल, तिच्याबरोबर मला राहणं शक्य नाही."

"पण अशोक, जर हेच बरोबर उलटं झालं असतं, तर ? मग काही प्रश्न आला नसता ना ? तुझ्या पत्नीला तुझ्यापेक्षा जास्त पैसा मिळतो, ही गोष्ट तू स्वीकारू शकत नाहीस का ? कदाचित आपल्या या पुरुषप्रधान समाजव्यवस्थेमुळे तुझ्या 'अहं'ला धक्का पोचत असेल."

अशोक जरासा विचारात पडला. मग म्हणाला, "काही प्रमाणात तुमचं म्हणणं खरं असेलही, मॅडम. पण जरी याच्या विरुद्ध परिस्थिती असती, आणि सर्व वेळ मी माझा पैसा, माझा पैसा असं गाणं गायलं असतं, तरी तिला वाईट वाटलंच असतं. पतीपत्नींमध्ये कोणी वरच्या पातळीवर, कोणी खालच्या पातळीवर असा फरक मानणं योग्य नव्हे. पतीपत्नींमधील कोणी एक दुसऱ्यापेक्षा जास्त पैसा मिळवतो म्हणून पहिल्याने त्याच्याबद्दल जरा जास्त आदरभाव दाखवला पाहिजे, ही गोष्ट योग्य आहे का ? पण त्याहूनही मला सर्वात दुःख कशाचं होतं, तर मी तिला जो काही आधार देऊ करतो, त्याकडे ती पूर्णपणे दुर्लक्ष करते. जेव्हा लोकांना फार

कमी काळात फार जास्त पैसा मिळून जातो, तेव्हा लोकांचं वागणं बदलतं व ते अनितासारखे वागू लागतात. पैसा जरूर मिळावा, पण तो हळूहळू, काही विशिष्ट कालावधीत तो जमला पाहिजे. म्हणजेच पैशाविषयी माणसाला आदर वाटतो. पुरुष असो की स्त्री, फार कमी वेळात फार जास्त पैसा हाती येणं, ही गोष्ट धोकादायकच असते. दारूच्या बाबतीत होतं ना, अगदी तसंच.''

त्यावर माझ्याकडे उत्तर नव्हतं. मी विचारांमधे बुडून गेले. पैसा हे एक दुधारी शस्त्र आहे. ते फळ कापायला वापरा, नाही तर मनुष्यवध करायला. पैसा मिळवणं हे निश्चित महत्त्वाचं आहे, पण तो मिळवल्यावर तुम्ही कसे वागता, हे त्यापेक्षाही जास्त महत्त्वाचं आहे. जर अनिताच्या अंगात थोडी परिपक्वता असती, तर आपल्या आजूबाजूच्या ज्या लोकांच्या सहकार्यामुळे व आधारामुळे आपल्याला हे यश मिळालं, त्यांच्याविषयी तिला ऋण वाटलं असतं. तिनं त्यांचे आभार मानले असते. तिनं 'मी' या शब्दाऐवजी 'आपण' असे शब्द वापरले असते. तिनं खरं तर असं म्हणायला पाहिजे होतं- 'माझ्या नवऱ्याचा पाठिंबा होता, म्हणूनच हे घर मी बांधू शकले.'

पण कदाचित हे माझं मत असेल. तरुण मुलांमुलींच्या आयुष्यात पैसा कसा शिरकाव करतो आणि त्याच्या आयुष्यातील आनंद कसा हिरावून घेतो, हे मला खरं तर नीट माहीतच नाही.

ooo



## ५०

# हा कुठला न्याय ?

एखाद्या व्यक्तीला जर काही शारीरिक व्याधी असेल, आजार असेल तर लोकांना त्या व्यक्तीविषयी सहानुभूती वाटते. पण जर कुणी मनोरुग्ण असले, तर मात्र आपल्या देशातील लोकांचा त्याच्याकडे बघण्याचा दृष्टिकोन निराळा असतो. आपल्या समाजात एखाद्याला मनोविकार असणं हा जणू काही कलंक असल्यासारखं मानतात. माणसाच्या मनाचं आरोग्य त्याच्या शरीराच्या आरोग्याइतकंच, किंबहुना त्यापेक्षाही अधिक महत्त्वाचं आहे, हे आपण कधी लक्षातच घेत नाही.

मी एका मनोविकार तज्ज्ञांबरोबर काम करत असे. त्या मनोरुग्णांवर उपचार करत व त्यांच्या बऱ्या झालेल्या रुग्णांच्या पुनर्वसनाच्या कामी मी मदत करत असे. याचं कारण एवढंच की अशा रुग्णांवर केवळ उपचार करून भागत नाही. या लोकांचं पुनर्वसन करणंसुद्धा तितकंच महत्त्वाचं आहे. सर्वसामान्यपणे लोकांची अशी एक समजूत असते, की मनोरुग्ण हा कायमचा मनोरुग्ण राहतो. एवढंच काय तर मनोरुग्णाला आपल्या समाजात सरळ वेडा ठरवण्यात येतं.

सुप्रसिद्ध कन्नड लेखिका त्रिवेणी यांनी याच विषयावर एक अत्यंत सुंदर कादंबरी लिहिली आहे. तिचं नाव आहे 'शरपंजरा'. या कादंबरीत अशा रुग्णांबद्दलचा समाजाचा दृष्टिकोन फार सुरेख रीतीने चित्रित केला आहे. पुढे या कादंबरीवर चित्रपटसुद्धा काढण्यात आला.

माझी डॉक्टर मैत्रीण कुसुम मला अशा अनेक प्रसंगांविषयी नेहमी सांगत असते. या सत्यघटना अक्षरश: काळजाला हात घालणाऱ्या असतात. कधीकधी मजेशीरसुद्धा असतात.

अशीच एक कहाणी कुसुमनं सांगितली. एकदा एका पार्टीत कुसुमला एक स्त्री भेटली. ती समाजात चांगली प्रसिद्ध होती. काही वर्षांपूर्वी याच स्त्रीवर कुसुमनं डिप्रेशन (नैराश्य) या विकारासाठी उपचार केले होते. त्यातून ती पूर्ण बरीसुद्धा

झाली होती. आज तिला पाहून कुसुमला अत्यंत आनंद झाला व ती मुद्दाम तिच्याशी बोलावं म्हणून तिच्यापाशी गेली.

पण ज्या क्षणी त्या स्त्रीनं कुसुमला आपल्याकडे येत असलेलं पाहिलं, त्या क्षणी ती ओळखही न देता निघून गेली. कुसुमला धक्काच बसला. तिला वाटलं होतं, आपल्याला पाहून त्या स्त्रीला आनंद होईल. नंतर थोड्या वेळाने पार्टीत जमलेल्या सर्व लोकांशी कुसुमची ओळख करून देण्यात आली, तेव्हा तर त्या स्त्रीने चेहऱ्यावर ओळखीचं चिन्हही दाखवलं नाही.

पार्टी संपल्यावर मात्र ती कुसुमच्या जवळ येऊन म्हणाली, "डॉक्टर, मगाशी मी तुमच्याशी अशी परक्यासारखी वागले. तुम्हाला ओळख दिली नाही, त्याबद्दल माफ करा. तुम्ही तर मला पुनर्जीवन दिलंय. पण या एवढ्या लोकांच्या उपस्थितीत मी तुम्हाला ओळख देऊ शकत नव्हते. तुम्ही मानसोपचार तज्ज्ञ आहात हे इथे सगळ्यांनाच माहीत आहे. मी तुमची पेशंट आहे असं त्यांना कळेल आणि मग त्यांना वाटेल मी वेडीच आहे."

कुसुम हताशपणे तिच्याकडे पाहात राहिली व ती स्त्री डोळ्यांतील अश्रू पुसत निघून गेली.

एकदा काही लो-टेक्नॉलॉजी प्रोजेक्टस्बद्दल मला चर्चा करायची होती. काही पेशंटस्ना त्यातून काम मिळवून देऊन त्यांना उपजीविकेचं साधन मिळवून देणं हा हेतू होता. त्यासाठी मी कुसुमच्या दवाखान्यात गेले होते. कुसुमकडे एक पेशंट असल्याने रिसेप्शनिस्टनं मला बाहेर वेटिंग रूममधे बसवलं. तिथे माझ्या शेजारीच एक वयोवृद्ध जोडपं बसलं होतं. त्यांच्या चेहऱ्यावर साधं स्मितहास्यसुद्धा नव्हतं. त्यांचे चेहरे चिंताग्रस्त होते. त्यांच्या कपड्यालत्त्यावरून ते अत्यंत सधन परिस्थितीत असल्यासारखे दिसत होते. बहुधा त्यांची मुलगीच पेशंट असावी. मग माझ्या मनात विचार आला : पैशापेक्षासुद्धा मुलांनी मनानं निरोगी असणं कोणत्याही आईवडिलांच्या दृष्टीनं किती महत्त्वाचं असतं. कदाचित हे आईवडील एवढे नशीबवान नसावेत.

काही वेळाने आतील पेशंट बाहेर येताच मी कुसुमच्या केबिनमधे शिरले. त्या बाहेर असलेल्या जोडप्याचे विचार अजूनही माझ्या मनात घोळत असल्यामुळे मला तात्पुरता पेशंटस्च्या पुनर्वसनाच्या गोष्टीचा विसर पडला. त्या जोडप्याची अडचण नेमकी काय होती ते जाणून घ्यायची मला उत्सुकता लागून राहिली होती म्हणून मी कुसुमकडे त्याविषयी चौकशी केली. पण एका डॉक्टरने पेशंटविषयीची गुप्त माहिती बाहेर सांगणं योग्य नव्हे, त्यामुळे तिनं मला त्यांच्याबद्दल काहीच



सांगितलं नाही. परंतु काही दुसऱ्या पेशंटस्विषयी तिनं मला काही गोष्टी सांगितल्या. अर्थात त्यांची खरी नावं मला न कळू देता.

"माझ्या एका पेशंटचं नाव माया. ती चांगल्या सुसंस्कृत घराण्यातील होती. तिचं लग्न एका चांगल्या सुशिक्षित घराण्यात झालं होतं. मात्र सासरचे लोक तितकेसे सुसंस्कृत नव्हते. तो ठरवून केलेला विवाह होता. त्यांनी वराची नोकरीही घराण्याच्या सुसंस्कृत असण्यापेक्षा जास्त महत्त्वाची मानून त्यानुसार हे लग्न ठरवले होते. तिच्या पतीचे नाव होते जगदीश. त्याच्या बहिणी आणि आई मायाशी अत्यंत वाईट वागत. जगदीश नोकरीत इतक्या वरिष्ठपदी होता, पण नवल असं की घरी मात्र आपल्या आईला तो प्रचंड घाबरत असे. तिच्या ताटाखालचं मांजरच होता. त्याच्या आज्ञाधारकपणाचा फायदा घेऊन त्याची आई आपल्या सुनेचा छळ करत असे. जगदीश हा मायाचा नवरा नसून खरं तर आपल्या आईचा मुलगा होता."

"कुसुम, ही गोष्ट बऱ्याच घरांमधे घडत असते. अशा प्रकारे छळ झालेल्या किंवा होणाऱ्या किती स्त्रिया असतील, कोण जाणे."

"अगदी खरं आहे. समाजाचं दडपण अतिशय जास्त असतं. अनेकदा टी. व्ही.च्या मालिकांमधून आणि चित्रपटांमधून या लग्न होणं, नवरा मिळणं इत्यादी गोष्टींना फार अवास्तव महत्त्व देण्यात येतं."

"मग या मायानं त्यावर काय केलं ?"

"मायानं इतर कोणत्याही भारतीय स्त्रीप्रमाणेच आपल्या सासरच्या माणसांशी जुळवून घेण्याचा आटोकाट प्रयत्न केला. चांगले संबंध प्रस्थापित करण्यासाठी तिनं खरंच खूप कष्ट घेतले. तिला नेहमी वाटायचं, कधी ना कधीतरी आपल्या सासरच्या माणसांचं वागणं बदलेल. पण अखेर तिला कळून चुकलं, की आपला नवरा आपली बाजू कधीच घेणार नाही, तेव्हा तिला नैराश्य आलं. आपल्या पतीनं आपल्यावर प्रेम करावं, अशी प्रत्येक स्त्रीची अपेक्षा असते. ते प्राप्त करण्यासाठी काहीही सहन करायची, कशालाही तोंड द्यायची तिची तयारी असते. पण एकदा जर तिला कळून चुकलं, की आपल्याला त्याचं प्रेम मिळणारच नाही, तर मग ती अत्यंत निराश होते."

तरुण, संवेदनाक्षम मायानं या सर्व कसोट्यांना कसं काय तोंड दिले असेल, त्याची मी कल्पना करू लागले. कोणत्याही प्रकारच्या मानसिक यातनांमधून बरं होण्यासाठी पुष्कळ काळ जावा लागतो. ती कुसुमकडे येऊन कितीदा रडून गेली असेल बरं ?

"मग तू मायावर काय उपचार केलेस ?"

"मी जगदीश आणि त्याच्या आईला बोलावून घेतलं. मायाला प्रेमाची आणि वात्सल्याची गरज आहे, हे त्यांना समजावून सांगितलं. पैशाची नव्हे. पण त्यांना ते समजलंच नाही. तो तर एका कॉलेजचा प्राचार्य आहे. पण साधं प्रेमाचं तत्त्वज्ञान समजलं नाही त्याला. लोक एक फार मोठे प्राध्यापक म्हणून त्याचा गौरव करतात, पण ते सगळं कागदावरच आहे, कारण प्रत्यक्षात त्याची पत्नी मनोरुग्ण आहे. मी मायाच्या आईवडिलांना बोलावलं आणि त्यांना स्वच्छच सांगितलं, की जगदीश काही मायाची पर्वा करणार नाही. मायानंच आता हे समजून घेतलं पाहिजे आणि आपल्या पतीच्या प्रेमाची आशा न बाळगता, त्यावर अवलंबून न राहता स्वत:चं जीवन सुरू केलं पाहिजे. या गोष्टीचा स्वीकार करणं त्यांना फार जड गेलं, पण एक डॉक्टर म्हणून सत्य सांगणं हे माझं कर्तव्य होतं."

"मायाचं पुढे काय झालं ?"

"मी मायावर खूप वर्षं उपचार केले. कितीतरी तास मार्गदर्शनात घालवले. नैराश्यावर मात करणारी औषधं दिली. पण आता ती बरी आहे. ती आपल्या आईवडिलांपाशी राहते."

"कुसुम, हा अन्यायच नाही का ? खरं तर जगदीश इतका वाईट आहे, पण उपचार घ्यावे लागले ते बिचाऱ्या मायाला. ज्यानं दुसऱ्याला ताप दिला, दुखणं दिलं, तो मजेत आहे आणि स्वत:चा काहीही दोष नसताना बिचारी माया यातना भोगते आहे. सर्वात वाईट गोष्ट अशी की समाज म्हणतो, मायानं नवऱ्याला सोडून दिलंय."

"खरंय तुझं म्हणणं. कोण म्हणतो जगात न्याय आहे ? हे जीवन तर अन्यायानंच भरलेलं आहे. जर तुला ते बदलून न्यायी करायचं असेल, तर ते तूच कर."

ооо





# यांतील बरोबर कोण ?

अनेक वर्षांपूर्वीची गोष्ट. मला एका समारंभाला प्रमुख अतिथी म्हणून बोलावणं आलं होतं. हा समारंभ गरीब विद्यार्थ्यांसाठी चालवण्यात येत असलेल्या वसतिगृहात होता. मानवकल्याणकारी विचारसरणीच्या कोणीतरी व्यक्तीने ते वसतिगृह बांधले होते. जेवणं-खाणं व राहणं या सुविधा मोफत पुरवल्या जात. विद्यार्थ्यांना स्वत:च्या शिक्षणाचा, कपड्यालत्त्याचा खर्च तेवढा पडे.

माझ्या लहानपणी गरीब, गरजू आणि होतकरू तसेच बुद्धिमान असलेल्या विद्यार्थ्यांना पुढे होऊन आर्थिक मदत करणारी अनेक कुटुंबं होती. ही कुटुंबं अशा मुलांच्या गणवेषाचा, कपड्यांचा, फीचा खर्च करत. कित्येकदा अशा मुलांचा अन्न-खर्चसुद्धा स्वत: उचलत. त्या काळात चांगली महाविद्यालये फक्त मोठ्या शहरातच असत. गावातून आलेले कित्येक गरीब विद्यार्थी एकेक करून अशा कुटुंबात राहात व त्यांना तेथे अगदी घरच्यासारखं वागवलं जात असे. घरची गृहिणीसुद्धा हे सत्कार्य आहे असं समजून अगदी मनापासून करत असे. पण आजकालची परिस्थिती फारच बदलली आहे. लहान गावातसुद्धा शाळा आणि महाविद्यालये आहेत. त्यामुळे आता ही पद्धत नाहीशी झाली आहे.

आत्ता व्यासपीठावर बसल्यावर मला तो पूर्वीचा काळ आठवला. ज्या व्यक्तीने हे वसतिगृह बांधलं त्या व्यक्तीचे मी मनापासून आभार मानले. त्यांचं हे कार्य फार मोठं होतं. कितीतरी विद्यार्थ्यांना त्यामुळे मदत होत होती.

वसतिगृहाच्या सेक्रेटरीने माझ्यापाशी तिथे राहणाऱ्या काही मुलांचा उल्लेख केला. त्यांना अभ्यासात वरचा क्रमांक मिळत होता पण त्यांना फी भरणं जड जात होतं.

तो म्हणाला, "मॅडम, या वर्षी आमच्याकडे वेगवेगळे विषय शिकणारी तीन मुलं अशी आहेत, ज्यांनी उत्तम क्रमांक पटकावले आहेत. पण तिघांच्याही घरची

गरिबी आहे. त्यांना पदवी मिळायला अजून एक वर्ष अवकाश आहे.''

"ही मुलं काय शिकतात ?''

"एक जण वैद्यकीय कॉलेजात आहे. एक जण इंजिनीअरिंगला आहे तर तिसरा कॉमर्सला आहे.''

"कार्यक्रम संपला की मला त्यांची गाठ घेता येईल का ?''

कार्यक्रम नेहमीसारखा पार पडला. या अशा कार्यक्रमांमध्ये प्रमुख पाहुण्यांवर अनेकदा स्तुतिसुमनांचा वर्षाव होत असतो. कधीतरी तर ते अत्यंत अतिरंजित आणि अवास्तवसुद्धा असतं. मी अनेकदा त्यांची चुकीची विधानं दुरुस्त करण्याचा प्रयत्न सुद्धा करते, पण ते ऐकत नाहीत. मग मी सरळ या कानानं ऐकून त्या कानानं सोडून देते. जणू काही ते माझी नाही, दुसऱ्याच कुणाची तरी ओळख करू देत आहेत.

हे उगीचच्या उगीच एखाद्याचं अवास्तव, अतिरंजित कौतुक करणं म्हणजे एक प्रकारे मी भ्रष्टाचारच मानते. त्याचं कारण ज्या व्यक्तीवर ही एवढी स्तुतिसुमने उधळली जातात, त्या व्यक्तीला कदाचित ते सगळं खरं वाटू शकतं. त्या व्यक्तीचा स्वत:विषयी, स्वत:च्या कर्तृत्वाविषयी नसता गैरसमजही होऊ शकतो. बाराव्या शतकात कर्नाटकात एक महान नेता होऊन गेला- बसवेश्वर. त्याने या खोट्या स्तुतीला सोन्याच्या वधस्तंभाची उपमा दिली आहे, ती उगीच नाही.

समारंभ संपल्यावर मी त्या गरीब होतकरू मुलांची भेट घेतली. ती मुले जरा बुचकळ्यात पडलेली दिसली. ती जरा बावरली होती.

तिघांचीही कहाणी साधारण सारखीच होती. वडिलांना यथातथाच नोकरी होती. पुरेसं पोट भरण्याचीही ऐपत नव्हती. खेड्यात राहात होते. कुटुंबाचा पसारा मोठा. जमीनजुमला, संपत्ती, उत्पन्नाचं इतर साधन काही नाही. केवळ मेहनत, अभ्यासू वृत्ती आणि कमालीची जिद्द या भांडवलावर ती मुलं इथे येऊन शिक्षण घेत होती.

मला त्या मुलांबद्दल वाईट वाटलं. अनेक आईवडील काय वाटेल ते करून आपल्या मुलांसाठी उत्तमोत्तम कॉलेज, वह्या-पुस्तके, खाजगी शिकवण्या या सर्वांचा खर्च करतात. त्यासाठी मागेपुढे पाहात नाहीत. आणि इथे बिचाऱ्या या कष्टाळू विद्यार्थ्यांकडे फीचे पैसेसुद्धा जमण्याची मारामार होती.

पण देवी सरस्वतीची मात्र या मुलांवर मर्जी असावी.

"मला, तुम्ही जूनमधे येऊन भेटा. मी तुमची फी भरेन'' मी म्हणाले.

त्यांना ही अपेक्षा नव्हती, त्यामुळे मला त्यांच्या चेहऱ्यावर आनंद स्पष्ट



दिसला.

मीही कबूल केल्याप्रमाणे पुढे त्यांची फी भरली आणि तो प्रसंग विसरून गेले.

काही वर्षांनंतर मी परदेशी जायला निघाले होते. मला तिकडे राहणाऱ्या मैत्रिणीसाठी एक साडी घ्यायची होती.

विमानतळावर निघाल्यावर मला त्या गोष्टीची आठवण झाली. मग मी वाटेत एका साडीच्या दुकानापाशी थांबले. दुपारच्या जेवणाची वेळ असल्याने दुकानात फारसं कुणीही नव्हतं. सगळीकडे शांत होतं. मी फारच घाईत होते त्यामुळे बाहेर काचेआड लावलेल्या साड्यांपैकी एक मी पसंत केली व अगदी तसाच दुसरा नग असेल तर तो बांधून द्या आणि बिल बनवा, असं तेथील विक्रेत्याला सांगितलं.

इतक्यात एक तरुण पुढे आला. त्याचे कपडे उत्तम होते, तो चांगला स्मार्ट, तरतरीत होता. त्याने हसून मला आपल्या केबिनमध्ये येण्याची विनंती केली. तो कोण हे काही माझ्या लक्षात येईना. कदाचित आपला जुना विद्यार्थी असेल, असं मला वाटलं. अनेकदा मी त्यांची नावं विसरते. पदवीपूर्व वर्गातील विद्यार्थ्यांची नावं तर मी हमखास विसरते.

मी त्याच्या केबिनमधे शिरले. आत सुरेख फर्निचरची सजावट होती. ताजी फुलं ठेवली होती. संगमरवराची फरशी, भिंतीवर कलात्मक वॉल हँगिंग, सर्वत्र इलेक्ट्रॉनिक उपकरणं सारं काही तिथे होतं. थोडक्यात सांगायचं तर ते ऑफिस चांगलंच भपकेबाज होतं.

"मी जरा विमानतळावर जाण्याच्या गडबडीत आहे. मला लगेच साडी पॅक करून हवी आहे,'' मी म्हणाले.

मी पर्स उघडून साडीचे पैसे काढले व उभ्या उभ्याच निघाले. मला घाई असल्याचं त्याला परत एकदा सांगितलं.

तो तरुण हसून म्हणाला, "मॅडम, बसा ना. तुमचं पॅकिंग होईलच एवढ्यात.''

हा मुलगा आमच्याच कॉलेजातून पदवीधर झाला की काय ? असा विचार मनात आला आणि मी त्याला म्हणाले, "मी किती साली तुम्हाला शिकवायला होते ?'' मी स्मरणशक्तीला ताण देत होते.

"नाही, मॅडम. मी तुमचा विद्यार्थी नाही.''

"मग तुम्ही मला ओळखता ?''

"होय. खूप वर्षांपूर्वी विद्यार्थ्यांच्या वसतिगृहात आपण भेटलो होतो.''

तरीही मला काहीच आठवेना.

"तुम्ही तिथे प्रमुख पाहुण्या म्हणून आला होतात. मी आणि माझे दोन मित्र तुम्हाला येऊन भेटलो. तुम्ही माझ्या बी. कॉम.च्या शेवटच्या वर्षाची फी भरलीत."

आता मला तो मुलगा आठवला. ते तिघे हुशार पण बावरलेले मुलगे; त्याच्या आत्ताच्या रूपापेक्षा किती वेगळा दिसत होता तो.

मला खूप आनंद झाला. "मग आता तू काय करतोस ?"

"मॅडम, मी या साडी शॉपमधे मॅनेजर आणि भागीदार आहे. देव फार दयाळू आहे. आमचा धंदा फार उत्तम चाललाय."

"आणि तुझ्या घरचे लोक ?"

"माझं लग्न होऊन मी इथं स्थायिक झालो. माझे दोन भाऊ अजून शिकतायत. ते माझ्या जवळच असतात. माझ्या दोन्ही बहिणींची लग्नं झाली आहेत. आईवडील सुखात आहेत."

एव्हाना माझं पार्सल तयार झालं होतं. मी जायला निघाले.

तो बाहेर कारपाशी सोडायला आला. उशीर झाला होता. मी कशीबशी विमानतळावर पोचले आणि अक्षरश: विमान पकडलं.

विमानानं आकाशात उड्डाण केल्यावर मी जरा निवांतपणे ती साडीची बॅग उघडून पाहिली. तो काय, आत एकाऐवजी दोन साड्या. मला एकच साडी घ्यायची होती व मी पैसेही एकाच साडीचे भरले होते. पण त्या पार्सलमध्ये मात्र एकाऐवजी दोन साड्या होत्या, शिवाय मी दिलेले पैसेही त्यातच होते व सोबत एक चिठ्ठी होती. मी चिठ्ठी उघडून वाचली.

"मॅडम," चिठ्ठीत लिहिलं होतं, "आपली काहीही ओळखपाळख नसताना किती चांगुलपणानं तुम्ही माझ्या शिक्षणाचा खर्च केलात. तुम्ही तसं का केलं असावं, असा विचार अनेकदा माझ्या मनात येई. मी तर पूर्णपणे अनोळखी होतो, काही ओळख नाही, नातं नाही, तुम्ही तर माझ्याकडून कसलीच अपेक्षा ठेवली नव्हती. आता मीही एक निश्चय केलाय तो म्हणजे, जे लोक आपल्याशी काहीही संबंधित नाहीत अशा, सर्वस्वी परक्या माणसांना होईल तेवढी मदत करायची. त्या मोबदल्यात कसलीही अपेक्षा न ठेवता ! ही माझी तुम्हाला एक छोटीशी भेट. तुमच्या दृष्टीनं ती काही फार मोठी वस्तू नसेल पण मी अत्यंत प्रेमानं व कृतज्ञतेनं ती तुम्हाला देत आहे. तुम्ही माझं संपूर्ण आयुष्यच बदलून टाकलंत."

त्या चिठ्ठीतील त्याचे शब्द माझ्या काळजाला स्पर्शून गेले व माझ्या डोळ्यांत पाणी आलं.

मी मुंबईला पोचले. काही तांत्रिक कारणामुळे माझी आंतरराष्ट्रीय फ्लाईट



उशिरा सुटणार होती. मग आपण सांताक्रूझ मार्केटमधे जाऊन काही खाण्याचे पदार्थ विकत घ्यावे, असं मी ठरवलं. फूटपाथवरून मी आणि माझी मैत्रीण चालत असताना माझा पाय अडखळून मी पडले. पाहिले तर पाय चांगलाच मुरगळला होता आणि सूज आली होती. आपलं हाड तर मोडलं नाही ना, अशी भीती मला वाटली. माझ्याबरोबरची मैत्रीण मुंबईचीच असल्यामुळे तिनंच मला जवळच्या डॉक्टरांकडे नेले. हे डॉक्टर फी जरा जास्तच घेतात, पण खूप चांगले आहेत.

आम्ही खारच्या त्या डॉक्टरांकडे गेलो. दवाखाना अगदी अत्याधुनिक होता. बाहेरच्या बाजूला रिसेप्शनिस्ट होती. चांगली चुणचुणीत होती. मी आधी अपॉईंटमेंट घेतली आहे का असं तिनं विचारलं. मी नाही म्हणाले. त्यावर तिनं आम्हांला वेटिंगरूममधे बसवलं आणि डॉक्टरांशी बोलली. त्यानंतर तिनं आम्हांला आत पाठवलं.

डॉक्टर तरूण होता. चेहऱ्यावर आत्मविश्वास स्पष्ट दिसत होता. मला बरं वाटलं. तो हसतमुख होता. त्यानं माझ्या मनातील भीती दूर पळाली. माझा पाय तपासून बघताबघता तो थोड्या गप्पा मारत होता.

"मॅडम, मी आपल्याला या आधी भेटलो आहे. आता तुम्ही जरा वयस्कर दिसू लागला आहात."

"तुम्ही मला कुठे भेटला आहात ?"

"मी विद्यार्थी वसतिगृहात राहात होतो. तुम्ही त्या वेळी तेथे प्रमुख पाहुण्या म्हणून आला होतात. कार्यक्रमानंतर मी आणि माझे दोन मित्र तुम्हाला भेटलो होतो."

आता तो कोण असणार ते माझ्या नीट लक्षात आलं तरी पण खात्री करून घ्यायला मी म्हणाले, "मग ते दुसरे दोघे कुठे आहेत आता ?"

"एक बंगलोरला असतो. एका साड्यांच्या दुकानात भागीदार आहे आणि दुसरा अमेरिकेत असतो. पण तुम्ही इथे कशा काय ?"

मी त्याला कारण स्पष्ट केलं. एव्हाना माझ्या पायात कुठे दुखापत झाली आहे, ते त्याला समजलं होतं.

"काळजी नका करू. हाड वगैरे मोडलेलं नाही. नुसती लिगामेंटला दुखापत झाली आहे. औषधानं बरं वाटेल."

या मुलाचंही इतकं चांगलं चाललेलं पाहून मला आनंद झाला. फ्रॅक्चर वगैरे नाही, हे ऐकून मनाला दिलासा मिळाला.

"मग लग्न वगैरे केलं आहे की नाही ?"

परत एकदा तोच आत्मविश्वास चेहऱ्यावर झळकला व तो हसून म्हणाला, "होय. माझी पत्नीपण डॉक्टर आहे आणि आम्ही इथेच स्थायिक झालो आहोत."

त्यानंतर त्यानं पुढच्या पेशंटला आत बोलावलं.

मी बाहेर आले व रिसेप्शनिस्टच्या टेबलावरील फोन वाजला. डॉक्टरचाच रिसेप्शनिस्टला आतून फोन असणार बहुधा, या बाईंची फी घेऊन नको, असा. पण तरी आपण काय जी असेल ती फी द्यायची, असा विचार मी करत होते... आता याने इतक्या पॉश वस्तीत दवाखाना थाटला आहे... लग्नही झालंय... तेव्हा त्याला प्रोत्साहन तर द्यायलाच हवं.

मी पर्स उघडली. रिसेप्शनिस्ट म्हणाली : "तीनशे रुपये झाले."

"हे जरा जास्त नाहीत का ?" मी विचारलं. खरं तर मी आश्चर्यानं थक्क झाले होते. माझा हात पर्समधेच होता.

"नाही. डॉक्टरांनी स्वत:च मला एवढे पैसे घ्यायला सांगितले आहेत, कारण तुम्ही अपॉईंटमेंट घेतलेली नव्हती."

मी पैसे चुकते करून बाहेर पडले.

मी तीन माणसांना एकाच वेळी मदत केली होती— परतफेडीची काहीही अपेक्षा न ठेवता; पण त्यांचा दृष्टिकोन किती वेगळा होता. एका माणसाला मी केलेल्या मदतीबद्दल कृतज्ञता वाटली व अशाच प्रकारे इथून पुढे आपणही दुसऱ्याला मदत करावी, असं त्यानं ठरवलं. दुसऱ्यानं मात्र माझ्याकडून मिळालेल्या मदतीचा उल्लेखही केला नाही, त्याला त्याबद्दल कृतज्ञताही वाटली नाही, अथवा आपल्यावर काही ऋण असल्यासारखंही वाटलं नाही. याउलट एखाद्या पूर्णपणे परक्या पेशंटला जसं वागवावं, तसंच त्यानं मला वागवलं.

वेगवेगळ्या मनोभूमिका असणाऱ्या भिन्न व्यक्ती जरी एकाच परिस्थितीला सामोऱ्या गेल्या, तरीसुद्धा त्यांचं वागणं वेगळं असू शकतं.

मला तो अमेरिकेत राहणारा तिसरा मुलगा अजून भेटायचा आहे.

ooo



# REACH

*रीसोर्स ग्रुप फॉर एज्युकेशन अँड ॲडव्होकसी फॉर कम्युनिटी हेल्थ (REACH) ही एक स्वयंसेवी संस्था असून समाजात महत्त्वपूर्ण अशा आरोग्यविषयक प्रश्नांच्या संदर्भात जागरूकता निर्माण करण्यासाठी ती कार्यरत असते.*

*'रीच'तर्फे समाजातील आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांसाठी उपयुक्त असे उपक्रम निवडले जातात. हे उपक्रम असे असतात, ज्यांमुळे समाजातील दुर्बल घटकांना त्यांचा तात्काळ फायदा मिळू शकतो.*

*सामाजिक आरोग्याचे जे प्रश्न असतात त्यांच्यावर संशोधन करून तोडगे जरी शोधलेले असले तरीसुद्धा ते प्रश्न सुटत नाहीत. याचे मुख्य कारण म्हणजे समाजाचे त्या प्रश्नांच्या संदर्भातील अज्ञान आणि उदासीनता आणि त्याचमुळे दुर्बल घटकांपर्यंत, खऱ्या गरजू लोकांपर्यंत कोणतीही उपाययोजना पोचतच नाही.*

*म्हणूनच 'रीच'समोरची उद्दिष्टे आहेत.*

* *जनजागरण*
* *उपलब्ध साधनसामुग्रीचे योग्य वितरण*
* *ही साधनसामुग्री समाजातील गोरगरिबांना उपलब्ध करून देणे.*

*ॲडव्होकसी फॉर कंट्रोल ऑफ ट्यूबरक्युलॉसिस ॲक्ट (ACT) हा 'रीच' या संस्थेचाच एक उपक्रम आहे. तो ट्यूबरक्युलॉसिस रीचर्स सेंटर इंडियन कौन्सिल ऑफ मेडिकल रीसर्च आणि चेन्नई कॉर्पोरेशनच्या संयुक्त विद्यमाने राबवण्यात येतो.*

*डॉट्स (DOTS)*

*डायरेक्टली ऑब्झर्वड् ट्रीटमेंट शॉर्ट कोर्स हा ट्यूबर क्यूलॉसिस रीचर्स सेंटर, चेन्नई यांच्यातर्फे सुरू करण्यात आलेला एक प्रयोग आहे व WHOने त्याला मान्यता दिली आहे. क्षयरोगासारख्या दुर्धर रोगाने भारतात एडस्पेक्षाही जास्त रुग्णांचा बळी घेतला आहे. या रोगावर यशस्वी रीत्या मात करण्यासाठी जगभरातून या प्रयोगाला उचलून धरण्यात आले आहे.*

*रीच - डॉक्टर्स, स्वयंसेवी कार्यकर्ते, खाजगी रुग्णालये आणि उद्योगसमूह या सर्वांच्या एकत्रित प्रयत्नांमधून DOTS Methodologyचा वापर करून रुग्णांना*

मोफत उपचार पुरवले जातात.

हे सर्वच घटक एकत्रित स्वरूपात जेव्हा जेव्हा गरज पडेल तेव्हा सरकारच्या मदतीस धावून येतात व जास्तीत जास्त जनतेपर्यंत पोचण्याचा प्रयत्न यातून केला जातो.

खाजगी रुग्णालयांमध्ये काम करणारे कर्मचारी तसेच डॉक्टर्स यांच्या मदतीने गरजू रुग्णांपर्यंत पोचून त्यांना सहा महिन्यांपर्यंत सातत्याने मोफत उपचार देणे, ही गोष्ट अत्यंत कठीण आहे. या अशा स्वरूपाच्या एका उपक्रमाने क्षयरोगासारखा प्राणघातक रोग आटोक्यात येणे शक्य नाही. आपण समाजातील सर्वच घटकांनी एकत्र येऊन या रोगाविरुद्ध लढा देणे गरजेचे आहे.

अधिक माहितीसाठी संपर्क साधा :

'रीच'

९/५ स्टेट बँक स्ट्रीट, चेन्नई

६०० ००२, भारत.

दूरध्वनी : २८४१८१७९ / २८५२५०७४

ई-मेल : reach-us@vsnl.net.in

(सर्व देणग्या इन्कमटॅक्स ८०च्या अंतर्गत कर सवलतीस पात्र)

ooo